# ‘प्रहार’

(स्वतंत्र सामाजिक कादंबरी)



लेखक

प. त्रिं. सहस्रबुद्धे, ठाणें

१८६२ वर्षप्रतिपदा

आर्यसंस्कृतिप्रकाशन, पुणें शहर

# पहिलें पाऊल

महाराष्ट्र-सारस्वताच्या विस्तीर्ण प्रांगणांत आत्मविश्वासानें पहिलें पाऊल टाकतांना माझें हृदय संमिश्र भावनांनीं भरून येत आहे. सामान्य बुद्धि-मत्तेच्या पायावर लहानसें पण आपलें असें वाटणारें वाङ्मयीन घरकुल उभारतां आल्याचा आनंद मनांत उसळूं पाहत असतांनाच, ज्यांच्या प्रेम-पूर्ण कौतुकमिश्रित सहानुभूतीमुळेंच माझें कुंचल्यावरील लक्ष्य उडून जाऊन लेखणीवर स्थिरावलें अशा कांहीं कालवश सुहृदांच्या दृष्टीस माझें पुस्तक पडत नाहीं ह्या जाणिवेनें मला कांहींसें खिन्न झाल्यासारखें वाटत आहे.

पहिलें पाऊल टाकण्यापूर्वी नवीन लेखकाची स्थिति 'पुढें' येण्याच्या बाबतींत तरी लांब लांब जाऊं इच्छिणाऱ्या आंधळ्यासारखी झालेली असते. चालण्याची शक्ति पायांत आहे असें वाटत असतें पण पुढला मार्ग दिसत नाहीं. आणि कुणाकडून तो समजला तरी त्या मार्गानें नेणारे योग्य वाटाडे मिळणें कठीण ! या बाबतींत मला मिळालेले मार्गदर्शक माझ्या मनांत आदरभाव उत्पन्न करणारेच ठरले. माझे स्नेही — सुप्रसिद्ध साहि-त्यिक श्री. रा. म. आठवले, प्रसिद्ध कवि श्री. व. रा. वैद्य आणि पुस्तकाचे प्रकाशक यांच्याबद्दल जितकें कृतज्ञतेनें लिहावें तितकें थोडेंच होईल. पण तिघांनींहि माझ्या पुस्तकासाठीं घेतलेले श्रम निरभिलाषी मित्रभावानें घेत-लेले असल्यामुळें त्याचे आभार व्यवहारी औपचारिकपणानें मानणें मला योग्य वाटत नाहीं. तरी पण एवढें म्हटल्याशिवाय मात्र मला राहवत नाहीं कीं त्यांनीं आपलेपणानें मला वेळोवेळीं सूचना दिल्या नसत्या, हस्तलिखितांत सुधारणा सुचविल्या नसत्या, तर माझ्या पुस्तकांत कितीतरी वैगुण्यें राहिलीं असतीं.

श्री. शि. चिं. ब्रह्मे यांची मूर्ति म्हणजे ठाण्यांतील साहित्यिकांना प्रोत्साहन देणारी मध्यवर्ति संस्थाच. साहजिकच ब्रह्मे यांनीं स्नेहभावानें मला कितीतरी मदत केली ही गोष्ट नमूद करणें अवश्य आहे. सौ. सिंधूनें मजबरोबर सहकार्य केलें म्हणूनच प्रस्तुत पुस्तक लिहून होऊं शकलें ! तिनें असेंच नेहमीं वागावें अशी इच्छा असल्यानें तिचे आभार मात्र मी आजच मानीत नाहीं ! !

मुंबईचे गव्हर्नर वज्रेश्वरीस गेल्यावेळचा एक प्रसंग कादंबरींत घातलेला आहे. गव्हर्नर त्या ठिकाणीं खरोखरच एक-दोन वर्षांपूर्वी गेलेले असले तरी त्यांचा अगर इतर कोणत्याहि व्यक्तीचा उल्लेख करण्याचा माझा मुळींच हेतु नाहीं.

कमलाविहार,
ब्राह्मणवाडी, नौपाडा, ठाणें.
२०-३-१९४०.

प. त्रि. सहस्रबुद्धे.

कालवश

# सौ. कमला सहस्रबुद्धे

हिच्या

## स्मृतिसमाधीवर

—समर्पण—

प. त्रिं. सहस्रबुद्धे

# प्रहार.

## १

तारवटलेल्या दृष्टीनें तिनें अर्धवट उघडया ठेवलेल्या खिडकींतून बाहेर पाहिलें. भयाण सागरावरून संथपणें जाणाऱ्या एकाकी गलबताप्रमाणें हळू-हळू पुढें सरकणारी चंद्राची कोर काळ्याकुट्ट मेघांच्या दाट पडद्यामागें नाहींशी झाली होती. आभाळाचा जो थोडासा भाग पडल्यापडल्या दिसत होता तोच तिला इतका भेसूर वाटला कीं तिनें आपली दृष्टि बाजूला वळवली. खोलींतील अंधार, निःशक्त माणसाच्या मंद प्राणज्योतीप्रमाणें कोपऱ्यांत जळणारा जुनाट कंदील, कंदिलाच्या निःस्तेज प्रकाशांत उठून दिसणारा तेथल्या वस्तुवस्तूवरचा भकास खिन्नपणा — ह्या सर्वांना बघून कंटाळल्यामुळें ती बाहेर बघूं लागली. पण तेथें देखील तोच प्रकार. सारें चराचर आपल्याला भयाण दृश्यें दाखवून भेडसावीत तर नाहीं !

कोपऱ्यांतला कंदील जर नसता तर अनंत विचार मनांत उसळल्या-मुळें तिनें भीतीनें खचित किंकाळी फोडली असती. पण तो अस्पष्ट प्रकाश तिला जणूं धीरच देऊं लागला. क्षीणपणानें हलणाऱ्या ज्योतीकडे बघतांना तिला किंचित् बरें वाटलें आणि भीतीहि कमी झाली. तिच्या मनांत आलें — ' आपण खरोखरच अशा अंधारांत सांपडलेल्या आहोंत. डोकं फोडफोडून जरी विचार केला, तरी आहे ह्या परिस्थितींतून सुटका करून घ्यायचा मार्ग कोणता तें समजत नाहीं. क्वचित् एखादा दिसलाच नि त्या

मार्गानं जायचा विचार आपण करूं लागलों कीं अनेक संकटांनीं तो बंद करून टाकल्याचं स्पष्ट होतं नि अमावास्येचा अंधार पसरतो डोळ्यांपुढं.'

मनाला विरंगुळा वाटायला तिला एकच साधन उपलब्ध होतें. तें म्हणजे तिचाच सहा-सात वर्षांचा मुलगा शिशिर. जवळच अंगाची जुडी करून पांघरुणांत निजलेल्या त्याच्या कृश शरीरावरून जेव्हां ती हात फिरवूं लागली तेव्हां तिला वाटलें 'असल्या अंधारांतहि कंदिलाच्या ज्योती-प्रमाणं माझा शिशिर मला भासतो आहे. लहानपणापासून पितृप्रेमाला त्याला पारखं व्हावं लागलं. परिस्थितीच्या जाणिवेनं मनावर दडपण पड-ल्यामुळं जरी तो अशक्त होत गेला तरी त्याची समजूत वाढतच होती ... तोच माझ्या आशेचा आधार आहे ... तोच मला धीर देत आहे ... कंदिलाच्या अभावीं जसं मला त्या वेळीं झालं असतं तसंच ह्या रूक्ष जीव-नांत शिशिरवांचून झालं असतं ... माझं बाळ किती गुणी आहे पण !'

वत्सलतेचा उमाळा न आवरल्यानें तिनें शिशिरच्या अंगावरून पुनः-पुनः हात फिरवला आणि कपाळावरचे केस मागें करीत त्याचें उत्कटतेनें चुंबन घेतलें.

गाढ झोंपलेल्या शिशिरच्या गालांवर हास्याची सूक्ष्म लकेर तरळली.

तिला कितीतरी समाधान वाटलें. मनांत उसळलेल्या भीतिदायक कल्पना क्षणभरच कुठच्याकुठें नाहींशा झाल्या. 'कुणीं सांगावं ! हेहि दिवस जातील. माझा बाळ मोठा होईल, खूप-खूप पैसे कमावील नि आपल्यावर भावाकडे राहण्याची वेळ आली आहे ती निघून जाईल. कुणीं केलं नसेल एवढं प्रेम तो मजवर करील आणि मलाहि हा माझा मुलगा म्हणून जगाला सांगतांना अभिमान वाटेल !'

अशा अनंत कल्पना तिच्या मनांत आल्या असत्या, पण आनंदावर विरजण घालणारा विचार मनाला शिवून जातांच ती खिन्न झाली. अश्रू उभे राहिले तिच्या दृष्टींत.

'शिशिर मोठा झाल्यावर सगळं चांगलं होईल, पण आज त्याचा काय उपयोग ! वेड्या मना ! डोंगराचं शिखर सुंदर दिसलं म्हणून हुरळून जातांना तो चढून गेल्याशिवाय सौंदर्याचा उपभोग घेतां येत नाहीं हें कसं विसरलेस ? त्यांतच भोंवतालीं पसरलेलं संकटांचं अरण्य ! त्यांतूनच

पार कसं पडायचं तें नाहीं सुचत. मग पलीकडे — दूरवर असणाऱ्या त्या शिखराकडे बघून काय उपयोग ?'

... आणि जे प्रश्न मनांतून गेल्यासारखे क्षणापूर्वी भासले ते चटकन् तिच्या दृष्टीपुढें थैमान घालूं लागले.

तिचा एक हात शिशिरच्या अंगावर अलगदपणें ठेवलेला होता. दुसऱ्या हाताच्या तळव्याचा आधार हनुवटीला देऊन ती बसली होती. दृष्टि अजून-हि कंदिलाच्या ज्योतीवर खिळल्यामुळें ती ज्योत लांबट-लांबट होऊन तुटत असल्यासारखी डोळ्यांना दिसत असूनसुद्धां मनाला मात्र तिची जाणीव होत नव्हती. पापण्या आसवांनीं भरून आल्या. अश्रू ओघळून खालीं पडायला लागले तरीदेखील शिशिरच्या अंगावरचा हात तिनें काढला नाहीं कीं दृष्टि कंदिलावरून ढळवली नाहीं. जणूं साऱ्या जगांत तेवढेच दोन आधार तिला राहिले होते आणि तेवढे तरी निदान कोणीं नेऊं नये म्हणून तिचा यत्न चालला होता.

ज्या माणसाचें आयुष्य कष्टमय — दुःखद — प्रसंगांनीं भरलेलें असतें त्याला त्या दुःखांची स्मृति वारंवार होतच असते. प्रसंग डोळ्यांपुढें उभे रहात असतात : ते पुनःपुनः पाहण्यांत दुःखांच्या आठवणीमुळें उत्पन्न होणारी खिन्नता त्याला वाटत असते : तरीहि आंतल्याआंत सूक्ष्मसा आनंदहि होत असतो. दीनेचें या वेळीं असेंच झालें. तिच्याहि दृष्टीपुढून भोगलेल्या हालअपेष्टांचा इतिहास चित्रपटाप्रमाणें सरकून जाऊं लागला. आणि तिनें मागच्या घडामोडींत बुडी मारणाऱ्या कल्पनेला प्रतिकारहि केला नाहीं.

* * *

सुखापेक्षां दुःखाचेच प्रसंग अनुभवण्याची वेळ एखाद्यावर आली तर तो, कृपण माणसानें अल्पशा धनाचीहि प्राणांच्या मोलानें जपणूक करावी त्याप्रमाणें, सुखदायी स्मृतींचा सांभाळ करतो. दीनेच्याहि डोळ्यांपुढें मागील इतिहास उभा राही तेव्हां-तेव्हां लहानपणीं अनुभविलेल्या सुखद अनुभवां-बरोबरच विवाहाच्या सुमारास घडलेले कांहीं प्रसंग ताजेपणानें डोळ्यांपुढें उभे रहात.

असलाच एक प्रसंग तिला आजहि आठवला.

श्रीकान्ताशीं तिचा विवाह निश्चित झाल्याचें तिला समजलें तेव्हां तिच्या दृष्टीपुढून अनेक कल्पना चमकून गेल्या. भावी सुखी जीवनाची आगाऊ पडद्याप्रमाणें भासणारी ती पडछाया किती मोहक नि उन्मादक वाटली तिला ! श्रीकान्ताला तिनें पाहिला होता तरीहि वारंवार त्याला बघण्याची अनिवार लालसा तिला वाटूं लागली, आणि नुसत्या पाहण्यापेक्षां त्याच्या वागणुकीच्या आसऱ्याची ऊब आपल्याला केव्हां मिळेल आणि तारुण्य-सुलभ आतुर भावना केव्हां एकदां शान्त होतील असें होऊन गेलें तिला. श्रीला बघतांच तिच्या मनावर अतिशय गोड असा ठसा नकळत उमटला. वास्तविक वडिलांनीं शोधून काढलेल्या अपरिचित श्रीकांताला पाहतांच तिच्या मनांत त्याच्याविषयीं एकाएकीं चांगले विचार कां उत्पन्न व्हावेत हें तिचें तिलाहि समजलें नाहीं. श्रीची रेखीव शरीरयष्टि, व्यवस्थित पोषाख, निळसर पण पाणीदार डोळे आणि तरतरीत नाक या सर्वांनींच तिच्यावर मोहिनी टाकली. पसंतीच्या प्रसंगीं क्षणभरच काय तें दीनेनें श्रीला बघितलें असेल : पण तेवढ्यांतहि अरुणाची रम्यता, जोत्स्नेची शीतलता, सागराचा गंभीरपणा हीं सारीं तिला त्याच्या ठायीं आढळलीं.

श्रीकान्तानें प्रश्नहि किती साधे विचारले !

"आपण कोणतीं पुस्तकं वाचलींत आतांपर्यंत ?"

"रामायण— महाभारत—" प्रश्नाच्या मागें दडलेली गूढ भावना श्रीच्या तोंडावर प्रतिबिंबित झाली असल्यास पाहावी म्हणून कीं काय चोरट्या दृष्टीनें श्रीकडे बघत कातर आवाजांत दीनेनें उत्तर दिलें.

"रामायणांतला तुम्हांला राम आवडतो कीं रावण ?"

"राम."

"राम आवडतो ?— मला तर बुवा रामापेक्षां रावणाचंच खरं कौतुक करावंसं वाटतं."

श्रीच्या त्या थट्टेखोर वाक्यानें तिला कांहींसा धक्का बसला. श्रीकान्ताच्या ठिकाणीं अनेक गुण असावेत ही आपली कल्पना खोटी तर नाहीं ठरणार असेंहि क्षणभर तिच्या मनांत आलें. पण— पण छे ! इतक्या गोड स्वरूपाचे श्रीकान्त उगीचच थट्टेनें असा खवचट प्रश्न विचारीत असतील. त्यांनाहि सीतेसाठीं रानोवनीं हिंडणारा, वेड्याप्रमाणें झाडां-वेलींना 'माझी सीता

कुठं दिसली का हो ! ’ ‘ माझी सीता कुठं पाह्यलीत का हो !’ असें कळवळून विचारणारा श्रीरामच खचित आवडत असला पाहिजे अशी तिनें समजूत करून घेतली.

श्रीकान्तानेंहि त्या प्रश्नावर फारशी चर्चा केली नाहीं.

आणि सर्वांना नमस्कार करून ती आंत जाऊं लागली तेव्हां पुन्हा एकवार श्रीच्या डौलदार देहावर तिनें आपली दृष्टि झर्‌कन् फिरवली. श्रीनेंहि त्याच वेळीं तिच्याकडे पाहिल्यामुळें ती लाजलीहि.

श्रीबद्दल अनन्यभाव त्याच क्षणीं दीनेच्या मनांत उत्पन्न झाला. तो स्वभावानें गोड असणारच असा तिला विश्वास वाटूं लागला.

हा प्रसंग कितीतरी दिवस तिच्या डोळ्यांपुढें सारखा तरंगत असे. अजूनहि कधीं-कधीं तिला असें वाटे कीं त्या वेळचें अज्ञानांत गुरफटलेल्या मनानें जें कल्पनामय सुख अनुभविलें तें तसेंच पुन्हां-पुन्हां अनुभवायला मिळेल तर किती बरें होईल !

पण गुलाबाच्या सुगंधानें धुंद होऊन घाईनें फूल खुडण्याचा यत्न केला कीं मगच भोंवतालच्या कांट्यांची जाणीव होते. दीनेचें तरी असेंच झालें.

ती जेव्हां सासरीं आली तेव्हां तिच्या रक्ताच्या थेंबाथेंबांतून श्रीबद्दल-चा अभिमान रसरसलेला होता. पण जसजसे दिवस जाऊं लागले तस-तसा एकएका गोष्टीचा उलगडा होऊं लागला.

श्रीकान्त इनामदार खराच. श्रीमंतहि पुष्कळच. पण दैवयोगानें श्रीमान् बनलेला, कर्तृत्वानें नव्हे. आईच्या मांडीवर लहानपणींच दत्तक दिला गेलेला. त्याची ती दत्तक आई हुशारहि बरीच होती. तिला असें वाटायचें कीं दत्तक मुलानें आपली संपत्ति घालवली असें होतां कामा नये. म्हणूनच क्षुल्लक बाबतींतहि श्रीवर करडी दृष्टि असायची तिची. जात्या ती कृपण होती. आणि त्यांतहि आणखी संशयी. श्रीवर ह्या सर्वांचा परिणाम होऊन तो नेभळा बनला. दीनेला प्रथमदर्शनीं जसा तो चांगला वाटला तसा तो मूळचा होताहि. गरीब मातापित्यांच्या पोटीं येऊन अचानक श्रीमंत झालेल्या श्रीची मूळची बुद्धि समजूतदार. पण बालपणापासून त्याच्याव नव्या आईकडून जे अनिष्ट संस्कार होत गेले त्यांमुळें त्याच्या मूळच्या चांगलेपणाला विकृत स्वरूप आलें होतें. आई लाड तर इतके करीत असे

कीं त्याची स्वतःची बुद्धि वापरण्याची संवयच मोडून गेली होती. आई सांगेल तसें तो हळू-हळू वागूं लागला. तिच्या शब्दापलीकडे जाण्यानें आपण भयंकर अपराध करीत आहों असेंच त्याचें पुढें-पुढें मत बनून गेलें.

मोठेपणींहि श्रीनें आपल्या आज्ञेबाहेर जाऊं नये म्हणून त्या धूर्त स्त्रीनें दत्तविधान करतांनाच असें स्पष्ट ठरवून ठेवलें होतें कीं श्रीकान्त आपल्या सांगण्याप्रमाणें वागण्याचें नाकारूं लागला तर त्याचा इस्टेटीवरील सर्व हक्क नाहींसा व्हावा. तिच्या विरुद्ध जाण्याची बुद्धि श्रीला चुकूनहि झालीच तर त्याला दुबळा करायला हें मोठेंच हत्यार तिनें आपल्या हातांत ठेवलें होतें. त्याचा उपयोगहि कुशलतेनें ती करी. म्हणूनच श्री कधीं तिच्या आज्ञेबाहेर गेला नाहीं. नेहमीं ही भीति वाटे कीं आईनें घराबाहेर घालवलें तर खायचें काय ? चार पैसे मिळवायची देखील लायकी नाहीं आपली !

आईच्या वर्चःस्वाला मुकाट्यानें मान लववणें भागच होतें त्याला. दीनेलाहि त्यानें तसेंच वागायला सांगितलें. एकदां दीना खोलींत बसली असतांना तो म्हणाला—

" दीना, मी तुला आवडलों आहें ना ? "

" असं काय विचारतां आज ? " म्हणत विस्मयानें त्याच्या डोळ्यांत दीनेनें बघितलें.

" खरं— खरं— सांग. " त्यानें कितीतरी वेळ आग्रह केला.

" खरोखर मनापासून आवडतां तुम्ही. " दीनेनें शेवटीं उत्तर दिलें. आणि आवडीचा पुरावा म्हणून कीं काय आपला हात त्याच्या रुंद छातीवर चमकणाऱ्या सोनेरी बटणापाशीं नेला. तिला वाटलें श्री आपल्याला आतां जवळ ओढील.

पण श्री उलट गंभीर झाला.

" मग मी सांगतों तें ध्यानांत ठेव. "

" काय ? "

" माझ्या आईच्या शब्दाबाहेर कधींहि जाऊं नकोस. "

त्या वेळीं त्याचें तें सांगणें तिनें सहज कबूल केलें. पण दिवसेंदिवस तसें करणें तिला जड मात्र जाऊं लागलें. कारण श्रीची आई होतीच तशी विलक्षण. प्रत्येकानें आपल्या दृष्टीकडे बघत पाऊल टाकावें असें तिला

फार वाटे. कुणावर तरी ताबा चालवण्यांत आयुष्याचा बराचसा भाग गेल्यामुळें नेहमीं दुसऱ्यावर अधिकार गाजवायचा तिचा प्रयत्न असायचा. आपण एखादी गोष्ट करा म्हटलें कीं सगळ्या अडचणी बाजूला ठेवून प्रत्येकानें ती केली पाहिजे असें तिला वाटे. विरोधाची तर कल्पनाहि तिला कधीं सहन झाली नाहीं. आणि आपण पुष्कळांना ताब्यांत ठेवतों ह्याचा तर तिला मोठा अभिमान वाटत असे. पण त्या अहंकारी वागणुकीमुळें दीनेला मात्र सासूची तितकीच चीड येई.

तरीहि शिशिरच्या जन्मापर्यंतचे दिवस दीनेनें पुष्कळच समाधानानें काढले. घरांत लहान मूल नसल्यानें त्या वेळपर्यंत सासूनें तिचे पुष्कळ लाडहि केले. श्रीदेखील तिच्याजवळ आनंदानें वागत होता. दीनेला वाटूं लागलें संसारांतील सौख्याचा परमोच्च बिंदु आपण गांठला. पुत्रदर्शनासाठीं आसावलेले तिचे नेत्र भावी सुखाच्या नव्या कल्पना पाहण्यांत दंग होऊं लागले. शिशिरचा जन्मदिवस आयुष्यांतला अत्यंत सुखाचा दिवस तिला वाटला.

वास्तविक प्रसूतीच्या वेळीं तिचे अत्यंत हाल झाले होते आणि त्यामुळें ती अधिकच निःशक्त झाली होती.

पण तिचें मन स्वतःकडे कुठें लक्ष्य देत होतें ? टवटवीत फुलाप्रमाणें दिसणाऱ्या शिशिरच्या तोंडाकडे पाहण्यांत तिचा सर्व वेळ जात होता. इतरांची दृष्टि टाळून तिनें कितीतरी वेळां बाळाच्या सतेज गालांचें चुंबन घेतलें असेल, कितीतरी वेळां चिमुकल्या ओठांच्या पाकळ्यांशीं स्तनाग्र नेलें असेल.

तो दिवस ती अजूनहि विसरली नव्हती.... पुढेंहि विसरणें शक्य नाहीं.

कारण जीवनांतल्या खऱ्या सुखाला त्याच दिवसापासून ओहोटी लागली. नंतरचा प्रत्येक दिवस तिच्या दुःखांत भर टाकूनच मावळूं लागला. शिशिरच्या वाढत्या खेळकरपणाचा आनंद क्वचित्‌च तिला लुटायला मिळाला असेल. कारण बाळंतपणाच्या वेळीं तिनें जें अंथरूण धरलें तें महिनेच्या महिने लोटले तरीहि सुटलें नाहीं. आजार कमी व्हायची नि आपल्या पायांनीं फिरायची तिची आशा दुरावतच गेली.

नेहमीं अंगांत भरणाऱ्या व नाहींशा होणाऱ्या तापाचें स्वरूप कांहीं दिवसांनीं भीतिदायक वाटूं लागलें. आणि पुढें-पुढें तर ती इतकी अशक्त

होऊन गेली कीं पडल्यापडल्या जेवढें दिसेल तेवढेंच आपलें जग अशी ती आपल्या मनाची समजूत घालूं लागली.

शिशिरच्या निर्भर हास्यानें घरांतलें वातावरण अतिशय प्रसन्न होत असतांनाच त्याच्या आजीच्या दीनेसंबंधींच्या वागणुकींत विलक्षण फरक पडत होता. आजीच्या प्रेमाचें केंद्र शिशिरच्या जन्मापूर्वी दीना होती खरी, पण आतां तिचे डोळे नातवावरच अधिक स्थिरावूं लागले. त्याचें करण्या-सवरण्यांत ती इतकी गढून गेलेली आढळूं लागली कीं दीनेला नंतर संशयहि येऊं लागला – आपल्याकडे दुर्लक्ष्य करण्यासाठींच तर नसतील त्या शिशिरचे लाड करीत !

दीना कधीं कांहीं बोलली नाहीं. शिशिर इकडेतिकडे वावरूं लागला तरी तिच्या छोट्या जगांत त्याच्या पाठीवरून वत्सलतेनें हात फिरवण्यांवाचून ती काय करणार होती ! त्यापेक्षां आजी त्याचें कौतुक करते आहे, निरनिराळे खेळ आणून देते आहे, तें काय वाईट ! – अशा विचारानें तिनें मनाची समजूतहि घातली असती....

... पण ...

आजींच्या जिभेचा लगाम हळूहळू सैल सुटत चालल्याचें स्पष्ट दिसूं लागलें. घरांत जणूं सर्वांवर दुःखाचे डोंगर कोसळले आहेत आणि तसें होण्याला कारण दीना आहे अशा भावनेनें त्या तिच्याकडे बघूं लागल्या. तिला हवें काय नको काय विचारायचें त्यांनीं सोडून दिलें. दिनेच्याबद्दल सहानुभूति दाखवणें तर दूरच राहिलें, पण सांपडेल तेव्हां तिच्याकडे विषारी तिरस्कारानें बघायचें मात्र त्या विसरत नाहींतशा झाल्या.

आणि ह्या सर्वांचें कारण – तिचा आजार !

श्रीकान्तानें तिच्याबद्दल थोडें प्रेमळपणाचें धोरण स्वीकारलें असतें तरी दीनेनें सारीं दुःखें सहन केलीं असतीं. पण श्रीला निराळें अस्तित्व होतेंच कुठें ! आईची पडछायाच बनून राहिला होता तो ! तिच्या शब्दाबाहेर जायची हिंमत त्याला कशी होणार ! दीनेला ह्याच त्याच्या वागण्यानें अधिक धक्का बसला. तो नेहमींप्रमाणें खोलींत येई. गादीवर निजे. सकाळीं उठून जाई. फिरून रात्र होईपर्यंत त्याचें दर्शन दीनेला होत नसे. सर्व काळ तो कुठल्या कामांत गढून गेलेला असे असेंहि नाहीं. त्याचें मनच गढूळ झालें होतें हेंच

खरें. लग्नापूर्वी त्याच्या तोंडावर दिसणाऱ्या मोहकपणाऐवजीं आतां विचित्र संशयी भाव दिसूं लागले. श्रीच्या दृष्टीला दृष्टि भिडवून त्याचें हृद्गत जाणण्याचा यत्न दीनेनें पुष्कळ वेळां केला, पण तिला कधीं यश आलें नाहीं. एकदां मात्र निश्चय करून श्रीला जवळ बोलावून तिनें अत्यंत लाडिकपणानें विचारलें—

" मीं कोणती चूक केली आहे कीं तुम्हीं दोघांनीं माझ्याशीं तुटकपणानं वागावं ? सांगाल का मला ? "

श्री क्षणभर स्तब्ध राहिला. मग किंचित् कठोर स्वरांत उद्गारला—

" तुला पूर्वी सांगितलेलं विसरलीस म्हणून— "

" काय सांगितलं होतं ? "

" नीट आठवण कर. आईच्या शब्दाबाहेर न जाण्याबद्दल बजावलं होतं कीं नाहीं ? "

" हो. मीं तसं वागण्याचा प्रयत्नहि केला "

" मग ? "

आणि दीनेनें सासूबाईच्या वागणुकीचा पाढा वाचला.

पण श्रीवर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. त्याला [illegible] हवी होती. त्यासाठीं आईला जवळ बाळगणेंहि भाग होतें : मग त्यापायीं बायकोला दूर करणें जरूर झालें तरी चालेल.

दीना आजारी पडल्यापासून पूर्वी कधीं न आढळलेले दुर्गुण सासूला तिच्यांत स्पष्ट दिसूं लागले ! घरांतलें काम करतांना सारा राग ती भांड्यांवर काढी; तरण्याताठ्या सुना आजारी पडल्याबद्दल त्यांच्यावर लाखोली वाही. दीनेच्या जिव्हारीं सासूचे हे बोल लागत. त्यांनीं झालेल्या वेदना तिला असह्य होत. श्रीजवळ दुःख सांगून हृदय मोकळें करण्याचा मार्गहि बंद झाल्यानें तिला वेळीं-अवेळीं अश्रू ढाळण्याखेरीज काय करतां येणार ?

पण ते अश्रू म्हणजे रक्ताचे थेंबच ठरले. दिवसेंदिवस अशक्तता वाढतच चालली.

शिशिर जवळ आला तर त्याचें देखील चुंबन दीनेनें घेऊं नये असें सासू बजावी. कधीं-कधीं वत्सलतेचा उमाळा असह्य होऊन तिनें शिशिरचा मुका घेतलाच तर सासूच्या संतापाचा पारा जर-वर चढूं लागे.

औषधाच्या बाबतींत हलगर्जीपणा इतका होऊं लागला कीं औषध घेण्याच्या देखाव्यापेक्षां मरण आलें तर बरें असे त्राग्याचे विचार मनांत येऊं लागत तिच्या. पण शिशिरची बालमूर्ति डोळ्यांपुढें उभी राहतांच ते विचार नाहींसे होत. इतर कुणालाहि ती नकोशी झाली असली तरी शिशिरला ती हवी होती. आणि तिलाहि त्याच्यासाठींच जगावेंसें वाटत होतें.

तिचा आजार वाढत होता.

श्रीकान्त आईच्या शब्दाबाहेर जाण्यास अजूनहि तयार होत नव्हता. दीनेला त्याचा राग येई ह्याबद्दल. पण कधीं-कधीं कींवहि येई. कारण कांहीं-कांहीं वेळां – विशेषतः आई घरांत नसतील तेव्हां – तो इतक्या चांगल्या तऱ्हेनें वागे कीं आपल्या दुःखाचा अंत समीप आला असें तिला भासूं लागे. आई परत येतांच मात्र त्याची नेहमींची कठोर वागणूक सुरू होई. सासूपासून जर आपण दूर राहिलों तर श्रीकान्त खचित आपल्याला सुख देतील, त्यांच्या उपजत प्रवृत्ती वाईट नाहींत असें राहून-राहून तिच्या मनांत येई.

हळू-हळू दीना म्हणजे घरांत कुणालाहि नको असणारें पण कुठेंहि न जाऊं शकणारें माणूस बनूं लागली. उघडउघड सासू तसें बजावूंहि लागली तिला. आपल्यापुढें कसलें पान वाढून ठेवलें आहे ह्याची बिचारीला कल्पनाहि करवेना.

एक दिवस मात्र सर्व गोष्टी स्पष्ट झाल्या. ...

त्या दिवशीं श्रीला यायला उशीर व्हायचा असल्यानें ती लवकरच झोपीं जाण्याच्या बेतांत होती. थोड्या वेळांत तिला झोंपहि लागली असती. इतक्यांत आंतल्या बाजूला सासूबाई जाग्या असून हळू-हळू कुणाजवळ तरी बोलत आहेत असा तिला संशय आला. पडल्या-पडल्या ऐकण्याचा तिनें प्रयत्नहि करून पाहिला. किंचित् काल श्वसनक्रिया अवरोधूनहि पाहिली. पण शब्द कानांवर इतके अस्पष्ट पडत होते कीं दरवाज्याजवळ गेल्याशिवाय ते कळणें शक्य नव्हतें.

त्या कुणाशीं बोलत असाव्या ?... तिनें उत्सुकतेनें शक्ति नसतांनाहि उठण्याचा यत्न केला. दाराशीं जाणें व थोडा वेळ तेथें उभें राहणें आपल्याला सहन होणार नाहीं हें तिलाहि समजत होतें. पण मनाची अधीरता

स्वस्थच बसूं देईना!

तशीच ती उठली. ...

आणि दाराशीं येतांच वीष ओतणारें संभाषण तिच्या कानीं पडलें. आंत श्रीकान्ताजवळ सासूबाई बोलत असल्याचें तिला लागलींच समजलें. श्रीनें अगदीं हलक्या आवाजांत व कांहींशा त्राग्यानें आईला विचारल्याचें तिनें ऐकलें :

" मग आई करूं तरी काय मी? तें तरी स्पष्ट सांग!"

त्याबरोबर आई अधिकारी वाणीनें सांगूं लागली.

" तुला वाईट वाटेल म्हणून मी आजपर्यंत कांहीं बोललें नाहीं. पण आतां मात्र मी सांगतें तसंच वागायला हवं. दीना नेहमींच आजारी राहणारसं नक्की वाटतंय्. वैद्यांनीं देखील नाहीं का परवां सांगितलं? तुझ्यासारख्या तरुण माणसानं आजारी बायकोची सेवा करायची तरी किती दिवस? नेहमीं पाहतें — बायकोनं नवऱ्याची सेवा करायच्या ऐवजीं आपल्या घरांत उलटंच दिसतं! मला मुळींच नाहीं सहन होत. तुझं लग्न दीनेशीं लावण्यांत चूकच झाली आणि ती मी सुधारणार आहें आतां."

" ती कशी सुधारणार तूं?" श्रीनें कांहींशा कंपित स्वरांत विचारलें. त्याच्यावर योग्य तो परिणाम करण्यासाठीं म्हणूनच कीं काय श्रीची आई अधिकच निग्रही वाणीनें सांगूं लागली—

" सांगतें ऐक. वैद्याकडून दीनेच्या तोंडावर स्पष्ट सांगायचं कीं 'तूं आतां सुधारणं शक्य नाहीं.' तशी खात्रीच पटवायची तिची. इतकं झालं कीं मी सांगतें त्या मुलीशीं तुला लग्न करावं लागेल ..."

"लग्न? पुन्हां लग्न?" कंपित स्वरानें श्रीनें पुन्हःपुन्हां तो शब्द उच्चारला!

" हो. लग्नच!"

दाराच्या बाहेर ऐकत राहिलेल्या दीनेनें मनावर असह्य प्रहार झाल्यामुळें कीं काय किंकाळी फोडण्याचा यत्न केला. शब्द तोंडांतल्या तोंडांतच राहिले. ती मात्र धाडकन् खालीं आपटली.

आवाज ऐकतांच काय प्रकार असावा तें सासूबाईंनीं कल्पनेनेंच ओळखलें. आपला डाव दीनेला कळल्याचें मनांत येऊन त्या कांहीं वेळ स्तिमित झाल्या. पण लागलीच त्यांनीं विचार केला— "दुसऱ्या लग्नाची बातमी

तिला कळली हें बरंच झालं. दुःखाचा पहिला उमाळा निघून गेला की तितकंच चांगलं. लग्नांत विघ्न यायची धास्ती तरी नाहीं राहणार !' श्रीच्या प्रयत्नानें दीना त्या वेळीं शुद्धीवर आली; पण मनांत मात्र अधिकाधिक कष्टी होऊं लागली.

आणि आईच्या विरुद्ध जायची श्रीची प्राज्ञा नसल्यानें त्याच्या दुसऱ्या लग्नाच्या जमवाजमवीस सुरुवातहि झाली.

आजारी असली तरी भरल्या संसारांत जिवंत सवत येऊन शिरावी असें दीनेला वाटणें शक्यच नसल्यानें तिनें सासूची व श्रीची जेवढी म्हणून निर्भत्सना करतां येईल तेवढी करायला सुरुवात केली. तिला मनांत एक-सारखें वाटूं लागे– ' सासूबाई जरी वाईट असल्या तरी श्रीकान्त मूळचे वाईट नाहींत ! ' ' लग्न ?– दुसरं लग्न ?– ' असें आईजवळ बोलतांना जो कंप त्याच्या स्वरांत ऐकल्याचें तिला स्मरत होतें त्याच्या आधारानें तिनें मनाशीं अनुमान बांधलें होतें कीं श्री कांहीं झालें तरी दुसऱ्या लग्नाला तयार होणार नाहीं !

प्रथम तशी श्रीची इच्छा नव्हतीहि. पण सकाळ-संध्याकाळ त्याच्या कानांवर आईचा तोच-तोच उपदेश पडूं लागल्यानें त्यालाहि शंका येऊं लागली कीं खरोखरच आईचें बोलणें हिताचें कशावरून नसेल ?

त्यांतच उद्विग्न झालेल्या दीनेकडून त्राग्याच्या स्वरांत केलेली निर्भत्सना कानांवर पडूं लागली तसतशी श्रीच्या मनाची खात्री पटूं लागली कीं आईच्या म्हणण्याप्रमाणें वागणेंच श्रेयस्कर.

अखेरीस श्रीच्या आईनें त्याचें दुसरें लग्न चतुरेशीं लावून आपलें म्हणणें खरें केलें.

दीनेनें शक्य तेवढा प्रतिकार केला. तिच्या सासूला तिनें आपला भयं-कर अपमान केल्याप्रमाणें वाटलें आणि म्हणूनच तिची रवानगी माहेरीं करण्यांत आली.

दीनेनें मुलाला बरोबर नेलें. आणि श्रीकान्त-चतुरा यांचा संसार आईच्या अंमलाखालीं सुरूहि झाला.

दीनेचा वडील भाऊ ह्या घटनेमुळें विलक्षण चिडला. दीनेच्या आईनीं– माईनीं – तर इतका शोक केला कीं त्यांचें ह्या दुःखानें बरें-वाईट तर नाहीं ना

होणार अशी धास्ती पडली सगळ्यांना. दीना तर स्वतःशीं असें म्हणालीहि कीं ‘ माई आपल्यामुळं जाणार असं जर आपल्याला कळलं असतं तर आपण इथं आलोंच नसतों – तसंच जाऊन कुठं तरी जीव दिला असता.’ माईचा अंत जरी झाला नाहीं तरी अंतःकरणाला झालेल्या वेदनांमुळें त्यांना अशक्तपणा आला. त्यांतच दुखण्यानें घेरलें त्यांना. उलट दीनेचा भाऊ– यशवंतदादा – चवताळलेल्या नागाप्रमाणें श्रीला दंश करायला तयार झाला. दादा कांहीं श्रीमान् नव्हता. त्याचा संसार वाढता होता. पण आपल्या प्रिय भगिनीची केवळ श्रीमंतीच्या जोरावर श्रीनें जी अवहेलना केली ती त्याला असह्य झाली. ऐपत बेताची असूनहि श्रीवर त्यानें दीने-तर्फे पोटगीचा दावा दिला. त्यासाठीं वाटेल तसा खर्चाहि केला.

पण असहाय अबलांना कायदा तरी पुरेसें संरक्षण कुठें देतो ! निकाल दीनेच्या बाजूचा होऊन श्रीनें दीनेला दरमहा दहा रुपये द्यावे असें ठरलें. दहा रुपयांची रक्कम ती किती ? त्यांत मुलगा व स्वतः आई ह्यांनीं आपलें पोट कसें भागवायचें ? आपली किंमत सारी दहाच रुपये ठरल्याचें पाहून दीनेला देखील वाईट वाटलें. असली अपमानास्पद पोटगी स्वीकारूं नये असेंहि वाटलें तिला. पण चोराच्या हातची लंगोटी असें समजून ती स्वीकारणें भावानें भागच पाडलें.

भावाच्या आसऱ्याला राहूं लागल्यावर तिच्या मनाचा पूर्वी अनेक बाजूंनीं होणारा कोंडमारा कमी होऊं लागला. भयाण रानांत एकाकी सांपडलेल्या प्रवाशाप्रमाणें आतां वाटेनासें झालें. भावाच्या सुखी संसाराकडे बघत ती वेळ घालवूं लागली. माईची मायाळू मूर्ति सहानुभूतीसाठीं आसुसलेल्या दीनेच्या मनाला विरंगुळा पाडूं लागली.

आणि दीनेनें हळू-हळू ठरवूनच टाकलें कीं सासरच्या आठवणी देखील मनांत येऊं द्यायच्या नाहींत. इतकेंच नाहीं तर आपण जवळजवळ विधवाच आहोंत असें ती मानूं लागली. मनाला निरनिराळ्या गोष्टींत रमवून कष्टी जीवनाचा विसर पाडण्याची ती संवय लावून घेऊं लागली.

शिशिरच्या कोवळ्या मनावर परिस्थितीमुळें जे परिणाम होत होते ते ती बारकाईनें बघत होती. वयाच्या मानानें त्याची बुद्धि बरीच प्रगल्भ झालेली पाहून तिला अतिशय समाधान वाटूं लागलें. आपल्या वडिलांनीं आईला

छळल्याची जाणीव होऊन त्यांच्याबद्दलचा तिट्कारा त्याच्या ठिकाणीं अल्प प्रमाणांत उत्पन्न झाला. आणि कष्टी आईला दुखवायचें नाहीं असें ठरवून तो वागूं लागला. म्हणूनच दीनेला त्याचें कौतुक वाटे. दीना जर कधीं विषण्ण मनानें बसली असली तर तो सगळा खेळ बाजूस सारून तिच्याकडे बघत राही. तिच्या डोळ्यांत जर अश्रू दिसले तर त्याचे डोळे सजल होत. तिच्या मानेला विळखा घालून अत्यंत प्रेमळपणानें तो दीनेला विचारी :

" आई, कोणीं काय ग केलं तुला ? "

यामुळें तिला अधिक भडभडून येई. शिशिर लागलीच आपलें रडणें आवरून तिच्या डोळ्यांत बघत म्हणे :

" आई, मी आहें ना तुला ?... मग ग कां रडतेस ? "

आणि तिच्या कष्टी मनोवृत्तीला प्रफुल्लित करायला हा एवढासा प्रश्नहि पुरेसा होई. त्याला चटकन् पोटाशीं घेऊन ती अभिमानानें म्हणे :

" माझा शिशिर... मोठा झाला कीं मला खरोखरी सुखी करील. "

भावाकडे आल्यापासून दीनेचा वेळ जरी मोकळेपणानें जात होता, सर्वांच्या सहानुभूतीचें केंद्रस्थान बनल्यानें ती जरी आनंदांत होती, तरी ती आल्यापासून माईची प्रकृति जी बिघडत चालली ती एक मोठीच दुःखदायी परिस्थिति निर्माण करण्यास कारणीभूत झाली.

माईचा आजार म्हातारपणचा तर खराच, पण आवडत्या मुलीला माहेरीं यावें लागल्यामुळें त्यांच्या मनाला धक्का बसला. त्याचेंच रूपान्तर आजारांत होऊन त्या बऱ्या होण्याचीं चिन्हें पुष्कळच कमी-कमी होत चाललीं.

आणि माईची प्रकृति जसजशी खालावत होती तसतशी दीनेची प्रकृति सुधारत होती.

याचा अर्थ ती पूर्ण बरी झाली असा नाहीं. पण बदललेल्या परिस्थितीचा परिणाम तिच्यावर होत होता.

* * *

पूर्वायुष्याच्या चित्रपटांतले देखावे झरझर पुढून जात असतांच कोपऱ्यांतला कंदिल अनपेक्षितपणें भडकल्यासारखा झाला. शिशिरच्या अंगावरचा

हात काढून ती उठली. तिनें कंदिल बारीक केला. पण तो अधिक भडकूं लागल्यानें तिनें तो मालवूनहि टाकला. मालवतांना एकदम काळोख होऊन आपल्याला भीति वाटेल असेंहि वाटलें तिला...

पण तसें कांहीं झालें नाहीं. ढगांच्या तावडींतून सुटलेला चंद्र किरणांच्या रूपानें तिला धीर देत होता. तिनें खिडकी उघडतांच खोलींतल्या अणु-रेणूंवर गर्दीनें घुसणाऱ्या किरणांनीं प्रसन्न शान्तता पसरविली. दीना हलकेच उठली व बाहेर पाहूं लागली. स्वर्गांतल्या कावडी उपड्या होऊन त्यांतलें दूधच तर हें सगळीकडे पसरलें नाहीं ना !

क्षणांत ती आपलें दुःख विसरली. समोरील देखाव्यांत मन रमून गेलें. खिडकीच्या समोर खूप अंतरावर एक उंचशी टेंकडी दिसत होती. तिच्या-पुढील झाडी आईच्या अंगाला बिलगून निजणाऱ्या बालिकेप्रमाणें भासली तिला. आणि वळणा-वळणानें टेंकडीकडून गांवापर्यंत येणारा रस्ता सुस्त होऊन पडलेल्या नागाप्रमाणें वाटला. कांहीं वेळापूर्वी पसरलेला अंधार जाऊन आतांची ही व्यक्तता चंद्रामुळें आली. आपल्या जीवनांत देखील असाच कुणी चंद्र नाहीं का उगवणार !

ती टेंकडीच्याहि पलीकडे पाहण्याचा यत्न करूं लागली.

दूर ... दूर जावेंसें वाटूं लागलें तिला. जरा वेळ ती स्तब्ध झाली. भाव-नांची खळबळ शान्त झाल्यासारखी भासली. तिचे डोळेहि भारावल्यासारखे होऊन मिटले गेले आणि कल्पनेनें दूर-दूर पाहतां-पाहतां तिला भासूं लागलें — आपण खूप मोठ्या सागरावर एकट्याच जात आहोंत होडींतून; लाटा उचंबळून येत आहेत; चंद्रप्रकाशांत हिऱ्यांच्या तेजानें चमकणारें पाणी मोहून टाकीत आहे; पाण्याचे तुषार अंगावर उडतांच मोहरून जात आहे मन. तोंच कुणा बाईनें येऊन आपल्या नावेला भगदाड पाडलें. पाणी खिदळत आंत घुसूं लागलें. होडी बुडणार ! घाबरून गेलों आपण. ... इतक्यांत कुणीं सुंदर पुरुषानें चटकन् पुढें होऊन तें भगदाड बंद केलें. आपली दृष्टि त्याच्यावरच खिळली. काय त्याचें तेज ! तो काय करतो हें बघण्याऐवजीं त्याच्या सौंदर्याचेंच अतृप्ततेनें दर्शन घेऊं लागलों आपण...भग-दाड पाडणारी बाई पलीकडे पाण्यांत तडफडत होती... तो महापुरुष आपल्या

समोर उभा राहिला. कृतज्ञतेनें आपण म्हटलें ' केवढे उपकार केलेत माझ्यावर ! चांडाळीण बुडवणारच होती मला. पण मला वांचवण्यासाठीं तुम्हीं देखील जीव धोक्यांत घातलात आपला !' तो पुरुष किंचित् हंसला नि म्हणाला ' जीव गेला असता म्हणून काय बिघडलं असतं ! जीवन हें तरी देण्यासाठींच असतं नाहीं का !'

इतक्यांत माईंनीं क्षीण आवाजांत हांक मारल्यानें ती भानावर आली. माईंच्या खोलींत जातांना तो भास सारखा तरंगत होता डोळ्यांपुढें आणि स्वतःलाच ती विचारीत होती "काय बरं त्या भासाचा अर्थ ?"

---

# २

दीना माईजवळ आली तेव्हां त्यांना खोकल्याची ढांस आली असल्यानें त्यांनीं दीनेला खुणेनेंच बसायला सांगितलें. माईच्या आजारांत ती तासन्‌तास जवळ बसत असे. पण आपण होऊन तसें करण्याला माईनीं कधीं सांगितलें नाहीं. साहजिकच माईच्या हांकेचें आज तिला नवल वाटलें. माईच्या मागें जाऊन आपल्या कृश हातांनीं त्यांचीं कानशिलें दाबून धरलीं तिनें आणि खोकला थांबतांच पाणी दिलें त्यांना घोटभर.

थोडी हुशारी वाटतांच माईनीं पुन्हां म्हटलें–

"दीना, जरा वेळ इथून हलूं नकोस."

"असं काय सांगतेस आज ?" घाबरून दीनेनें म्हटलें. "मी नव्यानं का आलें आहे घरांत ? कीं बसत नाहीं कधीं तुझ्याजवळ ?"

"तें खरं ग !" माईनीं विचित्र दृष्टि करीत आवंडा गिळला व आपला क्षीण हात उगीचच पांघरुणाशीं चाळवला. "दीना, किती श्रम घेतेस माझ्यासाठीं तें दिसत का नाहीं मला ? – मग बसत नाहींस असं कसं बरं म्हणेन ? पण आज ..."

त्या घुटमळल्या. गळा भरून आल्यासारखें त्यांना झालें.

"पण– आज काय झालं माई ?"

"नेहमीं मला कांऽहीं सांगायचं नसे. तासभर बसलीस काय नि दोन तास बसलीस काय सारखंच भासे मला. आज तसं नाहीं. खूप बोलायचंय मला !" पुन्हा आवंडा गिळून नवी शक्ति अंगांत संचरल्याप्रमाणें डोळ्यांची उघडझांप करीत दीनेचा हात त्यांनीं हातांत घेतला.

दीना चटकन्‌ जवळ बसली. माईच्या शब्दाशब्दामागून कसलें तरी भीषण भवितव्य डोकावत असल्यासारखा तिला उगीचच भास होऊं लागला.

"बाळ, तूं लहान असतांना हा हात हातांत घेतला कीं माझ्या मनाला किती शांत वाटत असे." शांत वातावरण असतांना विशाल वृक्षाचीं वाळलेलीं पानें जशीं सावकाशपणें खालीं पडत असतात त्याप्रमाणें माईच्या

तोंडून शब्द बाहेर पडत होते. "हा हात सोन्यामोत्यांच्या बांगड्यांनीं भरलेला पाहायचं नशिबीं असावं असं वाटे. तोच हात माझ्या हातांत घेतांना मला बघ कसा चटका बसतो आहे! भाजल्यासारखं होतंय बघ अंगभर."

"आई!– नको ग असं बोलूं कांहीं तरी!"

"मनांत असेल नसेल तें बोलून टाकूं दे मला. दीना, तुझ्या वडिलांची फार इच्छा होती कीं मुलगी श्रीमंताला देण्यापेक्षां स्वावलंबी स्वतंत्र विचारांच्या माणसाला द्यावी. पण मींच त्यांना तसं करूं दिलं नाहीं. त्यांच्या मताप्रमाणं तुझ्यासाठीं ठिकाणं शोधून काढतांच मींच त्यांची निर्भत्सना केली. त्यांच्या अंतःकरणाला माझं बोलणं लागत असे. माझ्या डोळ्यांवर कसली झांपड आली होती कोण जाणे! श्रीमंत ठिकाण शोधणं मीं त्यांना भागच पाडलं नि तुझ्या साऱ्या आयुष्याचा नाश केला... फेडीन तरी कुठं हें पाप!..."

"पाप कसलं ग त्यांत! नशिबीं असणाऱ्या गोष्टी व्हायच्या टळतील का कधीं!"

"नशिबाला उगीच बोल लावण्यांत काय अर्थ! जाणूनबुजून केलं खरं मीं... एकदां त्यांनीं प्रेमानं सांगितलं कीं श्रीमंतीच्या आश्रयाला गुणी सात्त्विक मनोवृत्ति क्वचित्च असते. मुलीच्या बापानं पैशाच्या तिजोरीवर दृष्टि ठेवून मुलीचं लग्न ठरवणं धोक्याचं असतं... मीं त्यावर त्यांना वाटेल तसं बोललें. दीनेबद्दल तुम्हांला प्रेमच नाहीं असंहि म्हटलं... मनाला बोचलं त्यांच्या. त्यानंतर कधीं त्यांनीं आपलं म्हणणं माझ्यासमोर मांडलं नाहीं. श्रीकान्ताचं ठिकाण सुचवतांच त्यानीं विरोध केला नाहीं. पण त्यांच्या मनाला झालेली जखम भरून मात्र कधीं आली नाहीं. मला कांहीं काळ विजयाचा आनंद झाला. मागाहून सासरनं जेव्हां तुझीं विचित्र पत्रं यायला लागलीं तेव्हां मला जाणीव झाली कीं त्यांचं न ऐकण्यांत केवढी चूक केली आपण!... जन्माची दुबळी करून टाकली तुला! किती दुष्ट आहें मी!"

त्यांना इतकें भडभडून आलें कीं त्यांचे पुढले शब्द आंतल्या आंत विराम पावले. आपण कांहीं भयंकर कृत्य केल्याची जाणीव असूनहि जर ती व्यक्त करायची वेळ आली नाहीं तर आयुष्याच्या परिसीमेवर असणाऱ्या

माणसाला हृदय मोकळें करून ती जाणीव स्पष्ट करावी असें वाटायचेंच. आपल्यामुळें दीनेच्या संसाराचा विचका झाला ही भावनाच माईच्या आजाराच्या मुळाशीं असल्याचें अधिक स्पष्ट झालें.

माई मृत्यूच्या आसपास घुटमळत असल्याचें डॉक्टरांनीं यशवंताला सांगितलें असूनहि त्यानें दीनेला तें कळूं दिलें नाहीं. आधींच कष्टी झालेल्या भगिनीला अधिक दुःखी करण्यांत काय अर्थ! पण माईच्या दीर्घकालीन आजाराशीं झगडणाऱ्या कृश शरीराकडे बघून दीनेला तिचें भवितव्य हळुहळू स्पष्ट दिसूं लागलेंच. पतीनें तिरस्कारल्यानंतर ज्या प्रेमळ एकमेव आश्रयस्थानाकडे ती धांवत आली होती तेंच नाहींसें व्हायची कल्पना तिला सहनहि होईना. गेलीं संकटें तीं कांहींच नाहींत. कारण माईनंतर खरोखर पोरकी होणार आपण अशा कल्पनेनें भकास वाटूं लागलें तिला. आणि माईनीं हांक मारण्यापूर्वी शिशिरला घेऊन खिडकीजवळ ती निजली होती ती तरी अशाच मनःस्थितींत.

वास्तविक बरीच रात्र होईपर्यंत माईजवळच ती जागत बसली होती. माईना खोकल्याची ढांस आज अधिक जोरानें येत असल्यानें आपण जवळच असावें असें तिला वाटलें. रात्रीं बारांनंतर माईना श्रमानें कीं काय किंचित् ग्लानि आली. दीनेला त्या निजल्याप्रमाणें भास झाला. म्हणूनच ती उठून पलीकडे जाऊन निजली होती.

आणि इतका वेळ बसूनहि कांहीं न बोलणारी माई एकाएकीं एवढी हताश होऊन जणूं अखेरचेंच बोलण्यास सुरुवात करते आहे ह्याचें कारण तिला समजेना.

खरी गोष्ट अशी होती कीं गांवांतल्या नेहमींच्या डॉक्टरांनीं यशवंत-दादाला माईबद्दल जो गंभीर इषारा दिला तो त्याच्या अस्पष्टसा कानांवर आलाच होता. त्यांतच दादानें डॉ. मंगलांना बोलावण्याची जी धांदल केली तीमुळें तर सर्व गोष्टी स्पष्टच झाल्या. त्यांचें लक्ष्य आपल्या भोंवतालच्या ऐहिक गोष्टींचा विळखा कमी करण्याकडे विशेष लागलें.

दीनेशीं कळवळून झालेलें त्यांचें संभाषणसुद्धां ह्याचाच परिणाम होता.

बोलतांना माईनीं उघड केलेला स्वतःचा पश्चात्ताप दीनेला मनांतल्या मनांत खरा वाटत होता. त्या क्षणींहि तिच्या मनांत सहज असा विचार

येऊन गेला कीं खरोखर माईनें वडिलांच्या म्हणण्याला मान दिला असता तर आजची स्थिति कधींच प्राप्त झाली नसती. इनामदारीणबाई म्हणून लग्नानंतर समाजानें डोक्यावर चढवलें पण तोच समाज आपल्याला पुढें खोल दरींत फेकून देणार आहे हें ध्यानीं देखील आलें नाहीं तिच्या. गरीबाकडे पडल्यानें कदाचित् पोटभर अन्न मिळालें नसतें, पण प्रेमनिर्भर संसारांतलें अर्धपोटीं जिणें देखील ह्या परिस्थितीपेक्षां चांगलें नाहीं का!

संसारी जीवनासाठीं आसावलेल्या मनांत अशा अनेक कल्पना उसळूं लागल्यावर तिनेंच स्वतःची समजूत घातली. माईची इच्छा तेव्हांचा हट्ट धरण्यांतसुद्धां चांगलीच होती. मी सुखी व्हावें असेंच नव्हतें का ती चिंतीत! परिणाम उलट झाला त्याला ती काय करणार!

आईच्या मनांत उत्पन्न झालेलें वादळ शांत करण्याच्या हेतूनें तिनें प्रेमळ आवाजांत म्हटलें— "माई, उगीच मनाला लावून घेऊं नको. तुझ्या-मुळं माझ्या संसाराची वाताहात झाली असं कधीं तरी मीं म्हटलं का?"

"म्हटलं असतंस तर किती बरं झालं असतं! पण मुकाट्यानं कुणालाहि न दुखावतां तूं जें सारं सहन केलंस त्यानंच माझ्या मनाला अधिक त्रास होतो." त्या थांबल्या. बोलण्याची शक्ति संपत आली होती जणूं. "आतां मला बोलायचंय तें पुढल्या गोष्टींबद्दल..."

दीना अधिकच उत्सुकतेनें बघूं लागली.

"आतां किनई, फार दिवस जगत नाहीं मी.... दादा निजलाय ना तिकडे?"

"तूंच नाहीं का त्याला निजायला जायला सांगितलंस?"

"खरंच. विसरलेंच मी. एकटीच आहेस खोलींत तर?"

"हो."

"मग ऐक. मी मरणार लवकरच. मला नक्की समजतंय तें. दीना, अशी खिन्न होऊं नको. मी मेल्यावर घाबरून जाऊं नको. दादाकडे राह्यचं शक्य तेवढं टाळ. त्याचं तुझ्यावर पुष्कळ प्रेम आहे. तुला अंतर देणार नाहीं तो. पण त्याचाहि संसार वाढता आहे. त्याच्यावर आपला भार टाकणं बरं नाहीं."

किंचित् थांबून दीनेच्या तोंडावरून दृष्टि फिरवून त्या पुढें म्हणाल्या—

" तूं कुठं तरी जावंस हें चांगलं. मी किती जुन्या चालीची आहें माहित आहे तुला. तूं लहान असतांना दादाचे मित्र आले कीं त्यांच्याशीं बोलायला जायचीस. मला तें देखील खपत नसे. कधीं घराच्या बाहेर जाऊं दिली नाहीं.... पण आतां मन पोळून निघालं आहे.... जे शब्द बोलतांना जीभ तुटून पडेल असं मला वाटायचं तें शांतपणानं बोलणार आहें. ... तुझ्या आयुष्याची नासाडी झालेली जिवंत असतांना पाहिली तेवढी पुरे झाली. माझ्या मागं तरी ती अधिक होऊं नये. "

" मग म्हणणं तरी काय तुझं ? "

" मी मेल्यावर कुठं तरी नोकरी धर. दादाजवळ राहूं नकोस. सासरच्या माणसांशीं कसला देखील संबंध ठेवूं नकोस. आणि श्रीकान्ताला न विचारतां आपल्या मनाप्रमाणं खुशाल कुणाशीं तरी ... ... "

" माई– माई– काय बोलतेस हें ?"

" तें तूंच समज. वाटतं तितकं तें भयंकर नाहीं. लहानपणापासून तुझ्याप्रमाणं राहायची माझ्यावर वेळ आली असती तर मला देखील नीटपणानं दिवस काढणं कठिण गेलं असतं. ... शांतपणानं विचार कर. "

थोड्या वेळानें त्या पुढें म्हणाल्या :

" ज्या परिस्थितींत तूं असशील तींत जो मार्ग तुला सोयिस्कर वाटेल तो सुखासाठीं स्वीकार. लग्न म्हणजे मंगलाक्षता पडण्याचा विधि तो तुझा एकदां झाला. पण त्यांतच तुझ्याबद्दल माझ्याकडून जी चूक झाली ती सुधारल्याचं समाधान तुला कोणती मोकळीक दिल्यानं लाभेल मला ? ... पुष्कळ विचार केला ... एकच मार्ग दिसतोय मला... प्रामाणिकपणा मात्र पाहा आणि तिथं निष्ठेनं राहा एवढंच सांगायचंय्. ... तसं करण्यांत आपल्या हातून पाप घडेल अशी भीति वाटते आहे का तुला ?"

" नाहीं का वाटणार माई ? "

" वेडे, तूं धडधडीत जिवंत असतांना श्रीकान्तानं दुसरं लग्न करण्यांत जर कांहीं पाप नाहीं तर तुला कां तसं वाटावं ? कोणता अपराध केलास म्हणून त्यानं तुझा त्याग करावा ? नको, अधिक बोलत नाहीं मी... माझं डोकं चढून जाईल. वात होईल मला. ... जा, जरा जाऊन नीटनीट विचार करून उत्तर द्यायला ये."

आणि माईंनीं डोळे मिटूनच घेतले. दीना अस्वस्थ चित्तानें दूर झाली.

अंथरुणावर पडतांच तिचें लक्ष्य उघड्या खिडकींतून बाहेर गेलें. बाहेर तारकांची मन प्रसन्न करणारी शोभा आभाळांत पसरली होती. तिच्या मनांत मात्र भयंकर उल्कापात होऊं पाहत होते.

पहाटेपर्यंत ती तळमळत होती. माईहि तोंपर्यंत निश्चल पडून होत्या. पांचच्या सुमारास माईंनीं तिला हांक मारली.

ती जवळ येतांच आशापूर्ण दृष्टीनें तिच्याकडे माई बघत राहिल्या.

" दीना, ठरलं ना ? " साऱ्या जीविताची सफलता जणूं दीनेच्या उत्तरांत सामावली आहे असें त्यांना भासत असावें इतक्या अधीर मनानें त्यांनीं दीनेला विचारलें.

मोठ्या प्रयासानें दीनेनें थांबवून ठेवलेला आसवांचा ओघ एकदम उफाळून आला. काय उत्तर द्यायचें तें तिनें ठरवलेंहि होतें. हृदयाचे धाड्-धाड् असे ठोके पडत असूनहि उत्तर देण्याच्या दिव्यांतून पार पडायचें होतें तिला. तिचा निश्चय माईंनीं प्रत्यक्ष प्रश्न करतांच एकदम ढांसळला. बाल्यावस्थेपासून मनावर झालेले सारे संस्कार जणूं तोंडाशी येऊन उभे राहिले नि तिला बोलवेनासें झालें.

" बोल ग दीना. हो म्हण. मग ... मग माझी कसलीसुद्धां आशा राहणार नाहीं."

" माई, कितीहि विचार केला तरी उत्तर काय द्यावं तें समजत नाहीं. पुराणांतल्या स्त्रियांच्या गोष्टी लहानपणीं तूंच ना सांगत असस ? "

" हो. पण त्यांचे पतिराज पतिदेव होते. सीता रावणानं पळवून नेल्यावर तिच्या चिंतनांत दिवस घालवणारा राम ... कशाला त्यांची हल्लींच्या या पुरुषांशीं तुलना करायची ? तीं माणसं गेलीं, त्यांचे गुण देखील त्यांच्याच बरोबर गेले."

" मीं वचन तरी काय देऊं माई ?"

" सांगितलं तसं वागण्याचं. "

" माई ... " एवढेंच म्हणून दीनेनें आवंढा गिळला. तिच्या उघड्या डोळ्यांपुढें कितीतरी बरींवाईट दृश्यें चमकून गेलीं. पुन्हां संसार ... पुन्हां तीच गुलामगिरी ... पुन्हां तसलाच वनवास ! !

" माई, पुन्हां त्याच मार्गानं जाऊन माझा प्रश्न सुटेल असं वाटतं तुला ?"

" हो. "

" पुन्हां तसल्याच माणसांशीं गांठ पडली तर ? "

" ती कशी पडेल ? आतांची पारख तुझी तू करायची आहेस. वाईट माणसांच्या हवालीं तुला करणारी मी ह्यापुढं राहणार आहे कुठं ? "

दीना कांहीं बोलली नाहीं. उत्तर देण्यासाठीं साऱ्या अंगांतली शक्ति एकवटण्याची तिनें पराकाष्ठा केली आणि क्षणभरानें ती उत्तरली–

" माई, तुझ्या सांगण्याप्रमाणं वागण्याचा मी यत्न करीन. "

ती एकदम थांबली. विचित्र दडपण पडल्यानें कीं काय तिचें सारें अंग बधिर झाल्यासारखें झालें आणि क्षणभरानेंच हलकें-हलकें वाटूं लागलें तिला.

माईनीं मात्र सुखानें निःश्वास टाकीत म्हटलें–

" झालं. आतां मंगलांच्या भेटीखेरीज कशासाठीं देखील जगायचं नाहीं मला. मंगल यायची वेळ केव्हां होईल बरं ?"

दीनेनें घड्याळाकडे पाहून माईंना म्हटलें " येतील एवढ्यांतच ते. "

माईनीं तिचें उत्तर ऐकलें कीं नाहीं कोण जाणे. कारण ग्लानि येऊन त्यांचे डोळे त्या वेळीं मिटूनहि गेले होते. त्यांच्या अंगावरचें पांघरूण सारखें करून दीना खिडकीजवळ गेली.

आभाळ सहस्रावधि तेजःस्वी नेत्रांनीं तिच्याकडे बघत होतें. पश्चिमेकडील टेंकडीच्या वरून चंद्रबिंब तिच्याकडे प्रसन्नतेनें पाहूं लागलें. मंद समीर इतका वेळ तप्त झालेल्या तिच्या मस्तकाला थंडपणा आणूं लागला. समोर दिसणाऱ्या गांवांतला एकहि दिवा दिसत नसला तरी खूप लांबवरून झाडांझाडांतून वळणावळणानें मोटार येत असावी असें नागमोडी वळणानें पुढें-पुढें सरकणाऱ्या विजेच्या दिव्यांकडे पाहून तिला वाटलें. आणि ती मनाशीं म्हणाली ' डॉ. मंगलच येत नसतील कशावरून ह्या मोटारींतून ?'

पण दीनेला दिसणारे मोटारचे दिवे दिसेनासे झाले. मंगल आले नाहींत. त्यांच्यासारख्या सार्वजनिक कामांत गढलेल्या माणसाला स्वतःच्या कामासाठीं कधींतरी ठरल्या वेळीं जातां येतें कां ?

मोटार तशीच निघून गेली, पण दीनेच्या मनांत मात्र डॉ. मंगलांविषयींच विचार चालू झाले :

डॉ. मंगलांना लग्नापूर्वी आपण कधीं पाहिलें असेल तेवढेंच. दादाची त्यांच्याशीं मैत्री जमल्यानंतर आपली भेट झालीच नाहीं अजून. दादानें त्यांना घरीं राहायला आणायचा यत्न किती तरी वेळां केला असेल, पण नेहमीं त्यांचें कांहीं तरी काम निघायचें नि येण्याचा बेत रहित व्हायचा.

नंतर तासभरानें दीनेनें पाहिलेल्या रस्त्यानेंच डॉ. मंगलांची मोटार येत होती. त्या वेळीं त्यांच्या डोळ्यांपुढें सारखी माईचीच मूर्ति उभी राहत होती. दीनेच्या विवाहानंतर त्यांची झालेली ओळख, त्यांचें आपल्यावर असलेलें उत्कट प्रेम, या गोष्टी आठवून त्यांना वाटलें माईंना भेटण्यासाठीं किती दिवसांत येऊं शकलों नाहीं आपण आणि येतों आहों ते त्या मृत्युशय्येवर पडल्या असतांना. पण त्यांनीं असाहि विचार केला कीं आपण येण्यासाठीं प्रयत्न केला नाहीं असें थोडेंच आहे, अडचणीच पुढें उभ्या राहत त्याला कोण काय करणार !

आज मात्र माई अत्यवस्थ असल्यामुळें तावडतोब निघून येण्याविषयींची तार हातांत पडली तेव्हां मंगलांनीं अनेक महत्त्वाचींहि कामें बाजूला ठेवलीं आणि ते तसेच निघाले.

मोटारींत असतांना दीनेबद्दल विचार क्वचित्च त्यांच्या मनांत आला असेल. कारण तिला प्रत्यक्ष बघितल्याला बरींच वर्षें झालीं होतीं.

तरी पण जेव्हां तिच्याबद्दल आठवण झाली तेव्हां ते स्वतःलाच विचारूं लागले– ' पूर्वीप्रमाणंच दीना आजहि असेल का ?'

माईनींच एकदां डोळ्यांत पाणी आणून त्यांना दीनेचीं वाढतीं दुःखें सांगितलीं होतीं. वास्तविक त्या वेळीं दीनेला माहेरीं टाकलेली नव्हती. तिच्याकडून दादाला जीं पत्रें येत त्यांतल्या हकीगतीवरूनच माई मंगलांजवळ बोलल्या होत्या, आणि तो योग देखील अचानक आला होता.

त्यांच्या गांवांत कॉलऱ्याची सांथ फैलावल्यामुळें यशवंतदादानें कुठें तरी बाहेरगांवीं जायचें ठरवलें. ठाण्यास असलेल्या मंगलांच्या दवाखान्याची त्याला माहिती होतीच. मंगलहि थोडे ओळखीचे झालेले होते. म्हणून त्यांच्याचकडे जायचें त्यानें निश्चित केलें.

एकाच स्वभावाचीं व आयुष्याकडे पाहण्याच्या एकाच दृष्टिकोनाचीं माणसें एकत्र जमल्यावर त्यांची गाढ मैत्री न जमली तरच नवल म्हणायचें.

दादा व मंगल यांच्याहि ओळखीचें गाढ मैत्रींत रूपान्तर असेंच झालें.

माईचा प्रेमळ स्वभाव मंगलांना इतका आवडला कीं त्यांना ते आई-प्रमाणें मानूं लागले.

आणि म्हणूनच मोटारींत असतांना ते त्यांच्याच प्रकृतीबद्दल सारखा विचार करीत होते.

दीनेबद्दल मनांत आलेले विचार माईच्या घरांत पाऊल टाकतांच नाहींसे झाले. नंतरच्या चारहि दिवसांत घरांत राहत असूनहि मंगलांना दीनेजवळ बोलायलाच सांपडलें नाहीं. माईचा आजार बऱ्याकडे झुकता, तर कदाचित् माईनींच उभयतांची ओळख करून दिली असती. पण मंगलांशीं फार काळ त्या बोलूंहि शकल्या नाहींत. ते येतांच खोकल्याची असह्य ढांस लागून त्या ज्या घाबरून बेशुद्ध झाल्या त्या अखेरपर्यंत.

कड्याच्या कांठावर उभें राहिलें असतांनाच पायांखालचा कातळ तुटून पडावा तसें माईच्या मृत्यूमुळें दीनेला झालें. मनुष्याचें एखाद्याच व्यक्तीवर उत्कट प्रेम असलें आणि तीच व्यक्ति मृत्यु पावली तर त्याला असें वाटूं लागतें कीं पूर्वींच्याच उत्कटतेनें दुसऱ्या कुणावर तरी प्रेम करायला सुरुवात करावी, त्याशिवाय दुःख सहन करणें शक्य नाहीं. पण मन इतकें हळुवार बनतें कीं प्रेम कोणावर करायचें हें ठरविण्याची शक्तिच राहत नाहीं, आणि प्रेमाचें मूळचें स्वरूप पूर्णपणानें बदलूनहि जातें त्या अवस्थेंत. दीनेची मनःस्थिति तशीच झाली. माईचें चित्र मनांतून नाहींसें व्हायला कांहीं काल जाणें प्राप्त होतें. पण झाल्या गोष्टी विसरून जाणें ही मनाची सहजप्रवृत्तिच असल्यामुळें आपल्या मनांतलें रिकामें होणारें माईचें स्थान कुणाकडून तरी घेतलें जाण्याची व त्या व्यक्तीवर माईवर होतें तेवढेंच उत्कट प्रेम जडण्याची तिच्या मनाची तयारी होऊं लागली.

मंगलांची अवस्था मात्र घरांतच येऊन राहिल्यानें विचित्र होऊन गेली. महत्त्वाचीं कामें टाकून आल्यामुळें परत जाण्यासाठीं त्यांचें मन ओढ घेत होतें आणि आईप्रमाणें मानलेल्या माईच्या मृत्यूमुळें कांहीं करण्याची प्रसन्नताच मनांत राहिली नव्हती त्यांच्या. तियेंच खिन्न मनानें ते राहिले.

मृत्यूनंतर दोन दिवसांनीं दीना रडत बसली होती. दादानें तिची किती समजूत घालण्याचा यत्न केला पण प्रेमळ बोलण्यानें अधिकच हुंदका तिला

येऊं लागला. तेव्हां दादानें मंगलांनाच सांगितलें कीं 'दीनेला फिरायला ने, म्हणजे मोकळ्या हवेमुळें तरी दुःख विसरेल ती.'

मंगलांना तसें करणें प्रशस्त वाटलें नाहीं. पण दादानें फारच आग्रह केल्यामुळें तिला घेऊन जाणें भागच पडलें त्यांना.

चालतां-चालतां मोकळ्या हवेचा परिणाम झाल्यानें कीं काय दीनेनें समाधानाचा निःश्वास सोडला.

मंगल बरोबर गेले, पण दीनेशीं बोलायचें कसें हें मात्र त्यांना सुचेना.

ह्यापूर्वी दीनेजवळ मंगल मुळींच बोलले नव्हते असें नाहीं. माई मृत्युशय्येवर असतांना दोन-तीनदां तरी त्यांना मुसुंब्याचा रस पाजण्याबद्दल मंगलांनीं दीनेला सांगितलें होतें, अंगावरचें सरकलेलें पांघरूण सारखें करण्याबद्दल सुचवलें होतें, आणि माई जेव्हां गार पडायला लागल्या तेव्हां दोघांनीं त्यांच्या सर्वांगाला ब्रँडी चोळली होती.

पण असें असूनहि दीनेला खरोखर आपण बघितली देखील नाहीं असें मंगलांना वाटत होतें. माईच्या प्रकृतीच्या चिंतेत गर्क असल्यानें तसें करणें त्यांना शक्यच झालें नाहीं.

आणि म्हणूनच कीं काय बोलायचें कसें तें सुचत नाहींसें पाहून निदान तिला डोळाभर पाहून तरी घ्यावी असें त्यांनीं ठरवलें.

दीनेची कृश पण रेखीव शरीरयष्टि, लांबलचक भासणारीं कलात्मक बोटें, आजारामुळें निःस्तेज दिसणारा तिचा वर्ण, डोक्यावरच्या केसांची कांहींशी निराश भासणारी तळमळ, चालतां-चालतां कसल्या तरी दुःखद प्रसंगाची जाणीव झाल्यानें पण तें इतरांना न सांगण्याच्या निश्चयानें खालच्या ओठाची डावी कड वरच्या फिकट ओठानें दाबण्याची तिची लकब, पूर्वीच्या सौंदर्यपूर्ण असणाऱ्या भुंवया, घारवट पण कष्टी डोळे, शांतपणानें हालचाल करणारीं बुबुळें... या सर्वांना बघून मूर्तिमंत कष्ट नि असमाधान या दुहेरी दुःखांच्या मिश्रणानें बनवलेलें चित्रच तर दीनेच्या रूपानें हळू-हळू चालत नाहीं ना असा त्यांना भास झाला.

दीनेच्या सध्यांच्या ह्या स्थितीची पूर्वी पाहिलेल्या तिच्या निरोगी प्रकृतीशीं ते तुलना करूं लागले आणि कितीतरी फरक तिच्यांत पडल्याचें त्यांना दिसून आलें.

तिचा खिन्नपणा घालवण्याच्या हेतूनें मंगलांनीं म्हटलें अखेरीस–

" दीनाताई, त्या पक्ष्यांच्या थव्याकडे पाहा." आभाळांतून जाणाऱ्य शुभ्र रंगाच्या पक्ष्यांच्या थव्याकडे त्यांनीं बोट दाखविलें.

" म्हणजे काय होईल ? " दीनेनें विचारलें.

" तुमचं दुःख कमी होईल. "

" तें कसं ? "

" लहान असतांना आईच्या पंखांखालीं दिवसरात्र बसत होते ते. थोड मोठेपणा येतांच आईनं त्यांना वाऱ्यावर सोडून दिलं. आईला विसरूनहि गेले असतील ते. आणि तरीहि आनंदानं उंच भरारी मारीतच आहेत त्यांच्यापैकीं कित्येकांच्या आया जिवंतहि नसतील. पण ते रडत क बसतात ?"

" जीवनांत आनंद निर्माण करणं पक्ष्यांना शक्य असलं तरी माणसांन तसं वाटत नाहीं. त्यांतच आम्हां बायकांना तर नाहींच वाटणार. त्यांच जीवनच दुसऱ्यांच्या ताब्यांत. मग कसला आनंद निर्माण करणार त्या ?'

पायांपुढचा बारीकसा दगड बाजूला उडवीत मंगलांनीं म्हटलें–

" आनंदाच्या कल्पना मोठ्या विचित्र दिसतात तुमच्या ! "

" त्या कशा ? "

" नाहीं तर असं म्हणवलं नसतं तुम्हांला ! "

" आनंद हा मानण्यावर असतो असं वेदान्ती प्रवचन का ऐकवायच आहे मला ? "

" छे ! मी प्रवचनकार नाहीं. माझ्या आनंदाची कल्पना निराळी आहे म्हणून म्हटलं तसं. माझा आनंद माझ्याचप्रमाणं कुणालाहि निर्माण करतं येतो. मग ती व्यक्ति स्त्री असो पुरुष असो, गरीब असो श्रीमंत असो, स्वर्गीतली देवता असो नाहीं तर समाजानं तिरस्कारलेली सामान्य स्त्री असो. दीनाताई, तुमच्यावर अनेक दुःखं आलीं ही गोष्ट खरी, पण मला देखील दुःख म्हणजे काय हें चांगलं समजतं. दुःखांनीं वेढल्यामुळं एके काळीं माझ्या मनाची देखील आपला जन्म दुःख भोगण्यासाठींच तर नाहीं ना झाला असं वाटण्यापर्यंत अवस्था गेली होती. पण नाहीं ! मला दुःखांतच कसा आनंद उत्पन्न करायचा तें समजलं."

दीनेनें प्रत्यक्ष कांहींच विचारलें नाहीं. तरी पण ती अशा कांहीं मुद्रेनें मंगलांकडे बघत होती कीं त्यांना वाटलें 'मला सांगाल का ती युक्ति?' असेंच ती जणूं विचारीत आहे. म्हणूनच ते पुढें म्हणाले—

"दीनाताई, खरा आनंद त्यागांत आहे, दुसऱ्याच्या दुःखाचं निवारण करतांना पडणाऱ्या कष्टांत आहे, अन्यायानं भरडल्या जाणाऱ्या हतभागी जीवांना सोडवण्यांत आहे. त्याग करण्यासाठीं मला पैसा लागत नाहीं. खरं सांगायचं म्हणजे मनुष्याचं जीवनच मुळीं दुसऱ्याला कांहींतरी देण्यासाठीं आहे."

कसली तरी स्मृति जागृत झाल्याप्रमाणें दीना किंचित् दचकली.

"मी त्यागांतून मिळणाऱ्या आनंदाचा उपभोग लहानपणापासून घेत आलों आहें. तुम्हांला वाटतं आपणावर आभाळ कोसळलं दुःखाचं! तुमच्यापुरतं जोंपर्यंत पाहत आहांत तोंपर्यंत असंच वाटणार. पण दृष्टि जरा विशाल करा. उंच-उंच जावं तों-तों क्षितिज विस्तारत जातं, जों-जों विशाल नजरेनं संसारापलीकडील जगाकडे बघाल तों-तों तुम्हाला वाटूं लागेल आपलं दुःख कांहींच नाहीं. भोंवतालच्या जगांत मनुष्यानंच मनुष्यासाठीं उत्पन्न केलेल्या दुःखांमुळं अनेक माणसं कीटकांप्रमाणं मरत आहेत आणि तसं पाहण्याची संवय लावून घेतलीत तर स्वतःच्या दुःखाचा विचार देखील मनांत येणार नाहीं."

"भोंवतालचं जग!... माझ्या भोंवतालचं जग!" एवढेंच ती आपल्याशीं दोनदां पुटपुटली.

मंगल पुढें म्हणाले—

"तुमच्या मनःस्थितीची जाणीव मला आहे, आणि म्हणूनच मी म्हणतों तुम्हीं स्वतःपलीकडे कधीं बघितलं नाहींत आणि उगीच शरीराची खराबी करून घेतलीत!"

धांवत जाणाऱ्या माणसाला एकदम कुणीं अडवण्याचा यत्न करतांच तो जसा अनपेक्षितपणानें दुसऱ्या वाटेकडे वळतो तसें दीनेला झालें. तिच्या मनांतले दुःखी विचार कुठच्या कुठें नाहींसे झाले आणि अगदीं नवीनच प्रश्न तिच्यापुढें उभा राहिला—

"स्वतःच्या पलीकडलं जग!"

आपण कधीं तरी ह्या जगाचा विचार केला आहे का हें ती आठवत होती जणूं. मंगल म्हणाले–

"तुम्हांला पाहिल्यापासून, विशेषतः तुमच्या कष्टी डोळ्यांकडे पाहून, मला सारखं वाटतं आहे कीं आपली भेट ह्यापूर्वींच झाली असती तर बरं झालं असतं."

"काय केलं असतंत तुम्हीं?"

"दुःखाकडे बघण्याचा तुमचा दृष्टिकोणच बदलून टाकला असता. आणि माईंच्या डोळ्यांना जी रडव्या तोंडाची दीना दिसत होती ती दिसली नसती!"

जादूगारानें एखादा प्रयोग करून प्रेक्षकांना स्तिमित केल्यावर ते ज्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागतात त्याचप्रमाणें मंगलांकडे दीनेनें बघितलें.

मंगलांचा सारा इतिहास डोळ्यांपुढें उभा राहून ते प्रत्यक्ष होते त्यापेक्षां कितीतरी थोर दिसूं लागले तिला. दीनेला माहित होतें कीं मंगलांचीं आजचीं मतें उगीच बनलेलीं नाहींत. लहानपणीं इतर मुलांप्रमाणेंच ते सामान्य होते. त्यांचे वडील निष्ठुर सावकार असल्यानें कुळांना खांबाला बांधून चाबकानें फोडल्याचें अनेक वेळां त्यांना पाहायला मिळालें आणि त्यांच्या वृत्तींत फरक होऊं लागला. हळू-हळू त्यांना असेंहि आढळून येऊं लागलें कीं आपलेच वडील निर्दय आहेत असें नाहीं. अज्ञान व दरिद्री जनतेला अनेक अन्यायी मार्गांनीं नागवणारे सावकार निरनिराळ्या बुरख्यांखालीं समाजांत वावरत आहेत. बापाच्या पश्चात् त्यांची दृष्टि समाजाकडे वळली. गरीबांवर वडिलांकडून होणारा अन्याय दूर करण्याचा जसा त्यांनीं घरांत यथाशक्ति यत्न केला तसा आतां समाजांतले अन्याय दूर करण्याच्याहि तयारीला ते लागले. मंगलांबद्दलच्या आदरानें तिचें मन इतकें भारावून गेलें कीं ती कांहीं वेळ मुळींच बोलूं शकली नाहीं.

आणि त्यांतच मंगलांच्या बोलण्यानें तिच्या मनांत वादळ उत्पन्न केलें. तिलाहि स्पष्ट वाटूं लागलें कीं खरोखरच आपण स्वतःपलीकडे कधीं बघितलें नाहीं. माहेर–सासर, माई–दादा, या जवळच्याच माणसांपलीकडे जगांत माणसें आहेत आणि त्यांतलीं कित्येक आपल्याहून अधिक दुःखी आहेत ह्याचा कधीं विचारच केला नाहीं आपण.

गांवाबाहेर पडेपर्यंत तिच्या मनांत तसलेच विचार येत होते.

तेथें जातांच कातळावर बसल्यावर दीनेला सहानुभूतीचा ओलावा देण्याच्या कल्पनेनें मंगलांनीं विचारलें—

" दीनाताई, मला कांहीं विचारायचं आहे तुम्हांला. विचारूं का ? "

" विचारा कीं ! "

" तुम्ही मोकळेपणानं बोलत कां नाहीं ? तुमची माई मलाहि आई-प्रमाणं जवळची वाटत असे. मनांतला कोणताहि विचार त्या मजजवळ बोलायला मागं-पुढं बघत नसत. तुम्हींहि तसाच मोकळेपणा दाखवावात."

" मी बोलत नाहीं त्याचं कारण निराळं आहे. तुम्ही इतके थोर आहांत कीं माझ्यासारख्या हतभागिनीनं तुमच्यापुढं बोललेलं बरं दिसेल कीं नाहीं तेंच समजत नाहीं मला."

" तुमची सारी हकीकत तुमच्याचकडून ऐकायची आहे मला. सांगाल का ?"

मंगलांच्या ह्या आपलेपणाच्या नि जिव्हाळयाच्या प्रश्नानें जणूं आपली माईच आपल्याला तो प्रश्न विचारीत आहे कीं काय असें भासून ती आपला दुःखपूर्ण इतिहास हळूहळू त्यांच्यापाशीं सांगूं लागली.

त्या वेळीं सूर्याचीं सायंकाळचीं तांबूस किरणें संतापानें आरक्त होत गेलेल्या तिच्या तोंडावर पडल्यानें मंगलांना तिच्या एरवींच्या फिक्कट चेहऱ्यावरहि मोहकतेची सूक्ष्म छटा दिसली. बोलतांना कपाळावरची फुगीरपणानें उठून दिसणारी शीर अधिकच स्पष्ट दिसत होती. रक्तांतल्या बिंदुबिंदूंतला सासरविषयींचा द्वेष उसळून तोंडावाटे निघत असल्यानें कीं काय तिचें सारें अंग हादरत होतें. सांगण्याच्या भरांत ती स्वतःला इतकी विसरून गेली कीं छातीवरचा पदर थोडा सरकला तोहि सारखा करण्याचें भान तिला राहिलें नाहीं. मंगलांना मात्र दीनेच्या निःशक्त शरीराकडे बघून चटका बसला— ' सौख्यांत टवटवीत राहून दुसऱ्यांना ताजं ठेवण्याच्या लायकीचं हें फूल किती कोमेजून गेलं आहे ! '

शेवटीं ती म्हणाली—

" किती शांतपणानं ऐकलंत सारं ! "

" मला संवय आहे तशी. "

" संवय ? "

" हो. आमच्या आश्रमांत नेहमींच करुण कहाण्या ऐकाव्या लागतात."

" नेहमीं तेंच-तेंच ऐकावं लागल्यानं मनावर कांहींच परिणाम होत नसेल तुमच्या ? "

" दीनाताई, तुमचा इतिहास ऐकून दुसऱ्या कानानं सोडून देण्यासाठीं मीं विचारला नाहीं. "

" तसं नाहीं हं. चुकलें मी. "

" तुमचा त्यांत दोष नाहीं. नेहमींच वाईट माणसांची गांठ पडली कीं मनुष्य असाच संशयी बनतो. "

नंतर मंगलांनीं कांहींतरी विचारण्यासाठीं मनाची तयारी केली.

मग त्यांनीं विचारलें—

" ह्यापुढं काय करायच ठरवलं आहे तुम्हीं ? "

" खरं म्हणजे मीं विचारच नाहीं केला अद्याप." ती किंचित् थांबली. विचारावें कीं नाहीं ह्याबद्दल क्षणभरच तिच्या मनांत चलबिचल झाली. शेवटीं ती म्हणाली—

" मीं काय करावं असं तुमचं मत आहे ? "

" मीं कांहीं सांगितलं नि तुम्हांला नाहीं पटलं तें तर ? "

" तुम्हीं सांगितलेलं मला का पटणार नाहीं ? "

असें म्हणतांना दीनेनें असा कांहीं गूढ भाव प्रदर्शित केला कीं मंगलांच्या देखील तो सहज ध्यानीं आला नाहीं.

" दीनाताई, मला वाटतं तुम्हीं ह्यापुढं इथं न राहतां माझ्या आश्रमांत यावं. स्वतःपलीकडे केवढं मोठं जग पसरलं आहे तें तिथं तुम्हांला पाहायला मिळेल, स्वतःचीं दुःखं बाजूस सारून दुसऱ्यांचीं दुःखं कशीं निवारण करावींत तें तिथं शिकायला मिळेल, आणि आपल्यासारखाच इतरांवरहि होतां कामा नये म्हणून अन्याय दिसेल तिथं प्रहार करायचे धडे माझ्या आश्रमांत तुम्हांला घ्यायला मिळतील."

" माईनं इथं राहूं नको म्हणून सांगितल्यापासूनच मला प्रश्न पडला होता कीं जायचं कुठं ? कुणाकडे गेलं नि आगींतून निघून फुफाट्यांत पडल्यासारखं झालं तर ?— किती-किती कल्पना येऊन गेल्या मनांत !"

" पण आतां ? "

" तुम्हांला प्रत्यक्ष बघितल्यापासून मला वाटूं लागलं आहे कीं जग हें केवळ दुष्ट माणसांनींच भरलेलं नाहीं. तुमच्यासारखीं थोर माणसं वावरत आहेत आणि दुसऱ्यांना उपयोगी पडत आहेत. मघांशीं तुमचं आयुष्याचं तत्त्वज्ञान ऐकून तर मनांत ठरवलंच मीं कीं आपणहि तुमच्याचप्रमाणं आयुष्य घालवायचं. मला स्वतःच्या जगाचा कंटाळा आला. कुठं तरी दूर — दुसऱ्याच कुठच्या तरी जगांत — जावंसं वाटूं लागलं आहे मला. पण माझ्यासारखी खेडवळ स्त्री उपयोगी पडेल का तुमच्या आश्रमांत ? "

" माझ्या सर्व चळवळी अन्यायाविरुद्ध असतात. अन्याय दिसला कीं सर्प दिसतांच जसा फटका मारतात तसा मी प्रहार करायला सिद्ध असतों. पण सर्व चळवळींचा पाया त्याग हाच असल्यानं तुम्ही जर त्यागी बनलांत तर खेडवळपणासारख्या बाकीच्या गोष्टी मुळींच आड यायच्या नाहींत तुमच्या. "

" स्वार्थ आतां कुणासाठीं करायचा ? दुसऱ्यांना कांहींतरी देण्यांतच मौज आहे असं म्हणतां तुम्ही. मला देखील अनुभवायची आहे ती मौज."

" अन्यायाविरुद्ध प्रहार करतांना अंगीं प्रखरपणा धारण करावा लागतो — जिवाची देखील पर्वा नाहीं करून चालत. "

" माझ्यांतला आहे तो स्वार्थहि सूर्योदयानंतर निस्तेज होत जाणाऱ्या चंद्राप्रमाणंच हळू-हळू नाहींसा होईल. "

" मला काव्य नाहीं समजत दीनाताई ! "

" मग काय समजतं ? "

" दुसऱ्यांचीं दुःखं. "

दीना कौतुकानें हंसली आणि उभयतांनीं पुढले बेत त्याच वेळीं ठरवून टाकले.

मंगलांना मदतनीस म्हणून दीनेनें आश्रमाच्या दवाखान्यांत काम करायचें आणि नर्सिंगचें शिक्षण घ्यायचें असें निश्चित झालें.

घरीं यायला तीं दोघें निघणार तोंच शिशिरची बालमूर्ति धांवत येत असलेली पाहून दीना उत्सुकतेनें पुढें निघाली.

मंगलांना तिच्या हालचालींत पूर्वी कधींहि न दिसलेला जिवंतपणा दिसला.

शिशिरला उचलण्यासाठीं तिनें हात पुढें केले होते. आपल्या निःशक्त प्रकृतीची जाणीव होऊन तिनें लवूनच त्याचा गोडसा पापा घेतला. आईच्या त्या कृतींतल्या उत्कटतेवरून तिच्या वृत्तींत पडलेला फरक त्याच्याहि चटकन् ध्यानीं आला. तो लागलींच म्हणाला—

" आई, किती जोरानं पापा घेतलास ?... आज तूं अशी ग काय दिसतेस ? "

" म्हणजे रे कशी ? "

" तें नाहीं मला ठाऊक, पण छान दिसतेस खरी ! "

" मला किनई आज खूप-खूप आनंद झालाय्. "

" आनंद ? तो कशानं ग ? "

" झालाय आपला उगीच ! "

असें म्हणतांच तिनें शिशिरचा पुन्हां एकदां कौतुकानें पापा घेतला आणि तसें करतां-करतां मध्येंच मंगलांकडे तिनें गोड कटाक्ष टाकला.

मातेच्या वत्सलतेचा तो उद्रेक पाहण्यांत मंगल इतके तल्लीन झाले होते कीं तिनें आपल्याकडे केव्हां पाहिलें हें त्यांच्या ध्यानींहि आलें नाहीं.

---

लागलें कीं चतुरेनेंच प्रत्येक गोष्ट करावी हेंच उत्तम, तीच व्यवस्थेनें करील कोणतेंहि काम.

आळसाच्या नि स्वत:विषयींच्या न्यूनभावनेच्या आहारीं माणूस किती लवकर नि नकळत जातो ह्याचें मूर्तिमंत उदाहरणच श्री बनला. चतुरेनें थोड्याच काळांत सर्व व्यवहार आपल्या हातांत घेऊन श्रीच्या नांवानें हुकूम सोडायला सुरुवात केली. खायचें, प्यायचें नि चतुरेच्या लहरीच्या तालावर पावलें टाकायचीं एवढेंच त्याचें काम.

आजच पाहा ना –

स्टेशन जवळ आलेंसें वाटतांच श्री उठला व त्यानें सामान आवरायला सुरुवात केली. गादी गुंडाळून बर्थमध्यें सगळे कपडे घातले. बॅग भरून कुलूपहि लावलें. तसें करतांना चुकून त्याचा हात चतुरेच्या जवळच निजलेल्या तिच्या आवडत्या मांजरीला लागला. तिनें म्यांव् करून रागानें किंकाळी फोडली! त्यासरशीं चतुराहि जागी झाली. श्रीचें काम चाललेलें पाहतांच ती जी उठली ती सरळ त्याच्या हातांतून कपडे ओढून घेण्यासाठींच.

" तुम्हांला सांगितलं होतं ना कीं तुम्ही आपले स्वस्थ निजा म्हणून ? "

" अग पण स्टेशन जवळ आलं ! "

" अर्धा तास आहे अजून. पांच मिनिटं देखील सामान आवरायला नाहीं लागत. "

" माझं सामान मींच आवरलं तर काय बिघडलं ? "

" नको म्हटलं ना मी ऽ ? तुम्हांला तें जमायचं नाहीं. कशीं तरी चिरगुटं कोंबाल अन् मला फिरून भरायला लागतील बॅगमध्यें. खिडकी-जवळ बसा कसे ! मी सारं करीन. स्टेशनांत गाडी उभी राहिल्यावर मी सांगेन उतरायला तेव्हां उतरा म्हणजे झालं ! "

मांजरीनेंहि तेवढ्यांत म्यांव् करून मालकिणीला पुष्टि दिली. चतुरेनें चटकन् पांघरूण ओढून घेऊन झोंपण्याचा यत्न केला.

श्री एकदमच थिजल्यासारखा झाला.

आपल्याभोंवतालीं केवढी प्रचंड तटबंदी उभारण्यांत आली आहे ह्याची त्याला जाणीव होई. बाळगलेल्या मनी मांजरीपेक्षां त्याची व्यवस्था

अधिक काळजीनें करण्यांत येत होती हें खरें, पण मनीला जेवढें स्वातंत्र्य होतें तेवढेंहि त्याला नव्हतें. दीना घरांत असतांना त्याला पुष्कळ स्वतंत्रता होती. कारण परावलंबन एकांगी होतें तेव्हां. आईच्या शब्दाबाहेर जायचें नाहीं म्हणजे झालें. आईबद्दल कधीं राग आलाच तर दीनेला बोलून तो काढण्याचा मार्ग मोकळा होता. पण आतां सर्वच बदललें होतें. दोन मोठाल्या भिंती दोन्ही बाजूंना उभ्या होत्या. जगाकडे बघायचें तें आई नि चतुरा यांच्या दृष्टींतूनच. कुणावर उपकार करायचे ते त्यांच्या हातूनच. इतकेंच काय पण विचार करायचा तो देखील दोघींचें म्हणणें ऐकून त्याप्रमाणेंच. ह्या अवस्थेची जाणीव त्याला कधीं-कधीं अस्वस्थ करी. पण स्वतःचा दुबळेपणा आठवताच तो भानावर येई. परिस्थितीपुढें मान लववण्यांतच शहाणपणा आहे असें त्याला वाटे.

आज देखील त्याला अशाच तऱ्हेनें शांत व्हावें लागलें होतें.

एवढ्यांत चतुरा उठली.

जवळची मनीहि पाठ कमानदार करून शेंपटी उंचावीत चतुरेकडे बघत म्यांव् करीत राहिली.

" मने, आलं बरं का आपलं गांव ! "

आणि मनीला घेऊन कुरवाळलें तिनें. मांजरीनें देखील गुरगुर करीत तिच्या गालावरून शेंपटी फिरवीत प्रेमळपणाचा स्वीकार केला. चतुरेनें मनीचें तोंड डाव्या हातानें अलगद धरून आपल्या डोळ्यांजवळ नेलें.

जवळ आलेलीं तीं दोन तोंडें पाहून श्रीकांताच्या मनांत विचार येऊन गेला — किती साम्य आहे या दोन जीवांत ! मनी पण उंदराला खेळवून आपली करमणूक करून घेते : चतुराहि मला तशीच नाचवते. फरक एवढाच कीं मनी पुढें त्या उंदराला मारणार असते, आणि चतुरेचें नाचवणें मला जिवंत ठेवण्यासाठीं आहे !

ती मांजरी चतुरेची अत्यंत आवडती, तर तितकाच श्रीला तिजबद्दल तिट्कारा ! तसा मनीचा रंग शुभ्र असल्यानें तो मोहक वाटे. तिची बसण्याची ऐट मोठी आकर्षक असे. ती कधीं-कधीं जवळ येऊन आपलें मऊमऊ अंग घांसू लागली पायाला कीं चटकन् तिला उचलून घ्यायची इच्छा होई कुणालाहि. पण श्रीला मात्र तसें कधीं वाटलें नाहीं. चतुरेच्या-

बद्दल कधीं-कधीं वाटणारा पण कधींच व्यक्त न करतां येणारा अंतःस्थ तिरस्कार मांजरीच्याबद्दल दाखवून मनाचें समाधान तो करीत होता कीं काय कोण जाणे! मनी चतुरेची होती म्हणूनच तिच्या पाठींत काठी मारण्याचें धैर्य मात्र त्याला कधीं झालें नाहीं.

मनीबद्दलच्या श्रीच्या कठोर वागणुकीचा चतुरेला राग येई. तिच्या माहेरहून आलेली मनी किती झालें तरी पाठराखीण म्हणूनच आली होती! लग्नापूर्वींपासूनच मनीचा लळा चतुरेला लागलेला होता. सासरीं येऊन स्वतंत्रता मिळायला लागल्यावर मनी फारच लाडकी बनली. श्रीला मनी-साठीं चांगलाच खर्च पडूं लागला. आपल्यापासून चतुरा तिला केव्हांच दूर होऊं देत नसे. दिल्ली-आग्र्यापर्यंत मनीला बरोबर न्यायला-देखील चतुरेनें मागें-पुढें पाहिलें नाहीं.

चतुरेनें मनीच्या कानाशीं तोंड नेऊन म्हटलें—

" मने, त्यांच्याजवळ जा कीं! "

" माफ करा हं! "

" इतके कां चिडतां बिचारीवर? जरा जवळ तर घेऊन पाहा ना. "

" राहूं द्या आहे तिथंच. "

" किती गोड आहे पण! लाडांत तरी कशी आली आहे! "

" मांजर तें, किती लाडांत आलं तरी जात्या दुष्टच तें. "

" नि माणसं नसतात कीं काय दुष्ट? "

" असतात कीं! पण तसल्या व्यक्तींशीं आपण संबंध तरी ठेवतों का? "

" नुसता संबंधच का? चांगला जन्माचा संबंध देखील जोडतात कांहीं माणसं तशा व्यक्तींशीं! मागाहून माहेरीं पोंचवतात हें निराळं! "

चतुरेनें दिलेला टोमणा श्रीच्या चटकन् ध्यानीं आला. दीनेला उद्देशून तिचें वाक्य होतें. स्वतःचा श्रेष्ठपणा प्रस्थापित करायला दुसऱ्यांना कनिष्ठ ठरवणें चतुरेसारख्या माणसांना भाग पडतें. दीना वाईट होती, दुष्ट होती, तिच्या अंगीं अनेक दुर्गुण होते, अशा प्रकारची भलतीच समजूत श्रीची ती वारंवार करून देत होती. श्रीला दीनेचा स्वभाव पूर्ण माहित असल्यामें आरंभीं त्यानें चतुरेच्या असल्या बोलण्याचा फारसा विचारच केला नाहीं कधीं. पण दीनेच्या अंगांत नसतील त्या दोषांचें आरोप करण्याच्या चतुरेच्या

उतलच्या प्रयत्नानें श्रीलाहि कांहीं दिवसांनीं वाटूं लागलें– 'दीनाच हिला कां बरं वाईट दिसावी ? तशी ती खरोखरच वाईट नसेल ना ?'

चतुरेची दीनेविषयींची ही वृत्ति श्रीला आवडत नसे. 'दीना आतां माहेरीं गेली, दरमहा दहा रुपये देण्यापलीकडे तिचा-आपला काय संबंध ? उगीच तिला वाईट-वाईट म्हणण्यापासून काय फायदा ?'– एकटाच बसला असतांना असा विचार श्रीच्या मनांत येऊन जाई. चतुरेला मात्र तसें कधीं वाटलें नाहीं. दीनेबद्दलचा विचार श्रीच्या मनांत येऊंच द्यायचा नाहीं आणि जर तो आलाच तर तिचें चित्र जितकें विकृत दिसेल तेवढें दिसावें असा ती यत्न करूं लागली. मांजरीबद्दल बोलतांना उगीचच दीनेबद्दल तिनें जें वाक्य वापरलें तें तरी ह्याच हेतूनें.

चतुरेच्या अनपेक्षित टोमण्यानें श्री स्तिमित झाला. आंतल्या आंत खजिल होऊन मग जो तो बसला तो चतुरेची आवराआवर संपेपर्यंत. श्रीला कांहीं बोलावेंसें वाटत नव्हतें. त्यामुळेंच त्याचे डोळे सुस्तावल्यासारखे होऊं लागले.

गाडी जळगांवच्या स्टेशनजवळ आली कीं काय ह्या कल्पनेनें श्रीनें किंचित् गवचटपणानें विचारलें.

"काय बाईसाहेब ! उठायचं का आम्हीं ?"

"अं हं."

"मग केव्हां ?– गाडी थांबल्यावर ?"

"हो. गाडी उभी राहील. हमाल सगळं सामान बाहेर काढील. मग तुम्हांला उतरायला मी सांगेन."

"आणि तोंपर्यंत ?"

"माझ्याकडे बघत राहा !"

चतुरेच्या उत्तरानें श्रीला थोडें हंसूंहि आलें आणि थोडा रागहि आला.

ती दाराबाहेरच्या दोन्ही पितळी गजांना धरून उभी राहिली.

श्री खरोखरच तिच्याकडे पाहूं लागला.

जळगांव अजून कांहीं अंतरावर असल्यानें चतुरा कांहींशी वांकूनच गाडी जात होती त्या दिशेला बघत होती. तसें करतांना तिच्या ठिकाणीं भीतीचा लवलेशहि दिसत नव्हता. कपाळावर आलेले केस तेथेंच चिकटून बसले, तर कांहीं बंडखोरपणानें मागें उड्या मारूं लागले. पदराचा शेवटचा

भाग आभाळांतल्या पतंगाप्रमाणें वाऱ्याच्या झोताबरोबर डुलत होता. पूर्वेकडे क्षितिजावरून हळूच डोकावूं पाहणाऱ्या सूर्याची कोवळीं किरणें चतुरेच्या जात्याच तेजःस्वी व गौरवर्ण असलेल्या चेहऱ्याला अधिकच तजेला चढवीत होतीं. नेसलेल्या भारी किंमतीच्या पातळाची कांसेची जरीकिनार नागिणीच्या चपलतेनें वळवळत होती. मध्येंच तिनें नेत्र संकुचित करून बाघितलें. पुन्हां भुंवया उंचावल्या नि किंचित् गालांतल्या गालांत ती हंसली. तिच्या सुंदर डोळ्यांची जी विलोभनीय उघड-झांप त्या वेळीं झाली ती पाहून श्रीच्या मनांत कितीतरी उन्मत्त भावनांनीं कल्लोळ उसळविला. तिच्या सौंदर्यावर तो अत्यंत लुब्ध झालाच होता. तिच्या आकर्षक अवयवांची बारीकशी हालचालहि मोहून टाकीत असे त्याला. तिच्या पायांवर आपलें बुद्धिसर्वस्व वाहावें आणि त्याच्या मोबदल्यांत तिच्या सौंदर्याचा मनसोक्त उपभोग घ्यावा असें त्याला वाटे. त्यामुळेंच कीं काय चतुरेवरचा त्याचा राग फार काल टिकत नसे.

त्यांतूनहि श्रीचा राग लवकर घालवण्याचें चतुरेनेंहि एक प्रकारचें तंत्र ठरवूनच ठेवलें होतें.

श्रीला राग आला तर कांहीं तरी क्षुल्लक निमित्त काढून त्याच्या अगदीं जवळ ती येई; हृदयाला विरघळून टाकणाऱ्या आर्जवी स्वरानें त्याच्याशीं बोलायचा यत्न करी; त्याचीं बटणें उगीचच सारखीं करी; सदऱ्यावर दिसणारें सूत काढून टाकायला पाही. आणि एवढ्यानें देखील भागलें नाहीं तर ठेवणींतलें अस्त्र बाहेर काढून त्याच्यावर सोडी. लाडिकपणानें केलेली लगटहि कांहीं परिणाम करूं शकली नाहीं तर ती श्रीच्या समोर उभी राहून कांहींतरी बालिशपणानें थट्टा करी, आपल्या सुंदर डोळ्यांची मोहक हालचाल करूं लागे, ओठांची जोडी अशा कांहीं तऱ्हेनें इकडून तिकडे वळवी कीं श्री त्या उन्मत्त प्रेमदर्शनानें व्याकुळ होई ... आणि त्याचा राग कुठच्या कुठें निघून जाई.

आज देखील श्री कांहींसा रागावल्यासारखा भासला तिला. आणि म्हणूनच दारात उभी राहून ती बाहेर डोकावून पाहूं लागली.

श्री तिच्या मोहक देहाकडे बघत होता.

चतुराहि त्याच्या खिन्न नि रागीट चेहऱ्याकडे पाहत होती.

बराच वेळ तो स्तब्ध राहिला. निर्विकार चेहरा ठेवला त्यानें.

चतुरेनें त्याच्याकडे बघण्याचें सोडून दिलें आणि डब्याच्या दाराबाहेरील गजाला धरलेलीं बोटें अधिक घट्ट आवळून तिनें आपला उरोभाग पुढें काढला.

त्याबरोबर उजव्या हातावरचें पदराचें टोंक बाजूस सरकून मांसल दंडाचा गौरभाग श्रीला सहज दिसला. तिचें सर्वांग खरोखरच रेखीव होतें. आपल्या देहाचा कोणताहि भाग कुणाच्या दृष्टीस पडूं नये म्हणून ती फार जपत असे. त्यामुळेंच कीं काय जेव्हां दंडाचा भाग श्रीच्या दृष्टीस सहज पडला तेव्हां त्याकडे पाहत राहावेंसें वाटलें त्याला. तसा तो बघणार तोंच तिनें आपले उरोज उगीचच लाडिकपणानें साऱ्या शरीराला चटकन् हिसका देऊन हालविले. भडक रंगाच्या ब्लाऊझच्या आंतूनहि बाहेर डोकावण्यासाठीं धडपडणारीं तिचीं कुचाग्रें जेव्हां श्रीला स्पष्टपणें दिसलीं तेव्हां त्याचें भानच हरपलें. इतका वेळ बाहेर डोकावत असतांहि ती पडेल असें मनांतहि आलें नाहीं त्याच्या. पण सौंदर्याचें स्पष्ट दर्शन होतांच त्याच्या ठिकाणची सौंदर्य-लालसा जागृत झाली. आपल्या हातून कांहीं विचित्र गोष्ट घडल्याची जाणीव झाल्यानें कीं काय चतुराहि थोडी लाजली आणि त्या भरांत बाहेरच्या बाजूनें श्रीकडे तिनें पाहिलें.

आतां मात्र श्रीकांताचा राग कुठच्याकुठें गेला. एकदम तो म्हणाला—

" पडशील ना बाहेर— "

" पडलें तर पडलें. रागावलेल्या माणसांनी ... " तिचें म्हणणें पुरें होण्याच्या पूर्वीच श्रीनें तिला मागें ओढलें, आणि म्हणाला— " बाईसाहेब ! गेला बरं माझा राग. "

ती पण मग हंसूं लागली.

" कसा घालवला राग ?"

" म्हणजे नाटकच केलंस सारं ?"

" मग—? " हा शब्द उच्चारतांना तिनें इतक्या लाडिकपणानें श्रीकडे बघितलें कीं श्रीला वाटलें जणूं ती असेंच म्हणत आहे — ' मग — हवंच तसं करायला. नाटकांतल्या नटीप्रमाणंच हवं तुमच्यासारख्यांशीं वागायला. नाहीं तर तुम्ही पुरुष का ताब्यांत राहाल आमच्या ? '

श्रीनें तिला तशीच जवळ ओढली.

पण ती आली नाहीं. चटकन् बाजूला होऊन तिनें आपली लाडकी मनी मात्र श्रीपुढे टाकली नि छद्मी स्वरांत ती म्हणाली—

" जळगांव आलं म्हटलं जवळ ! नसलंच राहवत तर मनीला बसा कुरवाळीत ! "

आणि खरोखरच जळगांव स्टेशनाची केबिन श्रीच्या दृष्टीस पडली. विनोद तेथेंच विराम पावला.

" आतां तुम्हीं फक्त मनीला घ्यायचं हं ! "

" छान ! "

" साधं नाहीं तें काम. केव्हांच जाईल उडी मारून. "

" बाकीचं सगळं तूं करणार ? "

चतुरेनें हो म्हटलें आणि सर्व गोष्टी बिनबोभाट पार पाडल्या.

मोटारींतून घरीं जातांना श्रीच्या मनांत आलें —' प्रवास करायचा किती कंटाळा आपल्याला ! खर्चापरी खर्च होऊन शरीराची खराबी करणारं हें त्रासाचं विकत श्राद्ध घ्यायला नेहमींच आपली नाखुषी. चतुरेच्या आग्रहा-मुळंच केवळ आपण आग्र्यापर्यंत सहकुटुंब जाऊन आलों. आणि आयुष्यांत बायकोसह केलेला पहिलाच प्रवास म्हणूनच कीं काय आईनंहि पैशाची टंचाई भासूं दिली नाहीं.'

वास्तविक चतुरेशीं विवाह झाल्याबरोबरच दूर कुठें तरी फिरून यावला श्रीला पत्नीसह धाडण्याचा त्याच्या आईनें धूर्तपणानें विचार केला होता, कारण पूर्वीच्या सर्व गोष्टींचा त्याला पूर्ण विसर पाडणें जरूर होतें. पण दीनेच्या भावानें फिर्याद केल्यामुळें सर्वच गोष्टी तशाच राहिल्या. त्या अडचणी नाहींशा होऊन बराच काळ लोटला तेव्हांच चतुरेनें दिल्ली-आग्र्याला जायचा बेत सुचवला. आणि आईची परवानगी मिळून पंधरा दिवसांपूर्वींच उभयतांचा प्रवास सुरू झालेला होता.

घरांत गेल्यावर सामानाची सोडासोड करण्यांत बराच वेळ निघून गेला.

रात्रभर गाडींत असूनहि श्रीला फारसा त्रास झाला नव्हता. पण कुठें तरी पडावें थोडा वेळ, कुणी जवळ येऊं नये आपल्या, असें त्याला फार वाटूं लागून त्यानें खोलींत जाऊन आरामखुर्चीवर अंग टाकलें..

सामान जिथच्या तिथें ठेवल्यावर चतुरेचीहि धांदल कमी झाली.

प्रवासाबद्दलच्चीं इकडचीं-तिकडचीं बोलणीं चालली असतांना मध्येंच आठवण होऊन सासूबाई चतुरेच्या नांवाचें आलेलें एक पाकीट तिच्यापुढें टाकीत म्हणाल्या—

"हें बघ, दोन दिवसांपूर्वींच आलंय्. मीं कांहीं फोडलं-बिडलं नाहीं तें."

पत्र हातांत घेतांच तें कोणाचें असणार हें चतुरेच्या तावडतोब लक्ष्यांत आलें. तिची बालपणापासूनची मैत्रीण सरला ठाण्यास असे. तिला प्रवासास निघतांना तिनें एक पत्र धाडलें होतें व त्यांत आपला लग्नानंतरचा समाचार नि प्रवासास निघत असल्याबद्दलचें वर्तमान कळवून उत्सुकतेनें तिचीहि खुशाली विचारली होती. तिचेंच तें पत्र आलेलें होतें.

चतुरेचें मूळ पत्र सरलेला बऱ्याच वर्षांनीं गेलेलें होतें. त्यामुळें त्यांतल्या बारीक-सारीक प्रश्नांनाहि सरलेनें थट्टेच्या भाषेंत उत्तरें दिलीं होतीं. पण त्या पत्रानें एक नवीनच आग मात्र अकल्पितपणें लावली. कारण पाहिलीं सारीं थट्टेचीं उत्तरें संपल्यानंतर तिनें मोठ्या गंभीरपणानें म्हणून लिहिलें होतें—

"... आतां तुला महत्त्वाची वाटणारी बातमी सांगायची आहे. आमच्या इथल्या प्रसिद्ध डॉ. मंगलांची माहिती कदाचित् तुला नसेल. फार थोर गृहस्थ आहेत ते अशीच सर्वांची समजूत. कित्ती कित्ती चळवळी करीत असतात बाई! बिचाऱ्यांच्या ठिकाणीं स्वार्थ-बुद्धि कधी ती नाहींच. त्यांच्या आश्रमांतलं तें हॉस्पिटल, तें अनाथालय, ती मजुरांची संघटना, ... ठाण्यांतल्या कोणत्याहि चळवळींत त्यांचं नांव नाहीं असं नाहींच ... पण देवळांचे चकाकणारे कळस सोन्याचे असावेसे भासले तरी ते तसे असतातच असं नाहीं!

डॉ. मंगलांच्याबद्दल आमच्या मनांतदेखील आदर होता. कळ-व्याच्या पुलावर फिरायला ते मागं जात तेव्हां दुतर्फा बसलेल्या सर्व लहान-थोर माणसांच्या कौतुकाचा विषय होऊन जात ते. पण अलिकडे त्यांच्याबरोबर कुणी बाई हिंडायला लागल्यापासून सारं बदललं. तर्क-कुतर्क सुरू झाले. माझ्या तर असं कानांवर आलंय की वरून-वरून त्यांचे संबंध जितके दूरचे दिसतात तितके आंतून नाहींत.

तूं म्हणशील ' हें पुराण मला कशाला सांगत्ये आहेस ? '

तेंच आतां सांगतें. डॉ. मंगलांनीं मदतनीस म्हणून आणलेली ती बाई (–मदतनीस कोण-कोणत्या बाबतींत तें मात्र देव जाणे !–) माहित आहे कोण असेल ती ? सांगूं का मी ?– बाईसाहेब, दचकाल बरं ऐकून !... पण दचकलांत तर दचकलांत. सांगायला हवंच तुम्हांला.

तिचं नांव आहे दीना. ... तुमच्या यजमानांनीं माहेरीं टाकलेली पहिली बायकोच ती. आलं ध्यानांत ?

डॉ. मंगलांच्याबरोबर केंव्हांहि पाहा दीना आपली आहेच. कळव्याच्या पुलावर शेकडों माणसं बसलीं असतांना जवळ-जवळ चालायला कसं कांहीं वाटत नाहीं त्यांना कोण जाणे ! खेड्यांतून मंगलांबरोबर प्रचारासाठीं जायला, व्याख्यानं साजरीं करायला आणि मजुरांच्या एखाद्या संपाच्या सभेसच काय, पण शेतकऱ्यांच्या खंडबंदीच्या सभाहि भूषवायला बाई आपल्या हजर ! तुझ्या यजमानांची नि माझी मुळींच ओळख नाहीं. तरी पण त्यांना माझा प्रश्न विचार कीं महिन्याच्या महिन्याला दहा रुपये देऊन तुमच्या कीर्तीला काळिमा लावण्यासाठीं का तिला पगारी नोकर नेमली आहे तुम्हीं ? ... "

सरलेच्या पत्रांतला मजकूर चतुरेच्या साऱ्या अंगाचा दाह उडविण्यास पुरेसा झाला. तें वाचतांना ती संतापानें इतकी बेभान झाली कीं तिची आवडती मनी मध्येंच जवळ येऊन अंगाला अंग घासूं लागली तरी तिचें तिजकडे लक्ष्य गेलें नाहीं. तिच्या पाठीवरून तिनें नेहमींप्रमाणें हात फिरविला नाहीं किं तिचें तोंड नाजुक बोटांनीं आवळून नि आपल्या तोंडाजवळ नेऊन तिच्या घाऱ्या कावेबाज डोळ्यांत प्रेमानें बघितलें नाहीं.

पत्र वाचून संपतांच ती क्षणभर स्तब्ध झाली....

इतक्यांत सासूबाई तेथें आल्या.

"काय ग आहे पत्रांत ?" तिच्या रागीट मुद्रेकडे बघून त्यांनीं

"त्यांत नाहीं काय तेंच विचारा फक्त...."

"म्हणजे ?"

"तुमच्या पहिल्या सुनेनं सगळयांच्या तोंडाला चांगलंच काळं फांसा-यचं ठरवलं आहे."

आणि नंतर चतुरेनें पत्र खुलाशासह त्यांना वाचून दाखविलें. त्याहि संतप्त झाल्या.

श्री आपल्या खोलींत स्वस्थ पडलेला पाहून तर चतुरेच्या अंगाचा तिळपापड झाला.

"बसा, गच्च डोळे मिटून बसा." फणफणतच ती आंत शिरली.

"काय झालं ?" दचकूनच श्रीनें विचारलें.

"डोळे मिटून बसल्यावर काय व्हायचं शिल्लक राहील ? .. तुमच्या दीनेला मी बोलतें, पाण्यांत पाहतें, सासूबाईप्रमाणं तिच्यावर लाखोली वाहतें असं वाटतं नाहीं तुम्हांला ? हें पत्र वाचा नीट लक्ष्य देऊन."

श्रीनें पत्र सावकाशपणानें वाचायला सुरुवात केली. त्याच्या मुद्रेवर कस-कसा परिणाम होतो आहे त्याचें सूक्ष्म निरीक्षण करीत चतुरा उभी राहिली.

"दीना ... डॉ. मंगलकडे कशी गेली ?"

"आई मेल्यावर भावानं दिली असेल घालवून !"

"छे ! ... तसा वाईट नाहीं तो."

"तुम्हांला वाईट दिसतच नाहीं कोणी. विसरलेंच मी."

"चांगल्याला चांगलं म्हटलेलं देखील चालत नाहीं अं तुला ?"

"दीनादेखील वाईट नाहीं तुम्हांला दिसली ! म्हणतांच ना मज-जवळ आईसाठीं कराव्या लागल्या कांहीं गोष्टी म्हणून ? पण तिनंच ना आतां हे दिवे लावायला सुरुवात केली ?"

श्रीला अर्थात् कांहींच बोलवेना.

चतुरेनें त्याची अधिकच अवहेलना केली.

त्यांत भर घालण्यासाठींच कीं काय श्रीची आई आंत येऊन म्हणाली.

"पाह्यलंस ! माझंच म्हणणं शब्दशः खरं झालं. तिला माहेरीं पाठवतां-नाच मला वाटलं कीं ही अवदसा नांवाला काळिमा फांसणार. आमच्या माणसांनीं लौकिकासाठीं रक्त आटवलं, पण ह्या बाईसाहेब दुरूनच त्याची होळी करणार. श्री, अरे अजून तुझ्या अंगाचा भडका कसा होत नाहीं ? आहेस तरी कोण ? दुसरा कुणी पुरुष असता तर असल्या बायकोला त्या

कुंटिणखान्यांतून फटके मारीत घेऊन आला असवा. पण तुझ्या तोंडांतून रागाचा शब्दहि निघत नाहीं! ... शांतता शांतता धरायची तरी किती? सारं घर चहूंकडून पेटलं तरी दिवाणखान्यांत शांततेचा पाठ म्हणत बसणार तूं? देवा! देवा! कशाला रे श्रीला पुरुषाच्या जन्माला घातलंस?"

आपणहि कांहींतरी बोलणें जरूर आहेसें वाटून चतुरेनें सुरुवात केली–

"मी देखील कानीं-कपाळीं ओरडतें आहे कीं कांहींतरी कडक उपाय योजा. पण ह्यांना आपलं वाटतं दीना फार चांगली आहे."

"दीना चांगली? असं श्रीला वाटतं?"

"हो."

"आतां मात्र शर्थ झाली. तिला माहेरीं घालवली ती काय चांगली होती म्हणून? आम्हांला काय वेड लागलं होतं? आणि श्री, तुझी देखील नव्हती का खात्री झाली तिच्याबद्दल?"

श्री डोळे मिटून एक शब्दहि न बोलतां पडून राहिला.

आजीचा संताप त्या शांतपणानेंच उसळून आला–

"तें कांहीं नाहीं. दीनेकडून आपल्या घराण्याच्या लौकिकाला काळिमा लागलेला मला नाहीं खपायचा. तूं ताबडतोब नीघ. वकिलाची गांठ घे. दीनेवर कायदेशीर उपाय योजतां आला तर पाहा. तिच्याबरोबर शिशिरला तरी ठेवतां कामा नये. तिच्या दुर्गुणांची बाधा त्यालासुद्धां व्हायची. तो बिघडला तर आपलंच नांव वाईट होईल. दीनेवर जर कांहीं कायदेशीर इलाज करतां आला नाहीं तर शिशिरला परत आणण्याची तरी व्यवस्था कर. तेव्हांच दीनेबरोबर मुलाला पाठवीत नव्हतें मी. पण तुझाच दुबळेपणा आड आला."

दीनेला माहेरीं पाठवायचें ज्या वेळीं निश्चित झालें त्या वेळीं तिनें शिशिरला बरोबर न्यायचें नाहीं असेंच श्रीच्या आईचें म्हणणें होतें. माहेरीं जाण्याच्या आदल्या रात्रीं श्रीकांताची दीनेनें अत्यंत काकुळतीनें करुणा भाकली. श्री चार भिंतींच्या आंत एकटाच असला कीं चांगला असे. त्याचा मूळचा बरेपणा दीनेला माहित असल्यानेंच तिनें हा उपाय योजला होता. बराच वेळ तो आईच्या भीतीनें कबूल होत नव्हता. पण शिशिरला आपल्यापासून दूर ठेवण्यानें ह्या वयांत त्याला किती दुःख होईल

नि त्याचे कसे मानसिक हाल होतील हें दीनेनें स्पष्ट केलें. त्याबरोबर श्रीच्या हृदयावर परिणाम झाला. दीनेची शेवटची मागणी त्यानें कबूल केली. त्याच्या आईनेंहि मागाहून शिशिरला पाठवण्याची नाइलाजानें म्हणून परवानगी दिली. तिचा मात्र त्यांत धूर्तपणाच होता. कारण श्रीनें दुसरी बायको केल्यावर तिला होणारीं मुलेंच इस्टेटीला वारस व्हावींत अशी तिची इच्छा होती. शिवाय श्रीच्या मनाप्रमाणें वागल्याचेंहि प्रदर्शन त्यामुळें आयतेंच साधणार होतें.

श्रीला सूचना देऊन आजींनीं तेथून पाय काढला.

श्रीच्या मांडीवर हात ठेवून कॉलरीशीं चाळा करीत चतुरेनें विचारलें—

" कसला विचार चाललाय ? "

" स्वप्नांत आहे कीं शुद्धीवर आहे तेंच समजत नाहीं मला. "

" आणखी कसले पुरावे मिळाले कीं सावध व्हाल तुम्ही ? मंगलांपासून दीनेला मूल झाल्यावर ? " चतुरेनें कांहींशा चिडक्या स्वरांत प्रहार केला.

" शिः शिः ! काय बोलत्येस हें ? "

श्रीला चतुरेची आंतल्या आत चीड आली. ती ओळखूनच कीं काय चतुरेनें चटकन् आवाजांत फरक केला आणि ती अशी कांहीं मोहक रीतीनें लगट करून बोलूं लागली कीं श्रीची चीड कोठल्या कोठें विरघळून गेली आणि तो तिच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास अनुकूल होत चालला.

" माझ्या मैत्रिणीचं कांहींच खरं वाटत नाहीं ना तुम्हांला ? मग असं तरी करा."

" माझं म्हणणं एवढंच कीं पत्रांतल्या मजकुरावरून दीनेला त्रास देणं योग्य नाहीं."

" स्वतःच जाऊन चौकशी करा मग."

" त्या आश्रमांत उभं कोण करील ?"

" तुमची दीना."

" तुझं तोंड पुन्हां दाखवूं नकोस असं मींच तिला सांगितलं मागं."

" म्हणून काय झालं ? तिला बोलवायला कांहीं जात नाहीं तुम्ही."

आणि शेवटीं असा बेत ठरला कीं श्रीनें ठाण्याला जाऊन पूर्ण चौकशी करायची. तोंपर्यंत चतुरेनें दीनेबद्दल कांहींहि बोलायचें नाहीं.

शिशिरला आणण्याविषयीं चतुरा म्हणाली—

" सासूबाई म्हणल्या शिशिरला घेऊन या म्हणून. पण मला वाटतं कीं तसं न करणंच बरं. वाईट आईचा मुलगा वाईटच निघायचा. तिकडेच व्हायचं तें होऊं द्या दोघांचं."

तिनें असें सांगण्याचें आंतलें कारण अर्थातच निराळें होतें. तिच्या मनांत सहजच असें आलें कीं लवकरच आपल्याला मुलें झालीं कीं त्यांना आजच शत्रु कशाला घरांत आणून ठेवा ?

श्रीनें सर्व गोष्टी त्या वेळीं कबूल केल्या तरी रात्रीं जेव्हां तो मध्येंच जागा झाला तेव्हां त्याच्या मनापुढें अनेक विचार उभे राहिले.

जवळ निजलेली चतुरा गाढ झोपेंत असल्यानें त्याचा त्याला एकट्यालाच विचार करण्यास अडथळा आला नाहीं तेव्हां.

दीनेच्या वागणुकीबद्दल त्याचें त्यालाच वाटूं लागलें :

—दीनेला आपण माहेरीं घालविली. उपहास, अपमान, निंदा करूनहि समाधान न होऊन वाटेल तसे आरोप केले तिच्यावर. तसा तिचा अपराध तरी काय होता ? ... आजारी असे ती एवढंच. पण त्याचें कारण तरी आपलीच वागणूक. आईच्या दाबामुळं कधीं प्रेमानं वागलों नाहीं. म्हणूनच कुढून-कुढून आजारी झाली ती. गादीवर शेजारींच निजूनहि आपण बोलत नसल्यानं रात्रीच्या रात्री रडून काढाव्या लागत तिला. आईचं बोलणं तिला सहन होत नसे. कधीं-कधीं काकुळतीनं ती म्हणे 'तुम्हांला पण माझं आजारीपण अपराधासारखं वाटतं का हो ?' आपण उत्तरच दिलं नाहीं तिच्या प्रश्नाला. आणि तशाच स्थितींत घराबाहेर ढकलली तिला.

... ती माहेरीं जातांच दुसऱ्या बायकोशीं प्रेमाच्या गोष्टी करूं लागलों. त्यांत लाज नाहीं वाटली. कुळाला काळिमाहि नाहीं लागला त्यानं. अधिक सुंदर बायको मिळाल्याचा आनंदच झाला उलटा ... आणि दीना ? ... बिचारी एकटी रडून-रडून रात्री घालवूं लागली असेल. शिशिरच्या चिमुकल्या देहाखेरीज कसला आधार होता तिला ? पण तरुण हृदयाची भूक अपत्यप्रेमानं का भागेल कधीं ? प्रेमपूर्तीच्या समाधानाच्या हृदय प्रतीकाला कुरवाळून त्या प्रेमविषयक भावना मूळांत शांत कशा होणार ?

साहजिकच एकलेपणानं जळणारं तिचं हृदय दुसऱ्या हृदयाचा शोध कर लागलं असेल. डॉ. मंगलांचा परिचय व्हायचं कारण हेंच असणार आणि गुणी माणसानं शोधून काढलेलं माणूस गुणीच असलं पाहिजे .. मंगल गुणी असतीलच. मग त्यांच्या कार्यात मदत करण्याचं आश्वासन दीनेनं दिलं तर काय बिघडलं? आणि यदाकदाचित् तिच्या मनांत मंगला बद्दल प्रेमभाव उत्पन्न झाला तरी त्यांत अनैसर्गिक काय आहे?

... दीनेच्या मागोमाग चतुरेशीं लग्न करण्यांत तरी आपण हेंच नाई का केलं?...

... दीना आजारी असतांना ती सदाचरणी आहे ह्याची जाणीव असून सुद्धां आपल्या मनांत काय पापी विचार आलेच नाहींत? किती तरी वेळां असं वाटलं असेल कीं अस्सं जावं आणि दुसरी बायको करावी बायको ही अशी नेहमींच आजारी राहणार. आपण कां उगीच जन्मभ शिक्षा भोगायची?

... असले विचार येणं निर्दयपणाचं नव्हतं का? पण आपल्याला तर तेव्हां कुठं तसं वाटलं? उलट मनाची समजूत घालीत होतों आपण कं माणसाच्या ठिकाणीं असणाऱ्या वासनांचं समाधान योग्य कालीं व्हायलाच पाहिजे, त्याचा नैसर्गिक हक्कच आहे तो.

... दीनेनं तोच हक्क बजावला तर काय वाईट केलं?...

ती काय विकारशून्य माणूस आहे? ...

श्रीच्या मनाची तळमळ किती वेळ चालली होती कोण जाणे! पण इतक्यांत चतुरा जागी झाली आणि म्हणाली—

"हें काय? जागेच आहांत अजून!"

"काय करणार; झोंपच नाहीं आली."

"कां बरं?"

"उगीचच."

"उगीच कसं? कसला तरी विचार चालला होता. होय ना?"

"खरं पापी कोण, मी कीं दीना तें ठरवीत होतों."

"मग काय ठरवलंत?"

"दोघेंहि सारखींच."

त्याच्या मनाची विशिष्ट अवस्था ओळखून चतुरेनें त्याचें मस्तक आपल्या वक्षःस्थलावर हळुवारपणानें दावलें.

श्रीला चतुरेच्या त्या मांसल शरीरस्पर्शानें किंचित् शांतपणा आल्यासारखा भासला. पदराच्या विरल आवरणाआडून होणारा तिच्या उरोजांचा स्पष्ट स्पर्श श्रीला अतिशय सुखकारी वाटला. क्षणभर तशाच स्थितींत गेल्यावर त्याचें मस्तक कुरवाळीत चतुरेनें म्हटलें—

" तुम्हीं काय पाप केलं असं वाटतं तुम्हांला ? "

" एक बायको असतांना दुसरीशीं... "

" हो, पण लग्न केलंत ना तिच्याशीं ? "

" मग ? "

" तुमच्या दीनेनं लग्नाशिवायच चालवले आहेत खेळ. आपला संबंध कायदेशीर आहे. पाप तर त्यांत नाहींच नाहीं. उलट अजून ती तुमची पत्नी असूनहि तिनं असं दुसऱ्या माणसाजवळ..."

तिनें कितीतरी भयंकर विष ओतलें श्रीच्या कानांत.

आणि त्यामुळें कीं काय श्रीचे स्वतःचे विचार अंतर्धान पावून चतुरेच्या सर्व गोष्टी खऱ्या वाटूं लागल्या त्याला ! पुन्हां दीना पापी — घरबुडवी — कुळाला कलंक लावणारी वाटूं लागली.

" आतां तरी गेले विचार मनांतले ? "

" गेले. "

" नुसतं तसं म्हणून नाहीं चालायचं. "

" मग ? आणखी काय करूं ? "

" त्याचा पुरावा मिळाला पाहिजे मला. "

" सांग कसा देऊं तो. "

" सांगूं ? पाहा हो ! "

" सांगशील तें करून दाखवीन. "

" असं ! बरं तर. तुमच्याजवळ कुठं तरी दीनेचा फोटो आहे तो माझ्यादेखत जाळून टाका पाहूं ! "

अनपेक्षितपणानें आलेल्या ह्या उत्तरानें श्रीला मोठाच धक्का बसला. त्याला विमूढ झाल्याप्रमाणें होऊन ' चतुरा ! ' इतकेंच त्यानें व्याकुळतेनें म्हटलें.

दिवाणखान्यांत दोन फोटो टांगलेले होते. एक श्री व दीना ह्यांचा एकत्र घेतलेला व दुसरा दीनेचा एकटीचा. चतुरा घरांत आल्यावर तिनें दीना व श्री यांचा फोटो काढून त्या जागीं आपल्यासह काढलेला श्रीचा फोटो टांगला. श्रीला मग सहजच धास्ती वाटायला लागली कीं दीनेचा फोटोहि ती असाच नाहींसा करील. त्यानें तो काढून आपल्याजवळ लपवून ठेवला. ती गोष्ट चतुरेच्या ध्यानांत आल्याशिवाय राहिली नाहीं. पण योग्य वेळ येतांच त्याची वासलात लावावी अशा विचारानें तिनें तेव्हां कांहीं केलें नाहीं.

तिला हवी होती तशी योग्य वेळ आज अचानक येतांच तिनें तो विषय काढला.

दीनेबद्दल श्रीचें कितीहि वाईट मत जगाला दिसत असलें तरी अंतःकरणांत तो तिला वाईट म्हणत नव्हता. अचानक केव्हां तरी त्याच्या मनांत दीनेचें दर्शन घेण्याची इच्छा होई आणि त्या वेळीं तो फोटो त्याला नित्य उपयोगीं पडे.

" चतुरा, काय मागते आहेस तूं ? तुला कधींदेखील दिसणार नाहीं अशा ठिकाणीं दीनेचा फोटो मीं ठेवला तर तुझं काय बिघडलं ? "

" पुन्हां आलांत मूळ पदावर. मघाशीं ना कबूल केलंत कीं दीना वाईट आहे म्हणून ? "

" हो — "

" मग वाईट स्त्रीचा फोटो जवळ ठेवूं नका एवढंच म्हणत्यें मी. "

" पण तो जाळायला तरी नको सांगूं. "

" बरं, पाहीन तें मी. निदान माझ्याजवळ तरी द्या तो. "

शेवटीं नाइलाजानें श्रीनें जपून ठेवलेली दीनेची खिन्न प्रतिमा आपल्या बॅगमधून काढली. चतुरेच्या तीक्ष्ण दृष्टीच्या कक्षेत असल्यामुळें त्याला फोटोकडे पोटभर पाहूनदेखील घेतां आलें नाहीं. तो ओझरता दृष्टिक्षेप त्यावर टाकणार तोंच—

चतुरेनें त्याच्या हातांतून ओढूनच घेतला तो.

फोटो घेऊन चतुरा चटकन् उठली आणि ट्रंकेचें कुलूप काढून तींत तो निर्दयपणानें ढकलून बंद करून टाकली तिनें ती ट्रंक.

खिन्न झालेला श्री निःशक्त झाल्याप्रमाणें निश्चल पडला होता. सवतीचा पुरा नायनाट केल्याच्या अभिमानानें चतुरेनें काळोखांत श्रीकडे बघितलें. त्याच्या मस्तकाला पुन्हां आपल्या वक्षःस्थलावर दाबलें.

त्याचा परिणाम म्हणूनच कीं काय श्रीचा खिन्नपणा — निःशक्तपणा कुठच्या कुठें नाहींसा झाला. आणि चतुरेच्या प्रेमलीलांचा तो स्वीकार करूं लागला !

# ४

वज्रेश्वरीस जाण्यास निघतांना मोटारींत बेताचीच जागा असल्यामुळें मंगलांना पुढें व दीनेला मागील बाजूस बसणें भाग पडलें. साहजिकच उभयतांना कांहींच बोलतां येईना. रस्ता वाईट असल्यामुळें मध्येंच एखादा बारीकसा दगड दिसतांच सर्वांनाच हिसका बसे. अशा वेळीं मंगलांची दृष्टि दीनेकडे जाई. तीसुद्धां तोल संभाळत असतांना, पदर सांवरीत असतांना अगर भुरभुरणाऱ्या केसांना मागें सारीत असतांना मंगलांना दिसे. मधूनच मागच्या बाजूनें दुसरी मोटार येई. तिला आपल्यापुढें न जाऊं देण्यासाठीं त्यांच्या मोटारीची जी तडफड होई ती होत असतांना दीनेला कांहींशी भीति व थोडीशी गंमत वाटे. केव्हां एखाद्या अडाणी बैल हांकणाऱ्या शेतकऱ्याची गाडी रस्त्याच्या मध्यावरूनच रेंगाळत जातांना दिसे. तिला चुकवून मोटार नेत असतांना आंतल्या मंडळींवर जेव्हां एकमेकांवर आदळण्याचा प्रसंग येई तेव्हां तर तिला खूपच मौज वाटे. त्यांतच मोटार-वाल्यानें गाडीवानाला दिलेल्या अपशब्दांची बक्षिसी कानांवर पडे, आणि मंगलांकडे बघून हातांतला छोटासा रुमाल तोंडावर दाबून ती आपलें हंसूं आवरण्याचा यत्न करी.

ठाण्यापासून पंचवीस-सव्वीस मैलांवर असणाऱ्या वज्रेश्वरी गांवाला तेथें असणाऱ्या ऊष्ण पाण्याच्या कुंडांमुळें व देवीच्या मंदिरामुळें क्षेत्राचें महत्त्व आलेलें आहे. निरनिराळ्या ठिकाणांहून अनेक भाविक माणसें तेथें मोटारनें जात असतात. दीनेच्या भोंवतालींदेखील तिकडे जाणारेच प्रवासी होते. एका बाजूला व्रात्य मुलांना घेऊन बसलेली बाई, एक म्हातारा, कांहीं लठ्ठ गुजराथी – या सर्वांना पाहून तिला सहजच वाटलें– ह्यांतल्या एकाला उठवून मंगलांच्या जागेवर बसायला सांगितलं तर ? मंगलांना माझ्याजवळ बसतां येईल आणि प्रवासाचा खरा आनंद लुटतां येईल. वास्तविक मंगलांची इच्छाहि दीनेपासून दूर बसण्याची नव्हती, पण त्यांचा मोठेपणा आड आला. ठाण्यास आश्रमाजवळ मोटार उभी राहिली तेव्हां मंगल व दीना जवळ

बसायला मिळेल म्हणूनच मागच्या बाजूस गेली. ड्रायव्हरनें हें पाहतांच तो स्वतः उतरून मागें येऊन अदबीनें मंगळांना म्हणाला—

" वाः वाः साहेब ! मागं कशाला बसतां ? "

" असूं दे, इथं ठीक आहे. "

" वाः ! असं कसं ? पुढं चला कीं. मुद्दाम तुमच्याकरितां जागा ठेवली आहे पुढली. "

असें म्हणून त्यानें मंगळांच्या हातांतली बॅग घेतली व पुढच्या बाजूस नेऊन ठेवलीहि. पुढें बसल्यानें दीनेची व आपली ताटातूट होणार ही कल्पना मंगळांच्या मनांत आली नाहीं असें नाहीं. पण मोटारवाला एवढ्या आदरानें पुढली जागा देतो आहे ती त्यांना नाकारतां येईना. गरीब मोटार-ड्रायव्हर त्याला वाटणारी कृतज्ञता फ्रंट सीट देण्याव्यतिरिक्त कोणत्या तऱ्हेनें दाखविणार ? त्याचा निरुत्साह करणें मंगळांनाहि कठिण वाटलें. आणि दीनेकडे क्षणमात्र बघून ते मोटारींत पुढच्या जागेवर जाऊन बसले. दीनेला मागच्या बाजूस ड्रायव्हरनें तितक्याच आदरानें बसवलें.

मंगळांच्या ह्या वागणुकीचा दीनेला प्रथम तरी विषादच वाटला. कारण आजच्या प्रवासांत मंगळांजवळ खूपखूप बोलायचें, एक सेकंददेखील वांया घालवायचा नाहीं असा दीनेनें आश्रमांतून निघण्यापूर्वींच निश्चय केला होता. इतकेंच नाहीं तर मंगळांना बजावलेंहि होतें तसें. त्यावर ते म्हणाले होते—

" आज एकूण कान ठिकाणावर नाहीं राह्यचे माझे ! "

" कान नाहीं राह्यले तरी चालतील, पण डोकं ठिकाणावर राह्यलं म्हणजे झालं. "

" कान जाग्यावर राह्यले नाहींत तर डोकं कसं राहील ? तें जाईलच त्यांच्याबरोबर ! "

" कान मीं धरून ठेवीन म्हणजे जागच्या जागींच राहतील ते, पण डोकं तुम्हींच ठिकाणावर ठेवलं पाहिजे. नाहीं तर तें वाटेल तिकडे जायचं ! "

आणि यावर दोघेंहि मोकळेपणानें हंसलीं होतीं.

खूप बोलण्याची तिची इच्छा मोटारींत बसल्यावर मनांतच राहिली. आणि मंगळांजवळ बोलतांना ज्या भोंवतालच्या क्षुल्लक गोष्टींकडे तिनें क्षणभरहि लक्ष्य दिलें नसतें त्यांच्याकडे पाहून ती आपलें मन रमवूं लागली.

मोटार बऱ्याच वेगानें धावूं लागली. रस्त्यावर दुतर्फा लावलेल्या उंच-उंच वृक्षांच्या कमानींतून जात असल्याचें पाहून दीनेच्या मनांत विचार येऊन गेला— 'नव्यानंच ह्या भागांत प्रवेश करणाऱ्या मंगलांचं स्वागत करण्यासाठीं तर ही मोठमोठाली मंडळी रांगेनं उभी नाहींत !'

इतक्यांत मोटारच्या इंजिनमधून धूर निघूं लागला. ड्रायव्हरनें सफाईनें वेग कमी करून भल्या मोठ्या पिंपळाच्या वृक्षाखालीं मोटार उभी केली. क्लीनरनें पुढें जाऊन पाहिलें व निकाल दिला— 'इंजिनांत पाणी घालायला हवाय.' थोडा वेळ तेथें मोडणार हें स्पष्ट झाल्यानें मंगल खालीं उतरले. दीनाहि मागोमाग उतरली.

बऱ्याच वेळानें एकत्र यावयास मिळाल्यानें उभयतांनाहि आनंद झाला होता. मात्र तो आपण व्यक्त न करतां दुसऱ्यानें करावा असें प्रत्येकाला वाटत होतें. खालीं उतरतांच मंगलांच्या मनांत पुढच्या कार्याचे बेत येऊन उभे राहिले. मंगल जवळ येऊनहि ते निर्विकार झाल्याचें पाहून दीनेला कांहींसा रागच आला. ती शेवटीं म्हणाली—

"किती विचित्र आहे स्वभाव तुमचा मंगल !"

"काय झालं ?" शुद्धीवर आल्याप्रमाणें मंगलांनीं विचारलें.

"तुमच्याजवळ बोलायला मिळेल म्हणून मोटारमधून उतरतांना मला कोण आनंद झाला. पण तुम्हीं मात्र शब्दहि न बोलतां विचारांतच गर्क !"

हळूहळू चालत तीं दोघें मोटारपासून थोड्या अंतरावर आलीं.

दीनेनें आपल्या डोक्यावर बघितलें तेव्हां तिच्या मनांत आलें— 'आपण एखाद्या प्रचंड मंदिराच्या गाभाऱ्यांत उभे आहोंत. दोन्ही बाजूंच्या वृक्षांचे खांब, त्यांवरच्या फांद्यांच्या कमानी आणि रस्त्याच्या मध्यावर गाभाऱ्या-प्रमाणें भासणारा वृक्षांच्या रांगांमधील भाग: देवळासारखंच नाहीं का वाटत इथं ? पण ह्या देवळांतला देव कोण बरं ?'

मंगलांजवळ आपली ती कल्पना बोलावी आणि विनोद निर्माण करावा असें मनांत येऊनहि मंगलांच्या मुखावरील गांभीर्यामुळें तसें तिला करतां आलें नव्हतें.

दीनेनें वाक्य संपवतांच मंगल क्षणभर थांबले. दीनेच्या दोन्ही नेत्रांत स्थिर दृष्टीनें बघितलें त्यांनीं आणि कांहींशा विषण्ण स्वरांत ते उत्तरले—

" अजून कच्चेपणा गेला नाहीं तुझ्या विचारांचा ! आपण ज्या कामासाठीं निघालों त्याचा विचार आधीं करायचा कीं..."

तो अधिक कांहीं बोलला नाहीं. दीनेच्या मनाची झालेली चलबिचल थांबविण्यास एवढी जाणीव करून देणें पुरेसें होतें. भानावर आलेल्या दीनेनें चटकन् पदर सांवरून खालच्या ओठाची डावीकडील कड नेहमींप्रमाणें दाबीत म्हटलें—

" खरंच, अगदींच विसरलें मी. "

आणि मग सर्व गोष्टी तिच्या ध्यानांतहि आल्या. आपण आज वज्रेश्वरीस जात आहों तें तेथल्या देवळांतील देवीच्या दर्शनाला नाहीं, तर त्या देवळाच्या बाहेर पसरलेल्या देवांच्या समाचाराला. वज्रेश्वरीच्या आसपासच्या डोंगरांत साध्या कोळशाची पैदास करणाऱ्या अनेक भट्ट्या असतात. त्यांत काम करणाऱ्या कातोड्यांचे अनेक प्रकारांनीं हाल करण्यांत येतात. आणि भट्ट्यांचे मालक श्रीमान् होऊनहि कातोडी अन्नाला महाग झालेले असतात. कातोड्यांच्या हाल-अपेष्टांची व अज्ञानी जीवनाची माहिती मंगलांनीं कांहीं दिवसांपूर्वी करून घेतली होती. आणि त्यामुळें त्यांचें अंतःकरण कळवळलें होतें. त्यांना तर असेंहि वाटूं लागलें कीं गिरणींतल्या मजुरांची संघटना निर्माण करणाऱ्या पुढाऱ्यांनीं तें काम कांहीं दिवस बाजूला टाकूनदेखील माणुसकीला दूरावण्यांत आलेल्या ह्या लोकांमध्यें अन्यायावर प्रहार करण्याची भावना चेतवण्यास धांवत यावें. आणि गिरणीमजुरांहूनहि अधिक राबून पोटभर अन्न मिळत नसलेल्या ह्या कातकऱ्यांना चांगल्या स्थितीला आणून सोडावें. मंगलांनीं स्वतःच ह्या चळवळीची सुरुवात करायचें ठरवलें. त्याप्रमाणें सर्व साधक-बाधक गोष्टींचा विचार करून त्यांनीं कांहीं कातकऱ्यांच्या भेटीहि घेतल्या आणि सर्वांना एकत्र आणण्याच्या उद्देशानें मोठ्या प्रयासानें वज्रेश्वरीच्या देवळापासून कांहीं अंतरावर कातोड्यांची सभा भरवण्याचेंहि ठरवलें.

ह्याबद्दल बोलतांना मंगल म्हणाले होते— " वज्रेश्वरीच्या देवळापासून थोड्या अंतरावरच अंग भाजून काढण्याइतक्या कढत पाण्याचीं कुंडं आहेत. पण मला वाटलं सभोंवतालच्या डोंगरांतली कातोड्यांची वसाहत हेंहि दुसरं तसंच गरम पाणी आहे. तें गरम पाणी जसं कुंडांत कोंडलं गेलं आहे,

तसाच भट्टयांच्या मालकांनीं चौफेर उभारलेल्या दारिद्र्याच्या व अज्ञानाच्या भिंतींमुळं ह्यालाहि वेढा पडलेला आहे. फरक एवढाच कीं तें झऱ्यांचं पाणी चिरकाल तसंच निरुपद्रवी राहणार, आणि हें दुसरं पाणी योग्य प्रयत्न होईल तर भोंवतालच्या त्या भिंतीहि फोडील आणि तेव्हां त्या भिंतींच्या राखणदारांना भाजून काढल्याशिवायहि राहणार नाहीं. ... देवळाच्या उत्तरेकडे मंदाग्नि म्हणून एक छोटासा ज्वालामुखी डोंगर आहे. तो आज सुप्त आहे खरा, पण तो केव्हां भडकेल ह्याचा नियम नाहीं असं त्या बाजूचे लोक सांगतात. तें काय असेल तें असो, पण मला तर असं वाटतं— खरे सुप्त ज्वालामुखी कातोड्यांच्या रूपानं तिथल्या प्रत्येक डोंगरांत पसरले आहेत. त्या ज्वालामुखींनाच खरं भडकवलं पाहिजे. तोच प्रयत्न मला स्वतःला करावासा वाटतो व तो मी करणार आहें. ... दारूच्या कोठारांत हातांत कोलीत धरण्यासारखंच आहे हें. पण माझ्या व्यक्तित्वाच्या जोरावर त्याचा मी दुरुपयोग होऊं देणार नाहीं. ... ह्या समाजासाठीं मी आतां संघटना निर्माण करणारच. मग माझं त्यापायीं कांहींहि होवो. नाहीं तरी माणसाचं जीवन हें देण्यासाठींच आहे."

आणि तें ऐकतांना दीनेच्या हृदयांत मंगलांबद्दलचा अभिमान जसा अधिक वाढूं लागला तशीच त्यांच्या भवितव्याबद्दल चिंताहि लागून राहिली. मंगलांबद्दल आपणांला काळजी कां वाटावी असाहि प्रश्न उभा राहिला तिच्यापुढें.

'त्याचं कारण मंगलांचं अनन्य व्यक्तिमत्त्वच' असें तिनें स्वतःलाच उत्तर दिलें.

पण त्यानेंहि मनाचें समाधान झालें नाहीं ! कारण तें उत्तर खरेंच होतें असें तिचें तिलाच मागाहून वाटेनासें झालें.

ठाण्याला मंगलांच्या आश्रमांत आल्यापासून तिच्या साऱ्याच वागणुकींत जो विलक्षण फरक पडत गेला त्याचा तर हा परिणाम नव्हता ना ?

मंगलांच्या सहवासांत राहत असतांना दिवसेंदिवस तिच्या सतेज होत जाणाऱ्या मुखावर प्रसन्नता पसरूं लागली. हवा बदलल्याचा हा परिणाम असेल असें प्रथम तिला मंगल सांगत होते तरी तिला मात्र तें पटत नव्हे. ती मनाशीं म्हणे—

' स्वतःपलीकडील गोष्टींचाच विचार करणाऱ्या ह्या जगांत सर्वच साधनं आनंद उत्पन्न करणारींच आहेत नाहीं का ? त्यांचाच असेल हा परिणाम. शिवाय मंगलांचं थोर व्यक्तिमत्त्व नि त्यांनीं निर्माण केलेलं इथलं निर्मळ वातावरण हींच आपल्यामध्यें असा फरक घडवून आणीत आहेत काय ? '

आपण कशासाठीं वज्रेश्वरीस जात आहों ह्याची जाणीव मंगलांनीं करून देतांच तिनें विचारलें—

" किती वाजतां सभा व्हायची आहे आजची ? "

" अडाणी लोकांच्या सभा घड्याळांना बघून का होत असतात ? "

" मग ?"

" मी गेलों कीं सभेला सुरुवात !"

" आपली तर उगीचच खोटी होते आहे नाहीं ? "

" म्हणूनच विचारांत पडलोंय मी. "

" वाट बघत असतील तिथले लोक. "

" हो तर. माझी प्रत्यक्ष भेट थोड्यांनाच झाली असूनहि देवासारखा वाटूं लागलोंय मी त्या सर्वांना. तो म्हातारा सांगत होता तें आठवतंय ना ?"

दीनेच्या दृष्टीपुढें तो प्रसंग ताजेपणानें उभा राहिला. त्या वेळीं मंगल आश्रमांत नसतांना कातोड्यांचा पुढारी त्यांना भेटायला आलेला होता. त्याचा निस्तेज काळेपणा व दरिद्री पोशाख बघून दीनेला कसेंसेंच वाटलें. असली व्यक्ति आश्रमांत कशासाठीं आली ह्याचा ती विचार करणार तोंच तो म्हातारा थेट आंत शिरूं लागला. पण एवढ्यांत मंगलहि आल्यानें सगळ्या गोष्टी स्पष्ट झाल्या. मंगल नसते आले तर दीनेनें त्या येईपर्यंत तरी कातोड्याला बाहेर उभें राहणें भाग पाडलें असतें. मंगलांनीं तेव्हांच त्या म्हाताऱ्याची दीनेला माहिती सांगितली. कातकऱ्यांची सभा केव्हां, कुठें भरवायची ह्याबद्दल नक्की बेत करण्यासाठीं तो म्हातारा आलेला होता. जातांना मंगलांच्या पायांवर डोकें ठेवण्याचा त्यानें हट्ट धरला तेंहि दीनेला आठवलें. मंगलांनीं तसें करूं देण्याचें नाकारलें. ' माणसाच्या पायांवर कसलं डोकं ठेवायचं ! ' असें मंगलांनीं म्हणतांच म्हाताऱ्याचे डोळे भरून आले. तो म्हणाला— " देव कवा भेटेल तो खरा. पण मानूस देवावाणी पहिल्यानंच भेटला मला ! "

तो प्रसंग ह्या वेळीं आठवून दीना मंगलाना म्हणाली—

" खरंच, किती करुणास्पद होती त्याची हकीगत, नाहीं ? "

" कोळशांच्या भट्ट्यांवर काम करणाऱ्या सगळ्याच मजुरांचं जीवन हें असंच असतं. ... ! "

" कारणं काय बरं त्याचं ? "

" अज्ञान. ... दीना, सामाजिक विषमतेनं जेवढं होत नाहीं तेवढं नुकसान सामान्य लोकांचं हें अज्ञान करतं. जगांत सुखं असतात ह्याची या कातोड्यांना जाणीव तरी असेल कीं नाहीं कोण जाणे ! सारं आयुष्य पोटाकरतां कराव्या लागणाऱ्या श्रमांपायींच खर्च होतं त्यांचं. उभ्या आयुष्यांत दारिद्र्य कधीं जायचं नाहीं तें नाहींच. पण त्यांना आपल्या ह्या स्थितीची जाणीव होण्याइतकं ज्ञानच आहे कुठं ? आणि तें मिळवण्याची व्यवस्थाहि नाहीं. म्हणूनच त्यांची अशीच समजूत होऊन जात असते कीं आपण जन्माला आलों ते केवळ काम करण्यासाठीं व दुःख भोगण्यासाठींच. "

" परिस्थितीची जाणीव त्यांना झाली तर ? "

" कोळशांच्या भट्ट्या अन्यायी निर्दयतेच्या चिताच ठरतील. ... "

मंगलांच्या मनांत आणखी कांहीं बोलायचें होतें. पण तेवढ्यांत मोटार ड्रायव्हर त्यांच्या दिशेनें येऊं लागल्यानें तो विषय तसाच सोडावा लागला.

ड्रायव्हर जवळ येऊन म्हणाला—

" साहेब, चला लवकर. "

तोंडाशीं आलेले कितीतरी शब्द दीनेलाहि मागें घेणें भाग पडलें.

मोटारींत पुढच्या बाजूस बसलेल्या मंगलांच्या पाठमोऱ्या देहाकडे बघतांना दीनेच्या मनांत नंतर कितीतरी विचार उसळूं लागले—

' ... अन्यायाबद्दल मनांत चीड असल्यानंच मंगल ह्या कार्याकडे वळले. कुठंहि अन्याय होतो आहेसा पाहिला कीं रागानं लाल होतात ते. ... मंगल ... किती गुणी माणूस आहेत ! ... मागं एकदां आपण बुडत असतांना कुणा पुरुषानं आपल्याला वांचवल्याचं आपण बघितलं होतं. मंगलांच्या रूपानंच तर तो पुरुष अवतरला नाहीं ? ... आईच्या मृत्यूनंतर दादाकडे राहिलों नाहीं हें बरं झालं. उगीच स्वतःभोंवतीं स्वतःच्याच पायांशीं बघत जन्म काढावा लागला असता. आणि कदाचित् पुन्हां आजारी पडून

मृत्युपंथालाहि लागलों असतों आपण. मंगलांना सुविचार सुचला म्हणून त्यांनीं इथं येण्याची सूचना केली. आश्रमांत आल्याबरोबर पहिला आनंद जर कशाबद्दल झाला असेल तर तो माणुसकी सांपडल्याचा. लग्न झाल्यापासून ज्या-ज्या नव्या व्यक्तींची गांठ पडली त्यांतील प्रत्येकाजवळ मनुष्याचं हृदय आहे कीं नाहीं ह्याचाच संशय पडत असे. आश्रमांतील मात्र तशी गोष्ट नाहीं. म्हणूनच थोड्याच अवधींत आपण समरस झालों आश्रमांतल्या निर्मळ वातावरणांत. ...

'... मंगलांचा कामाचा व्याप आतांच इतका मोठा झाला आहे कीं स्वतःच्या गरजांकडे देखील बघायला सवड होत नाहीं त्यांना. बिचाऱ्यांना थकवा तरी किती येत असेल! निजतांना दमून तरी किती जात असतील! आणि इतकं असूनहि कुणा गरिबाचा आर्त स्वर कानीं पडतांच मध्यरात्रींहि उठायची त्यांची तयारी असतेच. 'जीवन हें देण्यासाठीं आहे' असं स्वतः ठरवलेलं आपल्या वागणुकीचं सूत्र क्षणमात्र देखील डोळ्यांआड होऊं देत नाहींत ते. आश्रम म्हणजे मंगलांनीं समाजाच्या पायांवर वाहिलेलं जणूं एक अलौकिक फूल आहे. त्याचा सुवास सुखासीन लोकांत जितका पसरत नसेल तितका गरीब अज्ञानी व कुठच्या तरी अन्यायांत भरडल्या जाणाऱ्या अशा लोकांत दरवळतो. समाजाच्या भीतीनं टाकून दिलेल्या अनाथ मुलांसाठीं केलेली सोय, वाट चुकलेल्या पतितांना तिथं मिळणारं संरक्षण, गरिबांना औषध मिळण्याची योजना — आश्रमांतल्या या सर्व गोष्टी मंगलांचं थोर व्यक्तित्वच नाहीं का सिद्ध करीत! इतकीं कामं संभाळूनहि शेतकरी-मजूर यांच्या उद्धाराची तळमळ त्यांना लागलेली आहे ती निराळीच.

'... आश्रमांत आल्यापासून आठ दिवसांतच मंगलांच्या मोठेपणाबद्दल कौतुक वाटूं लागलं आपल्याला. अशा थोर व्यक्तीला दीर्घायुष्य लाभावं. कामाचे डोंगर उचलतांना प्रकृतीबद्दल हयगय होऊं नये म्हणून आपण विचारलं—

"मंगल, एवढं काम करून तुम्हांला दमल्यासारखं नाहीं वाटत?"

"मी प्रत्येक काम हौसेनं करतों. आणि हौस कधीं दमत नाहीं."

असं उत्तर देतांना त्यांच्या गौरवर्ण मुखावर स्वाभिमानाची मोहक तकाकी पसरलेली दिसली. पुढं बोलल्याशिवाय राहवेना आपल्याला.

" म्हणून काय झालं ? माणसानं आपल्या प्रकृतीची नको का काळजी घ्यायला ? "

" स्वतःची प्रकृति ? दीना, जीवन नाहीं तरी देण्यासाठींच असतं ना ? मग प्रकृतीची कां काळजी करायची तें देत असतांना ? "

आपल्या मनांत चटकन् कांहीं तरी विचारण्याची कल्पना येऊन गेली. धीर मात्र होईना बोलण्याचा. आपल्या ओठाची कड दाबली गेलेली पाहूनच कीं काय ते म्हणाले –

" काय विचारायचं आहे ? "

" कुठं ? कांहींसुद्धां नाहीं. "

पण मंगल तेवढ्यानं का स्वस्थ बसणार ? त्यांनीं अधिकच आग्रह केला. आपल्यालाहि मग राहवेना. त्यांना म्हटलंच कीं– " इथं आल्याला पुष्कळ दिवस झाले. बसून दिवस घालविण्याचा कंटाळा आला आतां. म्हणून काहीं तरी काम करावंसं वाटूं लागलंय. मागितलं एखादं काम तर द्याल का परवानगी ? "

" अवश्य. काम करूं द्यायला कोण नाहीं म्हणणार ? "

" पाहा हो ! नाहीं म्हणाल ... "

" मी नाहीं म्हणेन असं विलक्षण काम तरी कोणतं हवं आहे तुला ! "

" तसंच गमतीचं आहे तें. तुम्ही सांगाल तीं इतर कामं करायला मी आहेंच तयार ! पण मी जें काम मागणार आहें तें मला करूं दिलं पाहिजे. आहे कबूल ? "

" काम काय तें तर कळूं दे ! "

" आधीं होकार येऊं द्या. "

" उलटाच न्याय आहे तुझा. "

" वाटेल तें म्हणा ... "

" बरं सांग पाहूं ? तूं कोणतंहि काम करायला माझी हरकत नाहीं. "

" ठरलं ? ... बरं, सांगतें तर. मी किनई बारीकसंच काम करणार आहें. आणि तें म्हणजे तुमच्या प्रकृतीची काळजी घ्यायचं ! "

तें ऐकून मंगल मोकळेपणानं हसले. आणि त्यांचं अंतःकरण आपल्या उत्तरांत दिसून आलेल्या प्रेमळपणानं भरून आलं असावं.

आपल्याला तेव्हां वाटलें होतें कीं मंगल कितीतरी हंसतील, थट्टा करतील; आपल्यालाहि हसतां-हसतां मग पुरेसें होईल.

पण आपल्या उत्तरावर मंगल म्हणाले—

" किती थोर अंतःकरण आहे तुझं दीना ! तुझ्या उत्तरानं तुजबद्दलचा आदरभाव दुणावला आहे माझा. "

आदरभाव हा शब्द मात्र आपल्याला मुळींच आवडला नाहीं. मंगलांनीं आपल्याकडे आदरापेक्षां कोणत्या तरी निराळ्या भावानेनं पाहावं असंच वाटलं तेव्हांहि आपल्याला.

... त्या दिवसापासून आपल्या कामाला सुरुवात झाली.

... जिथें मंगल तिथें दीना असायचीच हें जणूं ठरून गेल्यासारखं झालं.

... आणि लोकांमध्यें आपल्या एकत्र जाण्या-येण्यावर तर्ककुतर्क पसरूं लागले. आपण त्यांकडे कधीं लक्ष्य दिलं नाहीं. आपण प्रामाणिकपणानं काम करीत आहों तोंपर्यंत तसल्या टीकांना भिण्याचें काय कारण ?...

आज वज्रेश्वरीला आपण निघालों तें देखील मंगलांच्या बरोबर जाण्याचं आपलं काम आहे म्हणून ...

— हा सारा इतिहास मंगलांच्या पाठमोऱ्या देहाकडे पाहतांनाच दीनेच्या दृष्टीपुढून सरकून गेला.

मोटार गर्द झाडींतल्या रस्त्यावरून जात होती.

वज्रेश्वरीचें जंगल लागलें. उतरण्याचें ठिकाण जवळ आलें. प्रवाशांत उतरण्याविषयींच्या पुढल्या बेतांबद्दलच्या बोलण्या सुरू झाली.

आणि दीनाहि त्यामुळें भानावर आली. तिनें मंगलांकडे बघितलें तेव्हां ते आपले डोळे संकुचित करून दूरवर एकाग्रतेनें बघत होते.

मंगलाच्या सभोंवार शेंकडों कातकरी जमा झाले. सर्वांची दृष्टि मंगलांवर स्थिरावली होती. मंगलांच्या मागोमाग दीनेकडे त्यांची नजर वळे. तीं दोघें मोटारींतून उतरतांच मंगलांच्या पायांवर डोकें ठेवण्यास त्यांच्यांतले कित्येक पुढें येत होते. कांहींनीं दीनेच्याहि पायांवर मस्तक ठेवण्यास सुरुवात केली होती. सुरकुतलेल्या काळ्या कुळकुळीत कातडींतून बाहेर डोकावणारे त्यांचे पांढरे निस्तेज डोळे किती आदरानें बघत होते तिच्याकडे ! एका म्हातारीनें तर चटकन् तिच्यावरून आपला हात ओंवाळला आणि ती

म्हणाली— ‘ कधी देवीवानी शोभस्याती तुमी ! ’ मंगलांना नारायण म्हणून दीनेला लक्ष्मी ठरवायचाहि तिनें यत्न केला !

आपल्याला मंगलांची पत्नी कल्पिल्याचें दीनेच्या ध्यानीं येतांच तिला कसेंसेंच वाटलें...

आणि म्हातारीप्रमाणेंच प्रत्येक कातोडी दीनेकडे मंगलांची पत्नी ह्या कल्पनेनेंच पाहत होता. दीनेला त्यांच्या बोलण्यावरून तें कळून आलें होतें तरीहि त्यांच्या गैरसमजुतीचें निराकरण करण्याचा प्रयत्न केला नाहीं तिनें. कारण तो गैरसमजच तिच्या हळुवार बनलेल्या मनांत कसला तरी कोमल तरंग उमटवीत होता. आजपर्यंत क्वचित्च अनुभविलेल्या सौख्याची संवेदना तशीच बराच काळ मनांत टिकविली जाईल तर किती बरें होईल असें तिला वाटूं लागलें.

मंगल हंसतमुखानें सर्वांचें अभिवादन स्वीकारीत असतांनाच दीना शेजारीं उभी राहून कातोड्यांकडे बघत होती.

... आणि जों-जों ती बारकाईनें निरीक्षण करूं लागली तों-तों तिला खिन्नताच वाटूं लागली. त्यांच्यांतल्या प्रत्येकाचें शरीर उन्हांत राबावें लागल्यामुळें कळकट नि नीरस अशा विशिष्ट काळ्या रंगाचें दिसत होतें. पुरुषांच्या अंगावर दोन-तीन लक्तरवजा कपडे होते. डोक्याभोंवतीं गुंडाळलेल्या पटकुराला छिद्रें पडलेलीं होतीं, तर अंगांतल्या फाटक्या कुडत्यांतून कित्येकांच्या काळ्या कुळकुळीत पाठी स्पष्ट दिसत होत्या. दीनेची त्यांच्या पायांकडे दृष्टि गेली तेव्हा तिच्या सहज मनांत आलें— ‘जन्मभर अनवाणी चालावें लागल्यानें त्यांचे तळवे भेगाळलेले असावेत.’ त्यांच्यांतल्या बायकांच्या अंगावर जुनाट फाटक्या लुगड्याशिवाय कांहीं नव्हतें. त्यांचे केंस कित्येक दिवसांत तेल न लावल्यानें गुंताड होऊन भुतासारखे दिसत होते. गळ्यांत काळ्या-तांबड्या डगळ पोतीचे सर होते, तर हातांत जाड कथली बांगड्या होत्या. त्यांच्यापैकीं एकीच्याहि तोंडावर तजेला दिसत नव्हता. त्यांचीं मुलें तर किळस आणणारींच वाटलीं दीनेला. एकाचेंहि शरीर निरोगी नव्हतें. कांहींच्या अंगावर खरजीचीं चकदणें पडलीं होतीं, तर कांहींच्या डोक्यांत खवडे झाले होते; त्यामुळें जातां-येतां त्यांच्याभोंवतीं सारख्या माशा फिरत होत्या. पोटभर

दूध न मिळाल्यानें कांहींचें रडणें सुरू होतें आणि त्यांच्या आया दीनेकडे भाशाळभूतपणानें बघत होत्या.... दीनेनें त्यांच्या परिस्थितीची आपल्या बरोबर तुलना करतांच तिला वाटलें–'स्वतःपलीकडचं जग किती भयंकर आहे !'

इतक्यांत मंगलांच्या नांवाचा जयजयकार झाल्यानें ती मानावर आली.

जयजयकार ऐकून तिच्या हृदयांत मंगलांबद्दल अत्यंत अभिमानाचे विचार यायला लागले. त्यांच्याबद्दलचा प्रेमभाव अधिकाधिक व्यक्त स्वरूप धारण करण्यासाठीं धडपड करूं लागला.

ठरल्या वेळीं सभेला सुरुवात झाली.

सभा असूनहि सभेचें एकहि ठरीव तंत्र तेथें पाळलें जाणें शक्य नव्हतें.

थोड्याशा उंचावर मंगल बसले, शेजारीं दीना बसली, आणि त्यांच्या सभोंवार कातोड्यांचा समूह अधीरतेनें घोळका करून बसला.

लवकरच मंगलांनीं सुरुवात केली–

"मी तुमचा भाऊ आहें असं समजा–" असें मंगलांनीं सर्वांना प्रथमच सांगतांच सर्वजण अधिक आपुलकीनें पाहूं लागले. बहुतेकांनीं खुरमांडी घातली होती. कांहींशा विचित्र हास्यानें सर्वांचे चेहरे फुलून गेले. आणि आपलेपणाचा शब्द प्रथमच ऐकूं आल्याप्रमाणें जो तो एकमेकांकडे बघूं लागला.

डाव्या हाताचा तळवा कातळावर टेंकून त्यावर कांहींशी रेलून दीना मंगलांकडे बघत होती.त्यांच्या तोंडावर कसलें तरी तेज पसरल्यासारखें तिला भासलें. असंख्य कष्टी जीवांना सुखी करून आपल्या जीवनाची सफलता होणार ही कल्पना त्यांच्या भोंवतीं फांकली होती जणूं. त्यांची नेहमीची गोरी मूर्ति अधिकच आकर्षक दिसली. आणि त्यांच्या स्वरांत उत्कटतेमुळें उत्पन्न होणारा कंप नि घोगरेपणा तर तिला फारच आवडला.

मंगल बोलत होते–

"जगांत आलेल्या प्रत्येक माणसाला मरायचंच आहे हें खरं. पण म्हणून जर एखादा श्रीमंत सांगेल कीं तूं माझ्यासाठीं आजच मर तर कोण ऐकून घेईल ? तुमची स्थिति मात्र तशीच झाली आहे. तुमच्यावर लादलेलं दारिद्र्य तसंच चालू राहावं, त्यांतच तुम्हीं मरावं, असं तुमच्या मालकांना

असतं. कारण त्यांना माहित आहे की कष्ट करणाऱ्या कातोड्याला ते करण्या-पलीकडे कांहीं समजत नाहींत ... म्हणून म्हणतों कीं यापुढं असं राहण्याचं साफ नाकारा. ”

— आणि ते कांहींशा चिडक्या आवाजांत म्हणाले—

“ तुम्ही काम करतां खपतां तरी ठराविक पगार मिळत नाहीं. पोटासाठीं जन्माचं गुलाम बनावं लागतं. पोरांबाळांना उन्हांतान्हातून फिरवावीं लागतात. झाडाखालीं राहण्यापलीकडे कसलीहि व्यवस्था करण्याचं सामर्थ्य ठेवलंच जात नाहीं तुमच्या ठिकाणीं. आणि इतकं करूनहि थोड्या का होईनात पण पगाराच्या अशा दिडक्या हातावर पडतात का ? ... नाहीं. त्यांतहि कावेबाज धोरण स्वीकारलं जातं. कांहीं कपडे अंगावर फेंकले जातात. आणि त्यांची किंमत म्हणून वाटेल तो पैसा पगारांतून कापून घेतला जातो. रात्रींच्या रात्री जंगलांत काढून कोळशाची राखण करावी व तो घेऊन शहरांत विकायला जावं. पण त्या शहरांत मनांतली एकहि हौस फेडतां येत नाहीं कधीं. ... बायकांवर मालकाकडून अगर त्यांच्या नोकरां-कडून केव्हां हात टाकला जाईल ह्याचा नेम नसतो. ... इतक्यांतूनहि सुटून कधीं-काळीं चार पैसे जवळ झालेच आणि शहरांत मौजेसाठीं गेलांत तर पोलिसांचा डोळा तुमच्यावर पाळत ठेवीत असतो. ... गुलामगिरी बंद झाली म्हणण्यापेक्षां ती अधिक भीषण पण गुप्त स्वरूपांत येथल्या या राना-वनांतून नांदते आहे असंच म्हणावं लागतं ... ”

मंगलांनीं उभारलेलें कातोड्यांच्या जीवनाचें चित्र प्रत्येकाच्या हृदयाला जाऊन धक्का देऊं लागलें. आपण आहोंत ती स्थिति किती वाईट आहे अशा जाणीवेनें परस्परांकडे ते बघूं लागले.

मंगलांचा आवाज आतां खूपच चढला. माणसांना छळणाऱ्या माणसां-बद्दलचा संताप जणूं अनावर झाला होता त्यांना.

दीनेच्या मनांत मात्र भीति उत्पन्न झाली. मंगल अधिक कांहीं बोल-तील तर संतापानें कांहीं बरें-वाईट नाहीं ना व्हायचें ! अशा प्रामाणिक भीतीनें तिनें मंगलांना म्हटलेंहि— “ जरा हळू बोला ... त्रास होईल ना तुम्हांला ! ”

दीनेनें दाखविलेल्या जिव्हाळ्यानें मंगलांना अधिकच जोर चढला !

" म्हणून म्हणतों कीं मी सांगतों तसं करा. तुम्ही गुलाम नाहीं हें कधींहि विसरूं नका. आणि मी सांगेन तसं वागा कीं तुमची ह्या परिस्थितींतून सुटका झालीच म्हणून समजा. मला तुमच्याजवळून कांहीं नको. उलट तुम्हांलाच मी आजारपणांत औषधपाणी देईन. तुमच्या मुलांच्या अंगावरची खरूजहि मीं नाहींशी करीन. पण एक करा. तुम्ही माणसं आहांत, जनावरं नाहींत, हें कधीं विसरूं नका. मालकाकडून कसलाहि झालेला अन्याय सहन करायचा नाहीं असा निश्चय करा. ... त्याला वेळच्या वेळीं बजावायला विसरूं नका कीं–' बाबा रे ! तुझ्यासारखेच आम्ही. तुझ्यासारखाच आम्हांलाहि सुखानं जगण्याचा अधिकार आहे.' ... पण ध्यानांत ठेवा एवढं धैर्य तुमच्या अंगांत आपोआप नाहीं यायचं. त्यासाठीं एकी करायला हवी. कातोडी म्हटला कीं तो सगळीकडचा एक असं झालं पाहिजे. एका भट्टीवरच्या कामकऱ्याला छळलं तर इतर भट्टीवरच्या नोकरांनीं त्याला मदत करायला, त्याच्यासाठीं भांडायला, धांवलं पाहिजे. एकाचा अपमान हाच सगळ्यांचा अपमान वाटण्याइतकी एकी झाली पाहिजे तुमची ... मी तोच प्रयत्न करणार आहें. त्यांत तुम्हीं मदत केलीत तर तुमचाच फायदा आहे. ... आज माझ्यादेखत असा निर्धार करा कीं आम्ही जगणार !–आम्ही माणसं म्हणून जगणार ! ! मुक्या जनावरांप्रमाणं क्षणभरहि यातना सहन करणार नाहीं ! ! "

सर्व कातकऱ्यांत एकदम मंगलांच्या त्या शेवटच्या प्रतिज्ञोद्गारांचा प्रतिध्वनि उमटला. आणि कांहीं काल तेथलें वातावरण मंगलांच्या जयजयकारानें दुमदुमून गेलें.

मंगल खालीं बसतांच दीनेला हायसें वाटलें. त्याचें कपाळ घामाच्या टपोऱ्या बिंदूंनीं फुलारलें होतें. संतप्त भावनांच्या परिस्फोटामुळें कानशिलाजवळची शीर फुगून गेली होती. डोक्यावरचे उभारलेले केस बंडखोर भावनांचें निदर्शन करीत होते आणि भाषणाच्या श्रमांमुळें त्याची रुंद छाती आवेगानें खालीं-वर होत होती.

कपाळावरचा घाम पाहून दीनेनें चटकन् आपल्याजवळचा रुमाल त्याच्या पुढें केला.

" कित्ती घाम आलाय हा ! पुसा तरी !– "

तिच्या स्वरांतली आर्जवी कातरता मंगलांना जरी थोडीशी सुखदायक वाटली तरी अधिक कांहीं बोलणें बरें नाहींसें वाटून कीं काय त्यांनीं तिच्याकडे नुसतेंच पाहिलें.

आणि त्यांचा तो साधाच कटाक्ष दीनेला मात्र रम्य वाटला.

सभेनंतर कातोड्यांच्यांत मिसळण्याचा प्रयत्न मंगलांनीं केला. आपण स्वर्गातून उतरलेले परमेश्वर नसून इतरांप्रमाणेंच माणूस आहोंत, आपल्याला भिण्याचें कारणच नाहीं, हें ते प्रत्येक कातकऱ्याच्या मनावर बिंबविण्याचा यत्न करीत होते. एक म्हातारा तेवढ्यांत त्यांच्याजवळ आला. पायांवर डोकें ठेवून तो म्हणाला –

"आ ... माबाप किसा देव येऊला ... मा बाप आ कोळसाना भट्टीमां काम करकर मा येवढा मोठा वाढूला. मा जे कोळसा करा, ता कोळसामां समदा समदा दुनियाना भात-भाकर करीना खाऊला पर मा पोट ना पुरा भरा! मा उपास काढू हा. अंगभर पांघरून ना मिळूला. मा बायकू सोराना हाल काढीना. मा जीव तडफडूला. ... हो. मा जीव तडफडूला. पन् वा मा किसा करूला. भट्टीवाला शेटना मा चाकर हा. मा काम करीना काटा अगदीं ढिला करूला. किसा करा. बा ... कांहीं करा हा ... माझीपर दया कर. मा म्हाताऱ्या वाचवीना तुना देव कल्याण करूला."

एवढ्यांत एक काळा कुट्ट तरुण कातोडी पुढें येऊन सांगूं लागला—

"तुना पाय धरूला... कसापर करीना. मा सुटका कराहा... मी रानचा राजा हां. मी काम करीना न दमूला. ... कोळसा भट्टीमां ना भाजूला. पन् मा भुकीं मरमर जीव तडफडूला मा बाप! ... तूं किसापर करीना. मा पोट भरूला करा. ... मग माय बाप मा काय बी काम कराहा."

मंगलांनीं अशा अनेकांचीं बोलणीं शांतपणें ऐकून घेतलीं, सर्वांना संघटित व्हायचा उपदेश केला व एकीचें महत्त्व नाना परींनीं मनावर ठसवलें त्यांच्या.

वज्रेश्वरीच्या आसपासच्या जंगलांत राहणारे व भट्ट्यांवर काम करणारे हे कातोडी मालकांचे जवळ-जवळ गुलामच असतात. लग्नासाठीं अगर इतर कांहीं कारणानें भट्ट्यांचे मालक कर्जाऊ पैसे देतात आणि ते पैसे त्यांनीं कामाच्या रूपानें फेडावयाचे असतात. पण सारें आयुष्यभर नोकरी करूनहि

ते पैसे कधीं फिटत नाहींत. म्हणून मालकांजवळून कसल्याहि कारणांसाठीं पैसे घ्यायचे नाहींत असा सर्वांना मंगलांनीं उपदेश केला. आणि संघटने-बरोबरच शांत राहण्याबद्दल सांगण्यासहि ते विसरले नाहींत.

संघटनचा ओनामा म्हणून महिन्यांतून एखादे दिवशीं तरी वज्रेश्वरीस सर्वांनीं जमावें आणि परस्परांच्या अडचणी एकमेकांना सांगाव्या असें ठरलें.

कुंडांतल्या कढत पाण्याच्या विशिष्ट गुणामुळें वज्रेश्वरीला क्षेत्राचें स्वरूप आलेलें आहे. दर शनिवार-रविवारीं अगर सुट्टीच्या दिवशीं अनेक श्रीमान् माणसें त्या ठिकाणीं येतात, कुंडांतल्या कढत पाण्यांत मनसोक्त स्नान करतात व दिवसभर चैनींत घालवून सायंकाळीं परत जातात. कांहीं अर्धांग-वायूच्या विकारानें आजारी असलेलीं माणसें तर मुक्कामच करून राहतात तेथें. गंधकाच्या पाण्यानें बराच काल अंग शेकून काढलें तर तो आजार कमी होतो असा समज आहे आणि तें गंधक तेथल्या पाण्यात आहे. अशा निरनिराळया कारणांसाठीं येणाऱ्या माणसांच्या दृष्टीस कातकऱ्यांचा समाज पडला तर चैनीसाठीं येणाऱ्यांच्या मनाला जाणीव होईल कीं जो कोळसा पोट भरण्यासाठीं आपण जाळतों त्याच्या उत्पत्तीसाठीं अनेक जीवांना आपल्या आयुष्यांची कष्टांच्या अग्नींत आधींच राख करून घ्यावी लाग-लेली असते. व्रजेश्वरीलाच कातोड्यांनीं जमावें असें सांगण्यांत मंगलांचा हाच हेतु होता.

शिवाय लवकरच मुंबईच्या गव्हर्नरांचा तेथें मुक्काम होणार असल्याची बातमी मंगलांना समजली होती. कातोड्यांना बातमी सांगतांच सर्वांनीं निश्चित केलें होतें कीं आपलीं गाऱ्हाणीं गव्हर्नरच्या कानांवर घालायचीं.

त्या प्रसंगीं कसें वागायचें, काय बोलायचें वगैरे गोष्टी मंगलच त्यांना समजावून सांगणार होते.

सभेचें काम संपलें तें मंगलांच्या जयजयकारांतच.

उंच-उंच जाणाऱ्या पतंगाकडे पतंग उडविणारा ज्या स्वाभिमानी आनंदानें बघतो तशाच भावनेनें दीना मंगलांकडे बघत होती. त्यांची कीर्ति जसजशी वाढत होती तसतसा मंगलांबद्दल तिच्या मनांत अधिकाधिक जिव्हाळा उत्पन्न होत होता. आणि असल्या थोर माणसाचा सहवास आप-ल्याला लाभावा हें केवढें आपलें दैव असेंहि राहून-राहून तिला वाटत होतें.

आणि म्हणूनच मंगलांचा जयजयकार होतांच तिचें हृदय अपूर्वशा प्रेमभावानें भरून आलें. तिला वाटलें– ' माझ्या थोरहृदयी मंगलांना ह्या वेळीं हृदयांशीं घट्ट धरून त्यांचं कौतुक करतां येईल तर किती बरं होईल !'

... रात्रीं ठाण्याला येऊन नेहमींच्या खोलींत दीना निजली तेव्हांहि तिच्या मनांत खळबळ उडून राहिली. ...

आश्रमांत आल्याला आतां बरेच दिवस लोटले होते. मंगलांच्या बहुतेक कार्यक्षेत्रांत आपलें वर्चःस्व तिनें प्रस्थापित केलें होतें. नर्सिंगचें शिक्षण थोड्याच अवधींत पुरें करून आश्रमाच्या हॉस्पिटलवर देखरेख ठेवायचें कामहि ती करूं लागली होती. नर्सिंग ही तिच्या आवडीची कला बनली. तिचा मनमिळाऊ स्वभाव, गोड आवाज, मोहक हालचाल व टापटिपीची वागणूक यांमुळें रोग्याना दीना हवी-हवीशी वाटे. एकदां तरी दीनेनें येऊन आपल्याबद्दल चौकशी करावी म्हणून प्रत्येक रोगी उत्सुक होऊन राही.

एवढ्या अवधींत मंगलांच्या स्वभावांतल्या खांचा-खोंचाहि तिनें ओळखल्या होत्या. त्यांच्या थोरपणाबद्दल तिच्या मनांत प्रथम आदरभाव होताच. सहवासानें त्याचें स्नेहांत रूपांतर झालें. दिवसभर काम करतांना स्वतःच्या परिस्थितीची जाणीव देखील तिला होत नसे. रात्रीं मात्र तिच्या ध्यानांत येई– ' आपला विवाह झाला आहे. मंगल किती झालं तरी परके आहेत. आपलं मोकळेपणाचं वागणं मर्यादेबाहेरच्या सलगीचं तर नाहीं होत ? ' असल्या विचारांमुळेंच मंगलांजवळ जेवढ्या मोकळेपणानें वागावेंसें तिला वाटत होतें तेवढी ती वागत नव्हती. कारण तिला मनाची नसली तरी जनाची भीति वाटे. जसजसा काळ लोटला तसतशी ती भीतीहि कमी होत गेलीच. तरीहि मंगलांबद्दलच्या तिच्या भावना प्रकट करण्याचा मोह होत असूनहि ती तो आवरीत असे. कारण त्यांच्या विचारांचा थांग अद्याप तिला लागला नव्हता. मंगलांच्या तिजजवळच्या वागणुकींतला मोकळेपणा ठराविक मर्यादेपर्यंतच जात असे. कांहीं अंतर ठेवूनच वागायचें असें त्यांनीं जणूं ठरवूनच टाकलें होतें.

आज मनांत अस्वस्थता पसरली तीहि मंगलांबद्दलच्या विचारांनींच.

सकाळीं म्हातारीनें उभयतांना लक्ष्मी-नारायण म्हटलें तें सारखें कानांत कुणीतरी गुणगुणत असल्याचा भास होत होता तिला.

आणि जे विचार येऊं नयेत म्हणून ती आजपर्यंत जपत होती ते मनांत वेगानें उचंबळूं पाहत होते. ...

संसारसागरांत बुडत असल्याच्या भासांत आपल्याला वांचवितांना पाहिलेला तेजःस्वी पुरुष मंगलांच्या रूपानें तिजपुढें मूर्त होऊं लागला. ...

इतक्यांत तें चित्र नाहींसें झालें आणि त्याच्या ठिकाणीं कुठच्या तरी देवळांत बघितलेली लक्ष्मी-नारायणांची संगमरवरी सुंदर मूर्ति दिसूं लागली. हळू-हळू त्या नारायणाचेंहि रूप बदलत चाललें आणि मंगलच उभे राहिले त्या ठिकाणीं. लक्ष्मीच्या जागीं स्वतः असल्याचा भास झाला. होता-होतां मंगलानीं किंचित् हंसून दीनेकडे बघितलें. तिनें अविरोधी भावानें मान वर केली. मंगलांनीं उत्कटपणें दीनेचें चुंबन घेतलें. ...

ह्या स्वप्नमय भासानें ती दचकून उठली. खोलींत एकटीच असल्याचें पाहून दीर्घ निःश्वास सोडला तिनें.

किती तरी वेळ ती तळमळत होती. उठावें ... निजावें ... उगीचच खोलींत फेऱ्या घालाव्या ... पुन्हां निजावें.

एकदा मात्र तिला वाटलें कीं मंगलांच्या खोलींत जाऊन त्यांना गदगदा हालवावें नि सांगावें ' मंगल, नाहीं हो सहन होत मनावरचं दडपण हें ! ' पण मंगलांनीं आपल्या उत्सुकतेचें शांतवन केलें तर ठीक. नाहीं केलें तर !

ज्याचें अंतःकरण सर्वांना हवें-हवेंसें वाटतें, ज्याच्या व्यक्तित्वाचा जयजयकार दीन-दुबळ्यांकडूनहि केला जातो त्याचें हृदय आपल्याला वश झालेंच पाहिजे. तें आपल्या हृदयाशीं भिडवून त्यापासून मिळणारें सौख्य अनंतकाल उपभोगायला आपल्याला मिळालें पाहिजे. तिच्या नसांतून कसल्यातरी जाणीवेची लहर शरीरभर पसरली आणि कसल्यातरी गूढ दृष्टीनें मंगलांच्या खोलीकडे ती बघूं लागली.

आंत दिवा जळत होता.

मंगल जागेच आहेत ह्या कल्पनेनें दीना त्या दिशेनें जाऊं लागली.

मंगलांनीं डायरी लिहायचें काम नुकतेंच संपविलें होतें. दिवा बारीक करण्याच्या विचारांतच ते होते.

दारांतून अगदीं अनपेक्षितपणें घुसलेल्या दीनेच्या धुंद मूर्तीला पाहून मंगल स्तिमितच झाले.

मंगलांच्या दृष्टीला दृष्टि भिडतांच दीनेची मान चटकन् खालीं वळली. अंगांतली सारी शक्ति एकाएकीं नाहींशी झाल्याप्रमाणें झालें तिला. आपण लोळपटून पडणार तर नाहींना अशीहि तिला भीति वाटली. आणि खुर्चीचा आधार घेतला तिनें.

" काय काम होतं तुझं ? "

कांहीं उत्तर न देतांहि दीनेला भडभडून आलें.

मंगल चटकन् प्रेमानें तिच्याजवळ गेले.

ती स्फुंदतच म्हणाली – " नका माझ्या अंगाला हात लावूं. मला तें सहन करवणार नाहीं. "

" काय अर्थ या बोलण्याचा ? "

" तो नकोच समजायला. देवा! देवा! किती किती वाईट आहे मी? दुष्ट ... दुष्ट आहें अगदीं. ... मंगल मला क्षमा करा. पुन्हां असं कधींहि होणार नाहीं माझ्याकडून. "

दीना जाऊं लागलेली पाहतांच तसें न करण्याबद्दल मंगलांनीं दीनेला बजावलें. आरामखुर्चीवर बसून थोडा वेळ विश्राति घ्यायला सांगितलें तिला. सर्कशींतल्या जनावराप्रमाणें दीना निमूटपणें खुर्चीवर बसली, डोळे रुमालाला पुसले. तोंच तिची दृष्टि समोर लावलेल्या ठळक अक्षरांतल्या दोन ओळींकडे गेली –

" जीवन हें कांहींतरी देण्यासाठीं आहे. "
" स्वतःपलीकडच्या जगाकडे पाहा! "

– आणि आपण केवढ्या भयंकर भावनेच्या आहारीं गेलों होतों हें तिच्या ध्यानीं आलें.

थोड्या वेळानें ती शांत होताच मंगलांनीं विचारलें –

" दीना! बरं वाटतंय आतां ? "

" क्षमा करा, मी गोंधळून गेलें होतें अगदीं. "

" तें नुसतं गोंधळणं नव्हतं. विकारी मनोवृत्तींचं बंड होतं तें.

" तुम्ही कशावरून म्हणतां हें ? "

" जात जातीला ओळखायचीच! "

" मंगल ! ... काय म्हणालांत तुम्ही ? "

" अशी दचकून नको माझ्याकडे बघूं ! "

" कां ? "

" मला सहन होत नाहीं ती दृष्टि. "

" इतकी वाईट आहे ? "

" छे ! चांगली आहे, गोड ... नव्हे मोहक आहे म्हणून." क्षणभर थांबून मंगल म्हणाले – " तूं मला ओळखलं नाहींस. मी देखील माणूसच आहें हें तूं विसरलीस. भावनांच्या प्रकटीकरणांत फरक झाला तरी भावनांत फार निराळेपणा असणं शक्य नाहीं. तुझ्या भावना मी पूर्णपणें ओळखतों. आज माझ्या खोलींत कसल्या धुंदींत तूं पाऊल टाकीत होतीस हें मीं जाणलं. पण मला मात्र त्यांत तुझा अपराध कांहींच वाटत नाहीं. दडपलेल्या नैसर्गिक भावनांचं व्यक्त स्वरूप होतं तें. त्यांच्या अकालीं आविष्करणानं मला जरी भीति वाटली तरी अनैसर्गिक मात्र कांहींच वाटलं नाहीं. "

असें म्हणून टेबलावरची रोजनिशी दीनेजवळ देत ते म्हणाले –

" वाच ही नीट, म्हणजे माझ्या अंतःकरणाची तुला कल्पना येईल आणि तुलाहि मग वाटूं लागेल कीं शांत-शांत दिसणाऱ्या माझ्यासारख्या माणसाच्या मनांत देखील प्रचंड वादळं चालूं असतात. ... "

—x—

# ५

मंगलांच्या खोलींतून डायरी हातांत घेऊन दीना मुकाट्यानें आपल्या खोलींत आली. कांहीं वेळानें ती डायरी उघडून ती वाचूं लागली. थोडींशीं पानें चाळतांच पहिल्यानें एक गोष्ट तिच्या ध्यानांत आली ती ही कीं मंगलांनीं मनांत येणारे प्रासंगिक विचार दररोज विस्तारानें लिहून ठेवलेले असून घडलेल्या गोष्टींचा तारीखवार इतिहासच तो केवळ नाहीं तर वेळोवेळींच्या भावनांचीं आंदोलनेंहि त्यांत जागजागीं मोकळेपणानें उमटविलेलीं आहेत.

आपण आश्रमांत आल्यापासून मंगलांच्या मनांत आपल्याबद्दल कायकाय विचार येऊन गेले हें समजण्याचें उत्कृष्ट साधन हातांत आल्याबद्दल तिला आनंद वाटूं लागला आणि तिनें आश्रमांत पाऊल ठेवलें त्या दिवसाची हकीगत वाचण्यास उत्कट उत्सुकतेनें सुरुवात केली.

दीनेला संरक्षण देऊन तिचा सर्व बाजूंनीं विकास करण्याची सुसंधि लाभल्याबद्दल आनंद व्यक्त करून मंगलांनीं लिहिलें होतें —

" आश्रमांत अनेक स्त्रिया आश्रयासाठीं येतात जातात. दुकानांत येणाऱ्या व नंतर नाहींशा होणाऱ्या मालाविषयीं दुकानदाराची जशी निरभिलाष वृत्ति असते तसंच असतं माझं वागणं सर्वांशीं. त्यांच्या दुःखी जीवनाबद्दल सहानुभूति दाखवावी — त्यांची दुःखांतून सुटका करण्याचा यथाशक्ति प्रयत्न करावा ह्यापलीकडे त्यांच्याबद्दल मनांत विचार मी कधीं येऊं देत नाहीं. दीनेची गोष्ट निराळी आहे. तिला शिशिरसह इथं आणली ती आश्रमाचा केवळ आश्रय मिळावा म्हणून नाहीं. स्वतःच्या पलीकडच्या जीवनांत होरपळून निघणाऱ्या जगाची तिला माहिती करून देऊन तिच्या गुणांचा कोंडमारा नाहींसा करावा, आणि तिला दुसऱ्यांच्या दुःखनिवारणापासून मिळणारा आनंद अनुभवितां यावा यासाठींच तिला इथं आणली. साहजिकच इतर स्त्रियांप्रमाणं तिच्याशीं वागून चालायचं

नाहीं मला. ह्याची जाणीव झाल्यानंच कीं काय दीना इथं आल्या-पासून माझ्या मनांत भीतीची सूक्ष्म लहर उसळत आहे. ...

कसंहि असलं तरी तिच्याजवळ मी जपून वागेन. मनांत कांहीं विचार आले तरी तिला ते कळूं न देण्याची शिकस्त करीन. ...

दीना आल्यानं आश्रमाच्या सौंदर्यांत भर पडली असलं काव्य-मय वर्णन मला करायचं नाहीं. ... एवढं मात्र खरं कीं दीनेच्या रूपानं माझ्या हातांत निष्पाप मातीचा गोळा आला आहे. मी जर खरोखर कलाकार असेन तर त्या गोळ्याची एक समाजोपयोगी मनोज्ञ मूर्ति मी बनवूं शकेन. ... "

नंतरच्या आठ दिवसांत दीनेबद्दल शब्दहि नसल्यानें दीनेनें भराभर पानें उलटलीं. नंतर पुढच्या एका पानांत ती वाचायला लागली—

" दीनेला येऊन आठ दिवस झाले. एवढ्या अवधींतहि येथल्या सर्व हालचालींवर तिनं आपली छाप पाडलीच.

तिच्या निःसत्त्व देहाकडे पाहतांच मला सारखं वाटूं लागतं कीं दीना म्हणजे अकालीं करपलेलं फूल आहे. योगायोगानं तें आपल्या हातांत येऊन पडलं आहे, तर सहानुभूतीचं सिंचन करून त्याला त्याचं मूळचं स्वरूप पुन्हां देण्याचं काम आपल्यालाच करावं लाग-णार. आपल्या हातून हें काम नीटपणानं पार पडेल का ?

परवांच तिला मीं म्हटलं — ' माईनीं तुला माझ्या ताब्यांत कां दिली माहित आहे ना ? '

' अनाथ आहें म्हणून तसं केलं तिनं. '

' अनाथ ? ' शब्दांतल्या श्लेषाचा फायदा घेत मीं विचारलं.

' हो, सनाथ असूनहि अनाथाप्रमाणंच नाहीं का मी ? '

असं म्हणतांना तिच्या मुद्रेवर करुणभावाचं व आपल्या पती-बद्दलच्या तिरस्काराचं चमत्कारिक मिश्रण पसरलेलं मला दिसलं.

पहिलं काम आपण अनाथ नाहीं ह्याची तिच्या ठिकाणीं जाणीव उत्पन्न करून देण्याचं. तो प्रयत्न हळूहळू यशस्वी होत गेला आहे.

' स्वतःपलीकडे बघण्याचं कानीं कपाळीं सांगण्याचा योग्य तो परिणाम होऊं पाहत आहे. आश्रमांत आजपर्यंत येऊन गेलेल्या

स्त्रियांच्या करुण कहाण्या मुद्दामच तिच्याकडून वाचून घेतल्या आणि त्या वाचल्यावर तिच्या वृत्तींत फरक दिसूं लागला. काल तर ती उघड म्हणाली–

'स्वतःपलीकडे केवढं विशाल जग पसरलं आहे! नि त्यांत दुःखं तरी किती भयंकर आहेत! माझ्यावरचीं संकटं त्यांच्यापुढं किती क्षुद्र वाटूं लागतात!'

तिची दृष्टि अशीच अंतर्मुख होईल तितकी चांगली. ..."

पुढच्या पंधरा दिवसांत विशेष मजकूर आला नव्हता. बहुतेक पानांत हॉस्पिटल, आश्रम व इतर चळवळी याच्याबद्दलच माहिती होती.

नंतरच्या एका दिवशीं–

"दीनेची प्रकृति अधिक सुधारण्याच्या मार्गाला लागली. माई असत्या तर खचित आनंद वाटला असता त्यांना. शारीरिक स्वास्थ्या-पेक्षा मनःस्वास्थ्य मिळूं लागल्याचाच हा परिणाम. मला तर असंहि वाटूं लागतं कीं दीना निकोप होऊन माझ्या कार्याला मदत करील तर किती बरं होईल!

तसं झाल्यास कोणती परिस्थिति उत्पन्न होईल तें मात्र सांगवत नाहीं. नदीच्या प्रगाढ प्रवाहांत प्रवेश करतांना सारं शरीर पुलकित झाल्यासारखं होतं, पण पोहतां-पोहतां मनुष्य जसजसा पुढं जातो तसतशा अडचणी वाढूं लागतात आणि मग मागंहि येतां येत नाहीं व पुढं जाण्याचंहि धैर्य होत नाहीं. त्याप्रमाणं तर माझं नाहीं ना होणार!

तिचं अस्तित्व दिवसेंदिवस मला जास्त जाणवूं लागलं आहे. आपण कोणतंहि काम केलं कीं दीनेला तें सांगावं असं वाटतं. त्यांतच तिनं कौतुकानं आपल्याकडे दृष्टि टाकली तर अंतःकरणात चलबिचल होऊं लागते.

परवांच शेतकऱ्यांची सभा उरकून आल्याबरोबर दीनेनं सगळी हकीगत विचारली. आपण करीत असलेलं काम इतरांना सांगण्याचं माझ्याच्यानं कधींच होत नाहीं, पण दीनेनं विचारतांच मात्र वाटलं कीं घडलेल्या सगळ्या गोष्टी सांगून टाकाव्या तिला.

समाजसेवेच्या अभिनिवेशानं सभेची हकीगत मग सांगितलीहि. सभेंत कोण काय बोलला, एका जमीनदारानं टीका करतांच उत्तर कसं दिलं, नि लोक त्या सावकारावर कसे चिडून गेले, आणि तुफान झालेल्या शेतकऱ्यांना कसं शांत केलं वगैरेबद्दलची हकीगत ऐकून दीनेनं भीतभीत विचारलं– 'असल्या प्रसंगाची हकीगत तुम्हीं सांगितली कीं सारखं मनांत येऊं लागतं कीं 'मी त्या ठिकाणीं असल्यें तर किती बरं झालं असतं!' आणि थोडासा विचार करून तिनं प्रश्न केला– 'मला नेत जाल का हो तुमच्याबरोबर?'

प्रकृति अजून बरी नसल्यामुळं तूं येऊं नकोस असं मीं तेव्हां उत्तर दिलं. तेवढ्यापुरतं तिचं समाधानहि झालं. पण माझ्या मनांत मात्र वाटत होतं दीना बरोबर येईल तर किती बरं होईल!' पुढच्या पंधरा दिवसांत मंगलांनीं लिहिलेल्या मजकुरांत आश्रमाशिवाय कशाहिबद्दल मजकूर नव्हता. मग एका दिवशीं मात्र–

"आज मोठा चमत्कारिक प्रसंग घडून आला.

पनवेलजवळच्या खेड्यांत शेतकऱ्यांची सभा होती. माझ्याबरोबर यायचा दीनेनं हट्टच धरला. मलाहि मग नकार देववेना.

सभेंत खूपच गोंधळ उडाला.

सभेंत सावकरांच्या विरुद्ध ठराव येणार हें आधीं समजल्यानं त्याला विरोध करण्यासाठीं कांहीं गुंड आले होते. योग्य वेळ येतांच त्यांनीं आरडाओरडीस सुरुवात केली.

असल्या प्रकारांची संवय असल्यानं मी मुळींच डगमगलों नाहीं.

ठरावाला पोषक असं भाषण मीं संपवीतहि आणलं. बोलण्याच्या भरांत जवळपासच्या कांहीं सावकारांवर मीं उघड टीका केली.

गुंडांनीं ओरडण्याची नि शिट्या वाजविण्याची कमाल केली. हातांतल्या काठ्या उंच करीत 'शब्द मागें घ्या – ठराव मागें घ्या' असल्या गर्जनेनं सभास्थान दुमदुमून सोडलं.

मी छाती पुढें करून उभा होतों. विरोधकांच्या प्रत्यक्ष हल्ल्यालाहि न जुमानतां भाषण चालू ठेवणाऱ्या लोकमान्यांनींच जणूं संचार केला होता माझ्या अंगांत.

सारी शक्ति एकवटून मीं गोंधळ माजविणारांना बजावलें—

'उच्चारलेला कोणताहि शब्द मी मागें घेणार नाहीं, ठराव तर नाहींच नाहीं.'

माझ्या निग्रही नकारानं अधिकच गोंधळ माजूं लागला. कांहीं गुंड तर माझ्या रोखानं पुढं सरकायला लागले.

बाकीचे शेतकरी या वेळपर्यंत शांत होते. पण आतां त्यांनाहि शांतता टिकवणं कठिण जाणारसं दिसूं लागलं. माझ्यावर हात टाकायला एक जरी माणूस पुढं आला तरी शांत राहिलेले शेतकरी त्याच्यावर तुटून पडतील. आणि परिस्थिति उग्र स्वरूप धारण करील म्हणून मीं सर्वांना हात जोडून प्रार्थना केली—

'बंधूंनो, शांततेचा भंग होणार नाहीं याची काळजी घ्या. माझं संरक्षण करायला मी समर्थ आहें. आणि त्यांतूनहि माझं रक्त जर इथं सांडलं गेलं तर तें वांया गेलं असं मुळींच होणार नाहीं. अन्यायांवर प्रहार करायचा म्हणजे अनेकांना देहाची आहुति द्यावीच लागते.'

दंगल माजवूं पाहणाऱ्यांना उद्देशून मीं आव्हान दिलं—

'ज्यांना माझं रक्त सांडण्याचीच इच्छा झाली असेल त्यांनीं पुढं यावं. तसं करूं द्यायला आनंदानं मी तयार आहें. माझं मस्तक धरून उभा राहतों मी. कुणींहि त्यावर प्रहार करावा. तेवढयानंहि समाधान होत नसेल तर छाती उघडी करून उभा राह्यलाहि तयार आहें. वाटेल तेवढें तीक्ष्ण शस्त्र छातींत घुसवा नि आपली इच्छा पुरी करून घ्या. नुसती दंगल माजवूं नका. पुढं या. दंगल करणाऱ्यांनो, खुशाल पुढं या आणि तुमच्या सुऱ्या छातींत घुसवा. एक मात्र ध्यानांत ठेवा कीं छाती फोडल्यावर तुम्हांला माझ्या अंतःकरणांत शेतकऱ्यांबद्दलचा जातिवंत कळवळाच आढळेल.'

माझ्या आव्हानाचा इष्ट तोच परिणाम झाला. शांत-शांत झालं सगळीकडे. सर्वांचे डोळे माझ्यावर खिळून राहिले. आव्हानाचा पुन्हां मीं उच्चार केला. पण पुढं कोण येणार!

दीनेला या वेळपर्यंत काय भीति वाटत होती कोण जाणे! चटकन् मला तिनं म्हटलं — 'पुरे करा बाई! आपण जाऊं या आतां.'

तिच्या घाबऱ्या दृष्टींत मजबद्दलची काळजी मला दिसली. किती उत्साहवर्धक होती ती!

ती वेळ निघून गेली. तेथल्या शेतकऱ्यांत माझी लोकप्रियता अधिक वाढली.

दीनेच्या घाबऱ्या दृष्टीचं मी जेव्हां विश्लेषण करूं लागलों तेव्हां कितीतरी गोष्टी आढळल्या मला.

मला ती जपण्याचा यत्न करीत होती ती केवळ मी तिचा अनन्य आधार असल्यामुळंच असेल का? माझ्या प्रत्येक हाल-चालीवर आपुलकीच्या भावनेनं ती दृष्टि ठेवते. माझ्या मनाचं विकसन करणं व शरीराची काळजी घेणं जणूं आपलं काम आहे अशा वृत्तीनं ती वागते. नुसता स्नेहच त्याच्या मुळाशीं असेल का? ”

पुढें एका ठिकाणीं तिनें केलेल्या शुश्रूषेबद्दल मंगलांनीं केलेला गौरव तिला आढळला —

“ इतर चळवळींना पूरक होईल म्हणूनच आश्रमाचं रुग्णालय उघडलं. कुठं लाठीमार झाला अगर इतर कांहीं आपत्ति आली तर गरीबांना औषधोपचार करतां यावा हा मूळ हेतु. त्याच उद्देशानं ते चालवलं जात होतं. पण दीना येण्यापूर्वी त्याच्याकडे अवश्य तेवढं लक्ष्य मला देतां येत नव्हतं. ...

दीनेला इथं आणायचं ठरवितांच पहिला हाच विचार मनांत आला होता कीं तिनं उत्तम तऱ्हेनं नर्सिंगचं शिक्षण घेतलं तर रुग्णालयांत येणाऱ्या रोग्यांची काळजी करण्याचं आपल्याला कारण राहणार नाहीं.

नर्सिंगचं शिक्षण घेण्याचं सुचवतांच दीनेनंहि कबुली दिली. शिक्षण घेऊन आतां तर त्या कामांत ती तरबेजहि झाली. रुग्णालयाचं भूषण उगीच का ती झाली आहे?

एकदां सभेहून परततांना कुणी म्हातारा आला नि चटकन् दीनेच्या पायांवर डोकं ठेवूं लागला. गरीबांत वावरण्याच्या संवयीनं हा प्रकार

मला नवीन मुळींच नव्हता. तरीहि मनात येऊन गेलंच कीं आपल्याला न बघतांहि दीनेच्या पायां पडणारा हा कोण ! मीं त्याच्या-जवळ चौकशीहि केली.

तेव्हां समजलं कीं त्याचा मुलगा अत्यवस्थ स्थितींत रुग्णालयांत आणण्यांत आला असतांना मी तिथं नव्हतों. गांवांतल्या दुसऱ्या चांगल्या डॉक्टरांच्या मदतीनं दीनेनं त्याला बरं केलं. त्याच्यासाठीं एवढी मेहनत घेतली तिनं कीं तीं नसती तर तो मुलगा वांचला नसता असं म्हाताऱ्यालाहि वाटलं.

त्याबद्दलच्या कृतज्ञतेनं तिच्या पायांवर तो मस्तक ठेवीत होता.

तें ऐकून मीं दीनेकडे बघितलं. मला ती कितीतरी थोर आणि आपल्याशीं अधिक जवळ असल्यासारखी भासूं लागली.

रुग्णालयांत शुश्रूषेचं काम एवढं उत्तम तऱ्हेनं होऊं लागलं कीं ज्या रोग्याला बरं व्हायला औषधाप्रमाणंच शुश्रूषेचीहि आवश्यकता असेल त्यानं खुशाल इथं यावं.

आणि तसे कांहीं रोगी यायलाहि लागले आहेत.

रुग्णालयाच्या आजच्या वाढलेल्या नांवलौकिकाचं श्रेय दीनेकडे बरंचसं जातंच.

अशी सद्गुणी स्त्री वाऱ्यावर सोडून देणाऱ्या माणसाला काय म्हणावं ? किती गुण भरले आहेत तिच्यांत ! किती थोरपणा प्रतीत होत असतो तिच्या लहान-सहान कृतींतून देखील ! देवळांतल्या देवतेच्या पूजनांत वेळ घालवणाऱ्यांनीं ह्या सद्गुणी देवीची पूजा करून खुशाल आपला उद्धार साधावा. मला येईल का तिची पूजा करतां ? ”

आपली पूजा करण्याची कल्पना मंगलाच्या मनांत आल्याचें वाचून दीनेला किंचित् वाईट वाटलें. ती मनाशीं म्हणाली — ‘ मी कांहीं देवता नाहीं. पूजेसाठीं देव प्रतीक्षा करीत असेल, माणूस प्रेमासाठीं तळमळतं हें मंगलांना कसं कळणार ? ’

नंतरच्या एका पानावर —

“ दोन पाय, दोन हात, दोन डोळे ह्याप्रमाणं माणसाला दोन मनं असतात कीं काय ? माझंच पाहा ना —

एक मन म्हणतं –' दीना पूजनीय आहे. फुलाचं जीवित स्वतः टवटवीत असतांना दुसऱ्यांना प्रसन्न ठेवण्यासाठीं असतं. दीना फुलाप्रमाणंच वागत आहे. आजार नाहींसा होऊन प्रफुल्ल दिसूं लागतांच-तिच्या हंसऱ्या उत्साहाची प्रभा येथल्या वस्तु-वस्तूवर पसरली. दीना देवता आहे असं ह्यामुळंच तर नाहीं वाटत मला ? ती मला मोठा समजते, पण तिला कल्पनाहि नसेल कीं तीच माझी देवता झाली आहे म्हणून. ... देवता ... देवताच ती.'

' दुसरं मन बंड करून उठतं – ' नाहीं; दीना देवता नाहीं. माणूस आहे ती. देवतांचा काळ मागं पडला, आतां माणसांचा आला आहे. पूर्वी देव होते. राक्षसहि असत. आतां माणसांशिवाय कांहीं आढळायचं नाहीं असं जगाचं स्वरूप पालटायचं आहे. दीना दगडी मूर्तीप्रमाणं निर्जीव मूर्ति नाहीं. चालती-बोलती सुख-दुःखांच्या सूक्ष्म हिसक्यानं आंदोलन पावणारी आहे. तिला भक्तीची पुष्पांजलि काय करायची ? प्रेमाची काटेरी जबाबदारीच तिला हवी. तेवढी निश्चितपणें तिच्या हवालीं कर.'

कोणतं मन बरोबर असेल ?

भक्तिभाव नि प्रेम यांतलं कोणतं हवंसं वाटत असेल ? "

क्षणभर दीनेच्या मनांत विचार आला–' मंगलांच्या अंतरंगांत आपल्याबद्दल असा संगर चालला असेल असं कधीं आढळलं नाहीं. ते समोर येतात तेव्हां नेहमीं निर्विकार दिसतात. आपणच भावनेच्या आहारीं जाऊन त्यांच्याशीं पुष्कळदां सलगी करूं लागतों, पण तेव्हां गंभीर होणारे त्यांचे डोळे आपल्याला सावध करतात. त्यांच्याबद्दल मनांत रागहि येतो आपल्या. कधीं वाटतं एवढी स्नेहपूर्ण आपली सारी वागणूक असूनदेखील मंगलांच्या मनावर कांहींच कसा परिणाम होत नाहीं ! घरांत कष्टानं दिवस घालविणारा दरिद्री नट रंगभूमीवर सर्वांना हंसवीत असतो. मंगलदेखील असेच नट आहेत काय ? मनांतली खळबळ दडपून टाकण्याचं नाटक म्हणूनच ते चांगल्या तऱ्हेनं करूं शकत नसतील ? आपल्या कोणत्याहि सलगीचा परिणाम होत नसल्याचा निव्वळ अभिनयच ते करून दाखवीत असावेत का ? '

पुढच्या एका दिवशीं—

"जीवन हें नाटक आहे कीं काय हें सांगणं कठिण आहे. तो एक लपंडाव आहे असं मात्र अनुभवास येतं.

दीनेशीं वागतांना तोच खेळ मला खेळावा लागत आहे.

आज तिनं रम्य पोशाख केला होता. पांढरं पातळ. तसल्याच रंगाचा आंखूड बाह्यांचा ब्लाऊझ. कांहींसे कपाळावर येऊन आकर्षकपणांत भर टाकणारे रेशमासारखे केंस. अंबाड्यावर बसायला मिळाल्यामुळं ऐटींत थरथरणारं कसलंसं फूल. पातळ अंगासरसं नेसल्यानं तिचा अवयवन् अवयव त्या वेळीं माझ्या डोळ्यांत शिरूं लागला.

माझ्या खोलींत येण्याची आजची तिची तऱ्हा कांहीं विचित्र वाटली मला. इतका आकर्षक पोशाख कधीं तिनं केला नव्हता, अशा चंचल दृष्टीनं मजकडे पाहिलं नव्हतं, आणि अशी कशासाठीं तरी अधीर झालेल्या भावनेनं माझ्याशीं ती कधीं बोललीहि नव्हती. तिचं हृदय बोलतांना आवेगानं खालीं-वर होत होतं. मनांत चाललेल्या खळबळींचं स्वरूप जणूं स्पष्ट करीत होतं तें. क्षणभर तिच्याच्यानं बोलवलंच नाहीं. मग तिनं म्हटलं—

'मंगल, आज फिरायला जाऊं या आपण अं!'

प्रश्न नवा नव्हता. पुलावर जाणंहि नव्यानं घडायचं नव्हतं. तिच्या स्वरांतली नि डोळ्यांतली नि हालचालींतली आजची आर्तता मात्र नवीनच वाटली मला.

फिरायला गेल्यावर गप्पा मारतांना स्वतःला मी सारखा सावध करीत होतों. जणूं मला कसली तरी भीति वाटत होती. तोंडावर मीं शक्य तेवढा कठोरपणा दर्शविला. कांहीं वेळ निर्विकार दृष्टीनं तिच्याकडे बघितलं. कसल्या तरी आशेनं ती आली होती, आणि निराशा झाल्यानं कीं काय इतरत्र पसरणाऱ्या काळोखाप्रमाणंच तिच्या तोंडावर काळेपणा पसरूं लागला. हळू-हळू तिच्या स्वरांतहि कारुण्य वाढूं लागलं. आणि कांहींशा चिडक्या कातरतेनं ती म्हणाली—

'देवाच्या पायांवर पडूनच आपल्या जीविताची अखेर व्हावी असं फुलाला कितीहि वाटलं तरी तसं घडणं त्याच्या हातांत नसतं हेंच खरं!'

आणि तिच्या नेत्रांतून खळकन् आसवं गळलीं.

नंतर किती तरी वेळ विचार करीत होतों मी. कित्येक कल्पना आल्या नि गेल्या.

दीनेबद्दल निर्विकार राहणं निर्दयपणाचंच होईल. तिच्याबद्दल अधिकाधिक आपलेपणा बाळगणं कर्तव्य आहे माझं.

पण ..."

वाचतां-वाचतां दीनेचें हृदय संमिश्र भावनांनीं भरून येत होतें. मंगलांना कांहीं भावना नाहींत, आपल्याबद्दल त्यांच्या ठिकाणीं जिव्हाळा नाहीं, असले आरोप आपण करीत होतों ते किती खोटे होते हें दीनेला आज समजलें. मंगलाना मनांतल्या संगरामुळें किती ताप होत असेल ह्याची जाणीव तिला होऊं लागली. एवढया थोर पुरुषाला आपल्यासाठीं सारा त्रास सहन करावा लागतो आहे त्याचा परिहार व्हावा म्हणून मंगलांचं मस्तक हृदयावर ठेवून हळू-हळू थोपटावें आपण अशीहि कल्पना येऊन गेली तिच्या मनांत.

त्यापुढें दर दिवशींच दीनेबद्दल कांहीं तरी लिहिल्याचें आढळूं लागलें. सार्वजनिक कार्याबद्दलचा आढावा संपला कीं दीनेविषयीं चार शब्द तरी असायचेच.

मध्येंच एकदां —

" लोकसेवा-विषयक माझीं कर्तव्यं व वैयक्तिक अभिलाषा यांचा मनांत चालू असलेला कल्लोळ कमी होण्याचीं चिन्हं दिसत नाहींत.

आणि दीनेनं तर भक्तीची शींव ओलांडून प्रेमाच्या वाटेवर पाऊल टाकलं देखील!

माझ्या बऱ्या-वाईटाची, सुख-दुःखाची, इतकंच नाहीं तर शरीराला येणाऱ्या थकव्याची देखील काळजी वाटूं लागली आहे तिला.

माझ्या मनांत तर आज कधीं न डोकावणारा विचार येऊन गेला. दीनेनं सूचक अर्थानं बोलावं अगर हावभाव करावा नि मीं

मात्र तिचा भाव उमगूनहि कोणत्याच प्रकारानं तिला उत्तर देऊं नये असं नेहमीं चालायचं. पण आज बोलण्याच्या भरांत मला तितकं भान राहिलं नाहीं. तशी वाईट गोष्ट घडली नाहीं कोणतीच, पण तिच्याशीं केलेल्या संभाषणानंतर मनांत आलं—' दीनेचा जर विवाह झालेला नसता तर किती-किती बरं झालं असतं ! '

क्षणांतच तो विचार नाहींसा झाला. आपण असे विचार मनांत आणणं वाईट. सार्वजनिक जीवनाला काळिमा लागण्याचा संभव फार त्यामुळं. आपल्या लोकसेवेच्या कार्याकडे शेंकडों गरीबांचे डोळे लागून राहिले आहेत ते तिरस्कारानं संतप्त होतील किंवा वाईट वाटून अश्रूंनींहि भरून जातील.

मन आवरलचं पाहिजे मला.''

पुन्हां पुढच्याच पानावर—

"आज फिरायला गेलों कळव्याच्या पुलावर. सायंकाळीं इथं मोठा गमतीचा देखावा दिसतो. पुलाच्या दोन्ही बाजूंच्या भिंतींवर रांगेनं लहान-मोठीं माणसं बसतात. भरतीच्या वेळीं पुलाखालून जाण्याकरितां जवळ-जवळ येणाऱ्या जहाजांवरच्या कोळ्याची शीड खालीं करण्यासाठीं धांदल उडालेली असते. लहानशा होडींतून गमतीनं हिंडणारीं मुलं मधूनच इकडून तिकडे जात असतात. पुलावरून वाहनांची गर्दी झाल्यानं म्हातारीं म्हाणसं जपून-जपून चालण्याची व हाताला धरून चालण्याऱ्या नातवंडांना संभाळण्याची पराकाष्ठा करीत असतात. पक्ष्यांच्या चिंवचिंवाटाप्रमाणं बोलत ख्रिश्चन तरुणी जातात. खाडीच्या तीराला लागूनच तुरुंगाचे उंच बुरूज उभे आहेत. अकालींच कोमेजत नि करपत असलेले तरुण-तरुण नि आशादायी जीव दडवून ठेवीत असतील त्यांच्या भिंती आपल्या आड ! पण बाहेर केवढं त्याच्या उलट दृश्य ! जीवनांतील प्रखरतेची झळ लागून ज्यांचीं तोंडं अजून म्लान झालेलीं नाहींत अशा तरुण-तरुणी मंजुळ आवाजात आपापसांत कुजबुजत दूर कुठं तरी जाऊन बसण्यासाठीं त्वरेनं चाललेलीं असतात.

पण आज आम्ही गेलों तेव्हां मात्र मुळींच गर्दी नव्हती.

पुलाच्या पलीकडील चढ-उतार ओलांडून आम्ही गेलों. बोलण्याच्या भरांत इथं येईपर्यंत मागंहि बघितलं नव्हतं. पण सहज एकदां मागं दृष्टि गेली तेव्हां लक्ष्यांत आलं कीं कोणी तरी बाई आमच्या पाळतीवर येत आहे. आमच्या शक्य तेवढं जवळ चालून संभाषण ऐकण्याचा तिचा हेतु स्पष्ट दिसत होता मला.

मी सावधानतेनं बोलूं लागलों ...

कित्येकदां वागणुकींत जी गोष्ट उगवतहि नाहीं ती लोकांत पिकवली जावी — दीनेशीं एवढ्या निग्रही संयमानं वागूनहि इतरांच्या मनांत संदेह उत्पन्न व्हावा — केवढें आश्चर्य आहे हें !"

* * *

येथपर्यंत दैनंदिनी वाचल्यावर मंगलांच्या अंतरंगांतल्या भावनांच्या प्रवाहावर चांगलाच प्रकाश पडल्यासारखें दीनेला वाटलें. आपल्या भावनांच्या प्रवाहाशीं तो समांतर असल्याचें पाहून तिला अतिशय आनंद झाला.

आणि त्यानंतर खिडकीच्या बाहेरील प्रदेशाकडे जेव्हा ती पाहूं लागली तेव्हां साऱ्या जगाकडे नव्याच कोणत्या तरी दृष्टीनें बघत आहों आपण असा भास झाला तिला : मंगलांबद्दल आपल्या मनांत जें प्रेमाकर्षण उत्पन्न झालं आहे तें फुकट जाणार नाहीं. मंगलांकडून आजपर्यंत उपेक्षा केली गेली असली तरी पुढं त्यांना ती करणं शक्य नाहीं. मनाला ताब्यांत ठेवणं नि नटाप्रमाणं अभिनय करणं कांहीं मर्यादेपर्यंतच शक्य असतं. ती मर्यादा मंगलांची ओलांडली कीं... !

मंगलांबद्दलच्या आदराची जागा भक्तीनें पूर्वीच घेतली होती. तीवरच आता प्रेम अधिष्ठित झालें नि तिच्या वागणुकींत विलक्षण फरक झाला. मंगलांकडे स्नेहाळ कटाक्ष टाकतांना, थट्टेनें कांहीं बोलतांना अगर सलगीनें वागतांना तिच्या मनांत सारखी जाणीव उत्पन्न होत असे कीं— 'माझ्या मनानं मंगलांबद्दलच्या विचारांत केव्हढीहि प्रगति केली असली तरी मंगल अजून आहेत तेथेंच आहेत. त्यांच्या मनांत अजून आदर — फारच तर भक्ति — आहे माझ्याबद्दल.' आतां ते विचार येण्याचें कारण नव्हतें. मंगलांच्या हृदयाचा पूर्ण ठाव तिला लागला होता. त्यांच्याशीं ती अधिक सलगी करूं लागली. व स्वतःच्या शृंगारांत अधिक वेळ खर्च करूं लागली.

आणि तसें केल्यावर मंगलांना आजपर्यंत चुकूनहि न विचारलेला प्रश्न विचारूं लागली –

‘ मंगल, आज कशी दिसत्ये मी ! शोभतंय ना हें पातळ मला !’

मंगल तरीहि उत्तर देण्याचें टाळीत होते ! अजून त्यांच्या मनानें कसें वागायचें हें ठरवलेंच नव्हतें !

* * *

एकदां सकाळीं मंगलांची उठण्याची वेळ टळून गेली. दीनेचीं सकाळचीं कामें आटपल्यावरहि मंगल कुठें दिसेनात म्हणून ते अजून निजलेलेच आहेत कीं काय तें पाहण्यास ती त्यांच्या खोलीशीं गेली. तिनें आंत पाहिलें तों खरोखरच मंगल गाढ झोंपेंतच होते अजून.

टेबलावरचे अस्ताव्यस्त पडलेले कागद आवरून ठेवावे म्हणून ती हळूच आंत आली. तसें करतां-करतांच तिला कागदांखालीं उघडीच पडलेली मंगलांची डायरी आढळली. आदल्या रात्रींच लिहिलेला मजकूर दिसतांच तिनें अधीर दृष्टीनें मंगलांकडे एकवार बघितलें नि वाचायला सुरुवात केली–

“ ... हें पत्र म्हणजे मला मोठा धक्काच दिल्यासारखं वाटतं आहे. आश्रमांतल्याच एका स्त्रीनं तें लिहावं हें तर त्याहूनहि भयंकर आहे. पत्रांत ती म्हणते– ‘...तुमच्या त्यागाच्या छायेंत उभं राहायची देखील माझी लायकी नाहीं. अनाथ गरीब स्त्री मी. तुम्हांला काय उपदेश करणार ! पण राहवत नाहीं. तुमच्या वागणुकीकडे बघितलं तर राहून-राहून वाटूं लागतं– आश्रमाचं पुढं काय होणार आहे देव जाणे ! माझ्याप्रमाणं सगळ्याच स्त्रियांना तुम्ही किती थोर वाटतां तुम्हांला कल्पना नाहीं. आमची ही भावना बदलण्यासारखं आचरण तुमच्याकडून घडणार नाहीं ना ! एकदां वाटतं तसं घडणं शक्य नाहीं. फिरून विचार येतो– काय सांगावं ! तरुण माणसाची विचारशक्ति तारुण्याच्या छायेंत मंदावत असली तर ! ह्याहून अधिक स्पष्ट काय लिहूं ! ’

दीनेखेरीज कोणत्याच स्त्रीजवळ मी सलगीनं वागत नसल्यानं हें पत्र तिजजवळच्या माझ्या वागणुकीला उद्देशून तर नसेल ना !

सार्वजनिक कार्याला वाहून घेतलेल्या माणसालादेखील मन असतं – भावना असतात – विकार असतात हें प्रत्येकजणच विसरतो की काय कोण जाणे! ‘ जीवन हें दुसऱ्याला कांहीं तरी देण्यासाठीं आहे. ’ मला पटतं. पण कांहीं तरी द्यायचं म्हणजे माणसानं जगायला तर हवं. नि जगायचं म्हटलं कीं नैसर्गिक प्रवृत्तींचा कोंडमारा करून किती दिवस काढतां येतील? त्यागाचं कंकण हातीं बांधणाऱ्याच्या मनांत भोगाची कल्पनाहि कधीं येणारच नाहीं काय?

दीनेशीं मीं मर्यादाबाह्य वर्तन आजवर कधीं केलं नाहीं.

पण ती ज्या प्रेमाची आशा धरीत आहे तें प्रेम तिला द्यावं असं मला वाटतं.

आणि आश्रम व इतर कर्तव्यं पार पाडीत असतांना स्वतःच्या समाधानाची एवढीहि गोष्ट मीं करूं नये?

ध्येयावर दृष्टि अढळ ठेवून वागलं कीं यश ठेवलेलं असतं. ध्येयासाठीं सर्वस्व देऊनच हा सारा प्रपंच निर्माण केला. देवांचा काळ जाऊन माणसांचा काळ आला आहे आतां. मग माझ्या हातून दीनेच्या संबंधांत वागतांना किंचित् स्वार्थ घडून आला तर जगानं कां त्याला नसतं महत्त्व द्यावं?

कुणी कांहीं म्हणो, दीनेवर प्रेमाचं छत्र धरायचंच.

तसं करणं सार्वजनिक कार्याच्या आड येणार नाहीं व इतरांना त्याचा संसर्ग लागणार नाहीं अशी मी काळजी घेईनच.”

टिपण वाचतां-वाचतां दीनेच्या प्रवृत्तींत फरक पडत गेला. मंगलांचा निश्चय वाचून तर तिच्या दृष्टींत उन्माद तरळूं लागला.

मंगलांना जागें करण्यासाठीं आपण त्यांच्या खोलींत आलों आहों हें ती पार विसरून गेली!

पलंगाजवळ जाऊन तिनें बघितलें.

मंगल अजूनहि गाढ झोंपेंत होते. भरदार रुंद छाती मंदपणें खाली-वर होत होती. कपाळावर आलेले केंस वायूच्या मंद लहरींबरोबर समुद्राच्या लाटेबरोबर हेलावणाऱ्या फुलाप्रमाणें प्रसन्नपणें डुलत होते.

दीनेची दृष्टि मात्र मंगलांच्या रुंद कपाळावर स्थिरावली.

चंद्राच्या आकर्षणानें समुद्राच्या पाण्याला खेंचून घ्यावें त्याप्रमाणें मंगलांच्या गादीकडे तिचें तिलाहि न कळत दीना ओढली गेली. आणि खालीं बसल्यावर तिचें मन इतकें भावनेच्या आहारीं गेलें कीं आपण आहों कुठें ह्याचें भानहि तिला राहिलें नाहीं. भावनेचा उमाळा इतका प्रबळ झाला कीं दीनेनें चटकन् त्यांच्या कपाळाचें चुंबन घेतलें.

... आणि मंगल त्यामुळें जागे झाले !

दीनेला वाटलें होतें कीं 'आता मंगल आपल्याला बाहुपाशांत धरतील नि मग आपण ...'

पण तसें कांहींच झालें नाहीं.

उलट ते घाबरूनच उठले, दूर जाऊन ते विस्मययुक्त भीतीनें दीनेकडे रोंखून बघूं लागले.

त्यांच्या अनपेक्षित वर्तनानें दीनेची मोठी चमत्कारिक अवस्था झाली. काय करावें तेंच तिला सुचेना.

आणि तिच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले.

" दीना ! काय केलंस हें ? "

मंगलांचें तोंड एकदम उतरल्यासारखें झालें होतें.

" दीना ! " त्यांनीं कातर आवाजात हांक मारली. " दीना, कशासाठीं खोलींत आली होतीस ? "

ती कांहीं बोलली नाहीं. मंगलांनीं सहानुभूतीनें तोच प्रश्न पुन्हां विचार-तांच आंत येण्याचें कारण दीनेनें सांगितलें.

" मला जागा करण्याऐवजीं काय केलंस ? "

" असं करणं तुमच्या दृष्टीनं अयोग्य आहे-का ? "

" तुला नाहीं त्यांत कांहीं अयोग्य दिसत ? "

मंगलांच्या दुटप्पी विचारांची दीनेला ह्या वेळीं मात्र चीड आली. नुकताच वाचलेला मजकूर नि आतांचें बोलणें यांची सांगड तरी कशी घालायची ?

" डायरींत लिहिल्याप्रमाणं तुम्ही वागाल असं मीं मनांत मानलं. तुमच्या लिहिण्यांतल्या व वागण्यांतल्या ह्या फरकाची संगत तरी कशी लावायची ? रात्रीं डायरींत 'प्रेमाचं छत्र धरण्या'च्या गप्पा मारणारे तुम्ही

सकाळींच माझ्या निर्मल स्पर्शानं चिडून जावेत ! मंगल, काय ह्याचा अर्थ समजायचा ? ''

मंगलांच्या आतां सर्व प्रकार ध्यानांत आला.

" दीना, सार्वजनिक काम करणारी व्यक्ति सामान्य माणसांप्रमाणं भावनेच्या बाबतींतले विचार आचारांत आणण्याला स्वतंत्र नसते. भोंवतालच्या परिस्थितीला अनुसरूनच सार्वजनिक कार्यकर्त्याला आपलं वर्तन ठेवावं लागतं. माझ्या मनात तुझ्याविषयीं आलेले विचार कृतींत आणणं शक्य नाहीं म्हणूनच मीं ते डायरींत लिहून मनाचं समाधान करून घेतलं. लिहिलेले विचार खरे आहेत एवढंच मी तुला सांगूं शकेन. ह्यापलीकडे पाऊल टाकणं म्हणजे कार्यनाश आहे तो.''

दीनेच्या क्षुब्ध मनाला थोडाहि शांतपणा आला नाहीं.

तो दिवस दोघांनींहि तशाच अस्वस्थतेंत घालवला.

आणि त्यांत भर टाकण्यासाठींच कीं काय तिच्या नांवानें अचानक एक नोटीस तिच्या सासरहून आली.

त्यामुळें तर ती अधिक चिडली.

दीनेला मिळणारे दहा रुपये ती वर्तनानें शुद्ध राहत नसल्याचें श्रीकांताला दिसून आल्यामुळें पुढील महिन्यापासून त्या नोटिशीप्रमाणें बंद होणार होते !

दहा रुपयाची तिला मोठी किंमत वाटत होती असें मुळींच नाहीं. मंगलाकडे आल्यापासून तिला पैशांची उणीव कधींच पडली नाहीं. तत्त्वाकरितां म्हणूनच दहा रुपयांचा ती स्वीकार करीत होती आजपर्यंत. पहिल्या बायकोला घालवून दुसरीशीं लग्न करणाऱ्यानें आपल्याला बदफैली म्हणावें ह्यामुळें तिच्या अंगाचा दाह होऊं लागला. नोटिशीचा दोन्ही हातांच्या तळव्यानें चोळामोळा करीत विचित्र दृष्टीनें ती खोलींत बघूं लागली.

खोलींत कोणी नव्हतें.

आणि म्हणूनच कीं काय आपल्या असहायतेबद्दल तिला हुंदका आला.

बऱ्याच वेळानें तिला वाटलें— ' हेंच जर माझं मंगलांशीं लग्न झालेलं असतं तर किती बरं झालं असतं ! आश्रमाची जबाबदारी पहिल्यापासूनच मजकडे आली असती आणि त्यांची स्थिति आजच्याहूनहि चांगली भरभराटलेली असती. मंगलाना स्वतःच्या भावना लपविण्याचं नाटक करावं

लागत आहे तें लागतं ना. अधिक मोकळेपणानं माझ्याशीं वागल्यानं मलाहि अधिकाधिक उत्साह वाटला असता. पण तें झालं नाहीं. आणि दुसरंच कांहीं तरी झालं!'

त्याच विषण्ण मनःस्थितींत ती निजली व दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठली.

तारुण्यसहज भावना मिळेल त्या वाटेनें बाहेर पडण्यासाठीं धडपडत होत्या नि परिस्थिति त्यांचा चहूं बाजूंनीं कोंडमारा करण्याची पराकाष्ठा करीत होती. परिस्थिति नि भावना यांचा संगर दिवसेंदिवस आपल्याला असह्य होत आहे ह्याची स्पष्ट जाणीव दीनेला अलिकडे सारखी होऊं लागली होती. पण त्यांतून सुटण्याचा मार्ग मात्र एकहि मोकळा नाहीं हेंहि तिला तितक्याच स्पष्टपणें दिसत होतें. मनाची ह्या जाचांतून जर लवकरच सुटका झाली नाहीं तर तें कोणत्या तऱ्हेनें मोकाट सुटेल नि कोणत्या नाहीं ह्याची तिची तिलाच भीति वाटूं लागली.

... आणि अशा विमूढावस्थेंत असतांनाच सहजासहजीं त्या कोंडमाऱ्यांतून सुटका होण्याचा मार्ग एका घटनेमुळें तिला अचानक सांपडल्यासारखा वाटला.

आश्रमांत साधू नांवाचा एक गडी होता. दीना आल्यापासूनच तिच्यावर त्याची भक्ति जडली. आपल्या घरीं येण्याबद्दल किती तरी वेळां बिचाऱ्यानं तिला पाचारण केलें असेल. पण आजवर तिचें तेथें जाणें झालें नव्हतें. ती वेळ आज सहज आली.

साधूनें कसल्या तरी निमित्तानें सत्यनारायणाचा बेत केला अन् प्रसादाकरितां त्यानें विशेष आग्रहानें दीनेला आपल्या घरीं बोलाविलें होतें. प्रेमळ साधूच्या निमंत्रणाचा स्वीकार न करणें दीनेलाहि कठिण वाटलें.

मंगल व आपण बरोबर जायचें अशा इच्छेनें रात्रीं बराच वेळपर्यंत ती जाऊं शकली नाहीं. कारण मंगलांना यायला उशीर झाला. ह्यापुढें आणखी उशीर करणें बरें नाहीं असें वाटून दीना एकटीच साधूकडे गेली.

बहुतेक मंडळी प्रसाद घेऊन निघून गेलेली असल्यानें साधूच्या बायकोजवळ दीनेला मोकळेपणानें बोलता आलें.

साधूची बायको जशी तरुण होती तशी समाधानीहि दिसली. वर्णानें काळी-सांवळी असूनहि तिची चेहऱ्याची ठेवण बऱ्यापैकीं असल्यानें दीनेला ती बरीच गोड दिसली.

साधूकडून दीनेची सर्व हकीगत तिला समजली होती. तिच्या मनांत दीनेविषयीं अत्यंत आदर वसत होता. त्यामुळें दीनेच्या साध्या प्रश्नाला-देखील ती मनापासून उत्तर देत होती. आणि जों-जों दीना तिच्याबद्दल अधिक माहिती काढूं लागली तों-तों तिचें चरित्र म्हणजे एक गूढ आहे अशी दीनेची खात्री पटूं लागली. इतके दिवस साधूविषयीं आपण कांहींच कशी चौकशी केली नाहीं अशी तिला रुखरुख वाटूं लागली.

साधूच्या बायकोचें मूळचें नाव गोदू. साधूची लग्नाची बायको नव्हतीच ती. लग्नाच्या नवऱ्यानें गिरणींतल्या दुसऱ्या मोलकरणीच्या नादीं लागून गोदूला टाकून दिली होती. लोकांकडे कामें करून बराच काळ आपलें पोट गोदूनें भरलें. पण एकदा ती आजारी पडली. त्यापायीं बराच उपचार करावा लागल्यामुळें तिला कर्ज काढून डॉक्टरचे पैसे द्यावे लागले. थोड्याशा मिळ-कतीनें पोट भरण्याची पंचाईत, मग कर्ज कसें फेडायचें ! त्याच सुमारास साधूशीं तिची ओळख झाली. साधू तिला आवडला. साधूनेंहि तिला आपल्या-बरोबर येण्याबद्दल विचारलें नि तिनें त्यास कबुली दिली. तेव्हापासून साधू-जवळ ती आहे. साधूची ती लग्नाची बायको नाहीं हें कुणाला समजत-देखील नाहीं इतकीं मिळून-मिसळून असतात तीं दोघें.

दीनेच्या मनात अनेक प्रश्न उभे राहिले. गोदूच्या हकीगतीनें अत्यंत अस्वस्थ झाली ती. सांपडत नव्हता तो मार्ग सांपडल्यानें तिच्या तोंडावर अधीरपणा पसरला. केव्हां एकदां जाऊं नि मंगलांना विचारूं असें होऊन गेलें तिला.

"गोदू ! साधूची बायको म्हणून राह्यलीस पण लोक मानतील का तसं ?" दीनेनें विचारलें.

"न का म्येले मानोत ! " चुलींत लाकडें बेफिकिरपणानें खुपशीत गोदूनें उत्तर दिलें.

चुलींतला जाळ मोठा झाला. त्याचा धगधगीत लालसर प्रकाश साधूच्या घरांतल्या त्या धुरकटलेल्या भिंतीवर अधिकच उठून दिसला. आपल्या मनश्चक्षूंपुढें पसरलेला काळोख देखील झटकन् त्या प्रकाशानें नाहींसा केल्याचा भास दीनेला झाला.

कसल्या तरी निश्चयानें ती उठली.

वाटेंत तिला माईच्या शेवटच्या उपदेशाची आठवण झाली आणि आपल्या निश्चयाला तिचा मोठाच पाठिंबा असल्याचें ध्यानीं येऊन तिची वृत्ति अधिकच उत्तेजित नि उल्हसित झाली.

आणि— ‘ मनाचा कोंडमारा आतां नाहींसा होणार, नैराश्याची काजळी निघून जाऊन नव्या आशांच्या उजळ्यानं मन प्रसन्न होणार!’ —अशा किती-किती कल्पना मनांत येत होत्या तिच्या! भोंवतालीं काळोख असूनहि तिला वाटलं पौर्णिमेचें मंगल चांदणें पसरलें आहे चहूं बाजूंना!

रात्रीं मंगल येईपर्यंतचा वेळ तिनें कसा काढला तिचें तिलाच माहित. किती तरी वेळां मंगल आल्याची चाहूल लागल्यासारखें वाटून बाहेरच्या दाराशीं ती गेली असेल. किती तरी वेळां मंगलाचें उत्तर कल्पनेनेंच ठरवून भावी काळाकडे उत्साहभरानें तिनें बघितलें असेल.

मंगल आल्यावर त्यांची त्या दिवसांत घडून आलेली हकीगत तिनें नेहमींप्रमाणें आज विचारली नाहीं. साधूकडे झालेल्या सत्यनारायणा-संबंधींच बोलायला सुरुवात केली तिनें. त्यातहि गोदूची माहिती देताना रंगून गेली ती.

आणि हळू-हळू तिच्या तोंडावर आरक्तता येऊं लागली. खालचा ओंठ वरच्या ओंठानें क्षणभरच दाबून मनांतले विचार एकाच वाक्यांत बोलण्याच्या अभिनिवेशानें तिनें मंगलांकडे स्थिरतेनें बघत कातर आवाजांत विचारलें—

“ मंगल, मला नाहीं का गोदूप्रमाणं तुमच्याजवळ राहतां येणार ? ”

तो अनपेक्षित सरळ प्रश्न ऐकून मंगल स्तिमित झाले. क्षणभर गांगरले देखील ते. पण लागलींच कांहींशा उसन्या अवसानानें मनांत उसळणाऱ्या खऱ्या भावना कोणत्या तरी जबाबदारीच्या जाणीवेनें दाबीत, त्यांचा कोंडमारा करीत, डोळे संकुचित करीत, मस्तकाला सूक्ष्मसा हिसका देत ते उत्तरले—

“ छे छे! दीना, कसं शक्य आहे तें ? ”

---

# ६

"कि ती ग मस्ती करायची? जरा स्वस्थ पडलीस तर काय बिघडेल? नीज, अगदीं हलायचं नाहीं हं!"

चतुरेनें उच्चारलेले हे शब्द ऐकून तिनें ते स्वतःच्या लहान बालकाला उद्देशून बोलले असतील असें साहजिकच कोणालाहि वाटण्यासारखें असलें तरी वस्तुस्थिति मात्र तशी नव्हती.

तिच्या आवडत्या मनीला – माजरीला – उद्देशून ती बोलत होती!

मनी तिच्या लग्नाआधींपासूनच तिची आवडती होती. लग्नानंतर लोटलेल्या कालांत तर ती तिला अधिकच जीव कीं प्राण होऊन राहिली होती, आणि त्याचें कारणहि तसेंच होतें.

श्रीकांतानें आईच्या इच्छेसाठीं दुसरें लग्न केलें. लग्नामुळें दीनेची हकालपट्टी झाली. त्याच्या मूळाशीं निराळाच हेतु होता. नित्याच्या आजारी-पणामुळें दीनेला मुलें होण्याची आशा लोप पावली होती. मिळकतीला वारस पाहिजे होता म्हणून नव्हे तर निदान आपलें घर तरी मुलांबाळांनीं भरून जावें यासाठींच श्रीनें दुसरें लग्न करणें त्याच्या आईला आवश्यक वाटलें होतें. श्रीचा हात चतुरेच्या हातीं देण्यांत त्यांची तीच प्रमुख आकांक्षा होती. चतुरा चांगली निरोगी नि सशक्त, मुलांबाळांनीं घर गजबजूं लागा-यला काय उशीर! श्री व चतुरा यांच्या शृंगारचेष्टा दुरून पाहतांना त्यांना म्हणूनच समाधान वाटत असे. चतुरेच्या आगमनानें श्रीच्या वागणुकींत बदल झाल्याचें बघून झालेल्या आनंदावर चतुरेला पुत्रप्राप्ति होऊन कळस चढविला जाईल तर किती बरें होईल असें त्यांच्या वारंवार मनांत येई.

पण त्यांची आशा सफल होण्याचें कांहींच चिन्ह दिसेना.

आजींच्या मनांत हळू-हळू असमाधान वाटूं लागून त्यांच्या बोलण्यांतहि त्याचा परिणाम दिसून येऊं लागला.

कुणी शेजारच्या बाई बसायला आल्या एकदां. निरनिराळ्या गोष्टीं-विषयीं बोलणीं होतां-होतां चतुरेबद्दल विषय निघाला. बोलण्याच्या ओघांत

आर्जीच्या मनांतलें तें असमाधान त्यांना नकळत व्यक्त झालें. त्यावर ती बाई तेथेंच असलेल्या चतुरेला उद्देशून म्हणाली—

"श्रीशीं तुझं लग्न झालं तेव्हांच सोन्यासारखं झाल्याचं मीं आर्जीना म्हटलं. पण सोन्याहून पिवळं म्हणजे मुलगाच व्हायला हवा आतां!"

त्यावर चतुरा काय उत्तर देणार?

"काय ग? बोलत नाहींस ती?"

"बोलायचं काय?"

"बरं. नको बोलूं. काय तें करूनच दाखव म्हणजे झालं!"

चतुरेनें तिचें बोलणें हंसण्यावारी नेलें. पण तिच्या मनांत त्यांच्या त्या स्पष्ट बोलण्यानें अस्वस्थता पसरल्यावांचून राहिली नाहीं.

आपण माता झालों नाहीं म्हणून आर्जीच्याच स्वभावांत फरक पडत आहे असें नाहीं तर श्रीकांतांतहि तो होत असल्याचें चतुरेला अलिकडे दिसूं लागलें. लग्नानंतर आपल्या मादक सौंदर्याच्या जोरावर श्रीला आतां-पर्यंत तिनें वाटेल तसें झुलवलें. श्रीच्या ठिकाणची बऱ्या-वाईटाची जाणीव अजिबात नाहींशीच झाल्यासारखी झाली होती. पण आतां सर्वच वेळीं तसें होईनासें होऊं लागलें. निव्वळ सौंदर्यानें श्रीला ताब्यांत ठेवणें ह्यापुढें पहिल्याइतकें सोपें नाहीं, क्षणापुरता तो बेभान झाल्याप्रमाणें दिसला तरी लागलींच तो सावध होतो, आंतुन कांहींतरी बोंचत असल्यासारखी त्याची चित्तवृत्ति बनते, याचा अलिकडे तिला चांगलाच प्रत्यय येऊं लागला.

स्वतः चतुरेंतहि झपाट्यानें फरक होत होता. दीनेचा द्वेष करून तिचें समाधान होईना. कारण दीना पुष्कळच लांब होती. श्रीच्या मनांत दीने-बद्दल आठवण येऊं लागली म्हणजेच तिचा मत्सर जागा होई. असे प्रसंग फारसे येत नसत. साहजिकच रिकाम्या मनाला दुसरा कसला तरी लळा हवा असें वाटूं लागलें. घरांत जवळ-जवळ कांहींच काम करावें लागत नसल्यानें तिला कोणत्यातरी व्यवसायाची आवश्यकता अधिकाधिक भासूं लागली. कितीतरी वेळां स्वस्थपणानें बसली असतांना तिच्या मनांत येई कीं आपल्याला लहान मूल असतें तर? हृदयांतली वत्सलता जागृत होई नि कुणाला तरी मातेच्या प्रेमानें जवळ घेऊन गोंजारावें नि त्याच्या लाल-नांत सर्वस्व खर्चावें असें तिला वाटूं लागे.

पण लगेच आपल्याला मूल नाहीं ही जाणीव जागृत होई आणि ती खिन्न होई.

आणि असल्या खिन्नतेच्या क्षणीं मनीचा उपयोग तिला फार होत असे. लहानगें बाळच आहे ती अशा भावनेनें तिला हृदयाशीं आवळून चतुरा मनीच्या तोंडाचे किती तरी वेळां मुके घेई, लडिवाळपणानें तिला खेळवी, जवळ निजायला घेई, अन् तिला जराशीहि अस्वस्थता वाटत असल्याचा संशय आला कीं तिच्या स्वतःवर त्याचा परिणाम होई.

मातृत्वाच्या अतृप्त भुकेचें समाधान असल्या प्रकारानें केल्यामुळें चतुरेला थोडें बरें वाटत असे.

आज गादीवर निजवतांना ' नीज, अगदीं हलायचं नाहीं हं ' असें जें तिनें मनीला म्हटलें त्या शब्दांमागें तरी तिचा स्वतःच्या मनाचें समाधान करण्याचाच भाव होता.

आज दहा वाजले तरी श्री बाहेरून आला नाहीं. चतुरेला साहजिकच काळजी वाटूं लागली.

पूर्वी फारसा तो बाहेर जात नसे. त्याच्या मित्रमंडळींनीं त्याला बाईलवेडा म्हणून हिणविण्याला देखील कमी केलें नव्हतें. अलिकडे मात्र नियमानें तो गप्पा मारायच्या निमित्तानें रात्रींचा बाहेर जाऊं लागला होता. चतुरेच्या मनांतून आईनें त्याला बंदी करायला हवी होती, पण त्या कांहींच बोलेनात. चतुरेला त्यामुळें स्वस्थ बसणें भाग पडलें.

वाट पाहून-पाहून चतुरा कंटाळून गेली. मनीचें म्यॉंव् म्यॉंव् थांबेना व श्रीहि घरीं येईना.

ती बरीच अस्वस्थ झाली. खिडकींतून तिनें बाहेर पाहिलें. रस्त्यावरून येणाऱ्या व जाणाऱ्या माणसांकडे उगीचच ती रागानें बघूं लागली.

इतक्यांत खालचें दार वाजलें.

श्री आल्याची खात्री होतांच मनीला तशीच सोडून ती खालीं गेली.

निजायच्या वेळीं चतुरेनें श्रीला विचारलें—

" कुणाकडे बसलां होतां इतका वेळ ! "

" प्रभाकडे. "

" इतका वेळ ! "

" हो. कां ! काय झालं त्यांत ! "

" इतका दरिद्री प्रभाकर कसा आवडतो तुम्हांला बाई ! "

" श्रीमंतांनीं श्रीमंतांशींच मैत्री करावी असा नियम का आहे ! "

" असेंच नाहीं माझं म्हणणं. पण प्रभाकर आजपर्यंत कधीं मित्र नव्हता तुमचा. अलिकडेच त्याचं वेड लागलंय तुम्हांला. आहे तरी काय तिथं एवढं ! "

" फार मोठी संपत्ति आहे तिथं."

" दरिद्री घरांत संपत्ति ! "

" हो. संपत्तिच ती. संपत्तिमान् श्रीमंतांनाहि पुष्कळदां हेवा वाटतो तिचा ! कुणींहि यावं, पाहावं, नि मनाचं समाधान करून घ्यावं तिथं."

" नीट सांगा ना काय तें ! "

" सांगूं ! रागावशील; नव्हे, वाईट वाटेल तुला. "

" सांगा कीं — कोणती ती संपत्ति ! काय आहे भानगड ! "

" त्या चालत्या-बोलत्या संपत्तीला संतति म्हणतात. मला तरी लहान मूल हीच खरी संपत्ति वाटते. आपल्या श्रीमंतीनं भरलेल्या ह्या घरांत कुठं आढळते आहे ती संपत्ति ! तासन् तास प्रभाकरकडे जाऊन बसावंसं मला वाटतं तें त्या संपत्तीकरिताच. रागावूं नकोस. पण मला फार-फार आवडतो त्यांचा मुलगा. किती गोंडस आहे पोरगं ! अन् हालचाल तरी किती मोहक ! वाटतं कीं सारखं बघत राहावं त्याच्याकडे नि मधून-मधून त्याचे मटामट मुके घ्यावेत. कारण ... "

" कारण काय ! "

" ... तो माझ्या शिशिरसारखाच शहाणा होईल ! शिशिर. ... "

श्रीची चटकन् शून्यांत दृष्टि स्थिरावून कांहींशा व्याकुळतेनें त्याच्या मुखांतून दोन-तीनदा शिशिरला हाक निघाली.

प्रभाकरच्या मुलाच्या स्तुतीनें जेवढी चतुरेच्या अंगाची लाही झाली नाहीं तेवढी शिशिरच्या नामनिर्देशानें झाली. त्याची अधिक आठवण होऊं नये याकरितांच कीं काय चतुरेनें श्रीला आपल्या कुशींत ओढलें.

पण असें केल्यानें श्री आपल्या ताब्यांत येतो हा तिचा नित्याचा अनुभव ह्या वेळीं अगदीं उलट आला !

श्रीच्या मनांतली शिशिरची मूर्ति तो चतुरेच्या हृदयाशीं असूनहि नाहींशी झाली नाहीं. त्याच्या डोळ्यांतून उष्ण-उष्ण पाण्याचे थेंब तिच्या हातावर पडल्यासारखे तिला वाटले.

तिला ह्यामुळें अधिकच धक्का बसला.

अंगाशीं बिलगलेल्या सौंदर्याच्या - आकर्षक अवयवांच्या - मोहाला बाजूस सारून स्वतःच्याच विचारांत श्री इतका वेळ असा आजपर्यंत कधींच राहूं शकला नव्हता : तें आज प्रथमच घडून आलें. आपल्या ठिकाणीं असलेल्या आकर्षणशक्तीला धिक्कारून टाकणारी कोणती प्रबल भावना श्रीच्या मनांत उत्पन्न झाली बरें ह्या विचारानें चतुरेला अस्वस्थ केलें.

रात्रीं तशीच ती तळमळत होती. श्रीच्या असमाधानाचें कारण शोधण्याचा सारखा यत्न चालला होता तिचा. इतक्यांत श्री जागा झाला. त्याच्या मनातली खिन्नता तशीच होती. चतुरा जागीच आहे ह्याची खात्री करून घेऊन तो व्याकूळतेनें तिला म्हणाला—

" मला कांहीं विचारायचं आहे तुला. नीट उत्तर दे. ... उगीच रागावूं नको. "

श्रीच्या मनांत चाललेली खळबळ आयतीच कांहीं स्पष्ट होईल असा विचार करून चतुरेनें ' विचारा काय तें ' असें म्हटलें.

श्री बोलूं लागला—

" आज प्रभाकरकडे गेलों असतांना बारीकशीच गोष्ट घडून आली. पण माझें मन त्यामुळं खिन्न झालं आहे. ... "

" काय झालं असं ! "

" प्रभाच्या मुलाला मी पुष्कळ घेतों. त्याच्याशीं खेळावं - बोलावं - हसावं म्हणूनच नेहमीं जातों तसाच आजहि गेलों नि खेळूं लागलों. खेळतां-खेळता त्यानं असा कांहीं शहाणपणाचा हावभाव केला कीं मला त्याचं अतिशय कौतुक करावंसं वाटलं. त्या भरांत त्याला जवळ घेऊन त्याच्या चिमुकल्या ओठाचा मुका घ्यायला मी लागणार तोंच. ... "

" तोंच काय ! "

" तोंच प्रभाची बायको उसळून म्हणाली— ' हां ! मुका-बिका नाहीं हो घ्यायचा त्याचा ! त्याच्याशीं बोला - हंसा - खेळा. इतर वाटेल तें चालूं द्या.'

त्या वेळीं माझी काय स्थिति झाली सांगणं कठिण आहे. नंतर मनांत सारखं आलं– " हाच जर माझा मुलगा असता तर ? त्याचं चुंबन घ्यायची इच्छा दाबून ठेवावी लागली असती का अशी ? चतुरा, तुला नाहीं कां असं वाटत ?"

ती कांहीं बोलली नाहीं, पण असहायतेची अस्पष्ट छटा मात्र पसरली तिच्या तोंडावर.

" आपलं मूल असावं, त्याच्याशीं बोबडे बोल बोलावे. त्याचं कौतुकानं वाटेल तितक्या वेळां चुंबन घ्यावं– असं किती मनांत येतं. पण तें आतां केव्हां शक्य होईल देव जाणे ! "

श्रीनें निराशेनें काढलेला स्वर चतुरेच्याहि हृदयाला जाणवला. तिनें डोळे मिटून घेतले.

"... म्हणून हजारदां माझ्या मनांत येतं कीं पुत्रसौख्याचं ताट भरलेलं असून मी भिकाऱ्याप्रमाणं दारोदार भीक मागत आहें उगीच ! "

" म्हणजे काय ? "

" शिशिर नाहीं का माझा मुलगा ? त्याला ..."

तो थांबला. स्तिमित झाल्याप्रमाणें चतुरा बघूं लागल्याचा तो परिणाम होता. कपाळावर आठ्यांचें जाळें पसरीत तिरस्कारलेल्या नेत्रांनीं तिनें म्हटलें–

" शिशिरला काय ? "

" त्याला जर इथं आणलं तर ?"

तिच्यांतला सुप्त मत्सर विक्राळ स्वरूप धारण करूं लागला.

" बेताल सुटलेल्या बायकोचा मुलगा घरांत आणण्याची कल्पना मनांत तरी कशी येते तुमच्या ? परवांचच सरलेचं पत्र विसरलां वाटतं तुम्ही ! "

ज्या पत्राचा चतुरेनें उल्लेख केला तें पत्र होतेंहि तसेंच विलक्षण मजकुरानें भरलेलें.

सरलेनें लिहिलें होतें–

"... प्रिय माणसाला बरंचसं अप्रिय लिहिण्याची कुणावर वेळ येऊं नये. माझ्यावर आज ती आली आहे खरी. तुझ्या सवतीची - दीनाची - वागणूक फारच बेताल होऊं लागली आहे. कुठच्याहि सभेला जा, तिथं मंगलबरोबर त्याच्या पत्नीसारखी दीना आपली

हुजर. कोडग्या बनलेल्या माणसाला शिक्षा काय करणार ? तुम्ही दहा रुपये पाठवायचे बंद झाल्यानं परिणाम होईलसा वाटलं होतं. पण नाहीं ! कळव्याच्या पुलावर पुष्कळ ख्रिश्चन मुली प्रियकरांच्या हातांत हात अडकवून चालत असतात, पण मंगलच्या अगदीं अंगाला अंग घाशीत चालून दीनेनं त्याना खालीं बघायला लावलं नाहीं असा दिवस जात नाहीं.

हो, सांगायचं राहिलंच. परवा तर ती दुकल बोटिंगला खाडीवर गेली होती. भरतीची वेळ असल्यानं होडी डुलत असतांना पुलावरून खालीं बघणाऱ्याना ज्या गमती बघायला मिळाल्या त्या सांगाव्या तेवढ्या थोड्याच !

तिचं चांगलं होत आहे. वाईट एवढ्याचकरतां वाटतं कीं सारीं-जणं तुझ्या यजमानांच्या नांवानं तिला अमक्याची बायको म्हणून ओळखतात. त्यामुळं तुमच्या दोघांच्या नावाला काळिमा लागतो.''

पत्र वाचल्यापासूनच चतुरेच्या मनात तडफड सुरू झाली होती. ीच्या कानांवर दीनेची निंदा सारखी पडत राहिली कीं तो दीनेला पूर्ण वेसरून जाईल अशी तिची कल्पना. पत्रातल्या मजकुराचा उपयोग ह्या तूनें तिनें पुष्कळ करून घेतला.

श्री तिचें सारें म्हणणें ऐकून घेई. वर-वर दीनेला दोषी ठरवीहि. पण एकटाच विचार करीत बसला कीं त्याचें मन त्याला टोंचूं लागे. दीनेवर ाणून-बुजून अन्याय झाला आहे आपल्याकडून. पैसे पाठवायचे बंद रून तर जखमेवर मीठच चोळलं आपण असें त्याला वाटे. तिच्या न्माची केलेली नासाडी पुन्हा कधींहि भरून काढणें शक्य नाहीं, शा स्थितीत तिनें भाग्यानें जर काहीं गोष्टी केल्या तर आपण कां दोष ावा ? आपल्या नुसत्या नांवाच्या उच्चारानें तिच्या मनांतल्या साऱ्या ाकांक्षा तृप्त व्हायच्या कशा ही गोष्ट श्रीला मनातून पटे.

पूर्वी असे विचार मनांत यायला चतुरा श्रीला वेळच देत नसे. ठरावेक अभिनयानें त्याच्या सौंदर्यपिपासु वृत्तीवर आघात करून ती श्रीला वेव्हल करी. पण आतां काळ बदलला होता. चतुरेच्या उत्तान शृंगाराला ां अतीव वासनाशक्तीला तो कंटाळल्यामुळें तिच्याविषयींचें आकर्षण कमी

व्हायला लागलें. कोणत्याच नाटकी अभिनयाचा त्याच्यावर परिणाम होई-नासा झाला. त्यांतच चतुरेला मूल होण्याची आशा जसजशी दुरावत चालली तसतशा दीना व शिशिर यांच्या आठवणी त्याच्या मनांत वारंवार उसळूं लागल्या. शिशिर आपला आहे, त्याचें चुंबन वाटेल तेव्हां आपण घेऊं शकूं ह्या विचारानें त्याचा पितृभाव जागृत होई.

म्हणूनच त्यानें विचारलेल्या ' त्याला इथं आणलं तर ' ह्या प्रश्नावर चतुरेनें जे वाईट उद्गार काढले त्यांना उद्देशून श्री उत्तरला–

" पत्र विसरलों नाहीं. तरी पण दीनेबद्दल सरलेनं कांहींहि लिहिलं असलं तरी शिशिरवर मीं कां राग धरावा ! "

" असल्या आईचा मुलगा, तो..."

" कां बरं ! माझाहि तो मुलगा आहे."

चतुरा निरुत्तर झाली. श्रीनें पुढें सुरुवात केली–

" तूं कांहीं म्हण. रागाव वाटलं तर माझ्यावर. शिशिरबद्दल मी असंच म्हणणार. तो निरपराधी आहे. इथं आणला तर काय बिघडेल ! एकटं-एकटं दिवस घालवणं जड वाटूं लागल्यावर हाच उपाय नाहीं का त्याला ! दुसऱ्यांच्या मुलांशीं केलेला प्रेमळपणा आपलेपणाशिवाय फुकट वाटतो. मनाचं खरं समाधान होत नाहीं त्यानं."

चतुरेच्या पांघरुणाच्या चाळवाचाळवीनें जागी झालेली मनी दिसतांच त्यानें म्हटलें–

" तुला मांजरीचा लळा आहे. मला शिशिरचा लळा लागला तर काय वाईट ? ह्या माजरीपेक्षां तो खचित कमी लबाड ठरेल ! "

श्रीचें हें मर्मभेदी बोलणें तिनें जाणून-बुजूनच ऐकलें न ऐकलेंसें केलें. तरीपण तें तिला लागल्यावांचून राहिलें नाहीं. त्याची स्पष्ट छाया पसरली तिच्या तोंडावर.

शिशिर घरांत येणें धोक्याचें आहे, कारण शिशिरला बघतांना श्रीला दीनेची आठवण होऊं लागेल, ह्या भीतीनें तिला शिशिर येणें पसंत नव्हतें. शांतपणानें कितीतरी वेळ विचार केला तिनें. श्रीला मूल असावेंसें वाटतें. ती इच्छा अतृप्त राहण्याचें स्पष्ट दिसत असल्यानें त्याला किती त्रास होत असेल ह्याची जाणीवहि तिला होऊं लागली होती.

तिनें निरुपायानें उत्तर दिलें—

" तुम्हांला शिशिरवांचून राहवतच नसेल तर आणा त्याला. मीं तरी कशाला उगीच आड येऊं ? "

तोंडाला कांहींतरी कडू लागतांना व्हावें तसें हे उद्गार काढतांना विचित्र तोंड केलें तिनें.

चतुरेला हें समजून चुकलें कीं केवळ सौंदर्यानें पुरुषांना स्त्रिया जरा कांहीं काल आपल्या ताब्यांत ठेवूं शकत असल्या तरी त्यांचेंहि समाधान तेवढ्यानें होत नाहीं. पत्नीच्या सौंदर्याचा विकास आपल्यांत उतरावा अशी अनिवार इच्छा उत्पन्न होते त्यांच्यांत. तसें झालें नाहीं तर पत्नीच्या सौंदर्यावरची आसक्ति कमी होऊं लागते. चतुरेला हाच अनुभव आला होता, नि ज्या आपल्या सौंदर्याचा तिला इतके दिवस मोठा अभिमान वाटायचा तेंच तिला आतां कवडीमोल वाटूं लागलें.

तिचा मांजरीचा लळा अधिक वाढून तिचें मन तिच्या ठिकाणीं अधिक गुंतूं लागलें.

नातवंडानीं घर गजबजून गेलेलें पाहण्यासाठीं आशा धरून बसलेल्या तिच्या सासूच्या वागण्यात देखील आतांशा होत असलेला बदल तिला जाचक होऊं लागला होता. लग्नानंतर चतुरेला स्तुतीनें वेळीं-अवेळीं ओंवाळणाऱ्या सासूबाई अलिकडे तिजविषयीं पुष्कळच कमी बोलूं लागल्या होत्या. बोलल्याच तर तेंहि कामापुरतें. कुणी बसायला आलें तर कुठच्याहि गोष्टीचा ओघ वळणें घेत-घेत चतुरेच्या पुत्रप्राप्तीच्या अभावावर यायचा नि विचित्र सुस्कारे टाकीत त्या म्हणायच्या—

" मी तर नातवंडांसाठीं आसावलेली नि सूनबाईचा तर कांहींच विचार दिसत नाहीं. ... काय आहे देवाच्या मनांत कोण जाणे ! "

त्यावर जर कुणीं म्हटलें—' अहो होईल, अजून वय का गेलंय ! शेजारच्या त्या बाईला नाहीं का लग्नानंतर आठ वर्षांनीं मूल झालं ? ' तर त्या उत्तर देत—

" मग पुष्कळ झालं तरी मला काय उपयोगी ? आतां तितकीं वर्षं का जगणार आहें मी ? त्या अवदसेला आजारीपणानं नव्हतं मूल होत म्हणून त्या लग्नाच्या भानगडींत पडलें, पण हिची ही तऱ्हा ! "

पण त्या नुसत्या असें बोलूनच स्वस्थ बसल्या नव्हत्या. चतुरेला पुत्र-प्राप्ति व्हावी म्हणून अनेक उपाययोजना सुरू केल्या त्यांनीं. नवस-उपास-औषधें – साऱ्या गोष्टी सुरू झाल्या. पण !...

चतुरेच्या मनावर या सर्व गोष्टींचा परिणाम होत राहिला. मूल नसल्या-मुळें अधिक खिन्न होऊं लागली ती. अन् देवाला नवस करूनहि तो पावण्याचीं लक्षणें दिसेनात तसतशी तिची मनी तिला मुलाप्रमाणेंच वाटूं लागली.

शिशिरला आणण्याबद्दल चतुरेनें हो म्हणतांच श्रीला आनंद झाला.

आईनेंहि नाहीं म्हटलें नाहीं. त्यांना देखील मूल घरांत हवेंच होतें. आजपर्यंत दीनेमुळें जो मुलगा वाईट ठरला होता तो एकाएकीं त्यांना गुणी वाटूं लागला. त्या म्हणाल्या–

"नाहीं तरी तशा गुणी मुलाला तिच्याजवळ नाहींच ठेवून उपयोगी. आईचे चाळे डोळ्यांसमोर तरी नको घडायला त्याच्या."

आणि तेव्हांपासून श्रीचें मन एकसारखें शिशिरच्या नांवाशीं चाळा करूं लागलें.

एकदां श्रीकांत रात्रीं जागा झाला. शिशिरच्या आठवणीनें भोंवतालच्या काळोखांतहि त्याला समाधान दिसूं लागलें. 'केवढा बरं दिसूं लागला असेल शिशिर ? त्याच्या बुद्धीची पहिली चमक तशीच वाढली असेल का ? दीनेला त्रास देत असेल तो ? कीं समजुतदारपणानें तिला आनंदवीत असेल ?' अशा एकेक कुतूहलानें शिशिरकडे अधिकाधिकच तो ओढला जात होता.

त्याला मागचा एक प्रसंग आठवला.

– दीनेला खूप बोललों होतों आपण. आईला उलटून बोलल्याबद्दल चांगलीच हजेरी घेतली तिची. तिला तें सहन न होऊन आपल्यालाहि तिनं उलट उत्तर दिलं. आपण तिला न जेवण्याची शिक्षा दिली. त्या-प्रमाणें दिवसभर उपाशी होती ती. संतापाच्या धुंदींत असल्यावर तिची कोण चौकशी करणार ? दुपारीं जेवणाच्या वेळीं शिशिरला नेहमींप्रमाणें बोलावलं. तो कांहीं येईना. पुष्कळ प्रकारांनीं समजावलं तरी तो म्हणूं लागला– 'आईजवळ बसून जेवायचंय् मला.'

आईचा श्रीखंडाचा नैवेद्य चालू असल्यानं आमच्या दोघांच्या पानांत श्रीखंडानं भरलेल्या वाट्या होत्या. शिशिरला त्याच्या आईकडे जाण्यास परवानगी दिली नि आपण जेवून घेतलं. आपला विडा खाऊन झाला तरी अजून शिशिर दीनेच्या खोलींतून कां परत येत नाहीं म्हणून तिच्या खोलींत डोकावलं तों काय दिसलं ?—

शिशिर दीनेच्या मांडीवर लोळपटून पडला होता. दीना मागं टेंकून कुठं तरी सजल दृष्टीनं बघत होती. दोघांच्या पुढं शिशिरसाठीं नेलेलं ताट तसंच भरलेलं पडलं होतं नि श्रीखंडाच्या वाटीवर एक मोठी गोमाशी ताव मारीत होती !

नंतर कळलं कीं दीनेला जेवायचं नाहीं असं आपणच सांगितलं असल्यानं त्यानंहि अन्न घेतलं नाहीं.

एवढ्या लहान वयांत केवढं शहाणपण हें !

आपल्याला मात्र तें आज उमजून येत आहे !!

आणखी एका वेळीं—

—थंडीचे दिवस होते. भर रात्रीं दीना पांघरूण मागूं लागली. दीनेसाठीं उठणं आपल्याला मुळींच बरं वाटलं नाहीं. थंडी तापाची असल्यानं तिला सहन होईना ती. झोंप आलेली नसूनहि दीनेबद्दल गढूळ मन झालं असल्यानं तसेच डोळे किलकिले करून पडून राहिलों आपण. आईला पांघरूण हवांय असं समजताच जागा झालेला शिशिर मला उठवूं लागला. वेड्याला काय माहित कीं न निजलेल्या माणसाला जागं कुणी करूं शकत नाहीं ! शेवटीं काठी घेऊन दांडीवरचं पांघरूण ओढण्याचा नि खुंटीवरची दुलई पाडण्याचा त्यानं शक्य तेवढा यत्न केला. पण व्यर्थ. शेवटीं आपल्या अंगावर घेतलेलं छोटंसं पांघरूण त्यानं दीनेच्या अंगावर घातलं व आपणहि निजला तिच्या अंगावर ! ... आणि डोळे किलकिले करून केवळ गंमत बघत आपण पडलों होतों !

एकदां तर—

—दीनेला ताप भरला होता. आपल्याला यायला उशीर झाला. घरीं येतांच आईनीं दीनेबद्दल अनेक गोष्टी बोलून मन क्षुब्ध करून सोडलं. तिच्या खोलीशीं जाऊन मोठ्या रागानं आंत दृष्टि टाकली. दीना [illegible]

धरून पांघरूण घेऊन पडली होती. शिशिर आपला चिमुकला हात तिच्या अंगावर ठेवून जवळ बसला होता. त्याला विचारतांच तो म्हणाला– ' आईला किनई भीति वाटत्ये ना – म्हणून हात ठेवून बसलोंय मी ! '

पतीपेक्षां शिशिर दीनेला जवळचा वाटावा: त्याच्यामुळं तिची भीति कमी व्हावी : एवढे सद्गुण तरी त्याच्याजवळ कोणकोणते आहेत !

शिशिरबद्दलच काय पण त्याच्यामुळं दीनेबद्दलहि विचार मनांत येउं लागले व दीना देखील त्याला चांगली वाटूं लागली. वास्तविक चतुरेनं दीनेचें जें चित्र त्याच्यासमोर सतत धरलें होतें तें तिट्कारा आणणा होतें. नीति-अनीतीची मुळींच पर्वा न करतां वाटेल त्याचा हात धरून जाणारी स्त्री असें तिचें त्यांत स्वरूप होतें. दीनेबद्दल श्री त्या चित्रामुळेंच संतप्त होत असे. पण त्याच वेळीं आंतल्या आंत असाहि विचार हळूच डोकें वर काढी– ' दीनेच्या आजच्या वागणुकीस आपण कारण आहोंत. ' ह्यामुळं दीनेबद्दल त्याची सहानुभूति वाढूं लागली. अर्थात् सहानुभूतीच्या ओलाव्याचें प्रेमाच्या झऱ्यांत रूपांतर होणें तितकें सोपें नव्हतें. पण तेंहि शिशिरच्यामुळें शक्य होणारसें दिसूं लागलें.

हळू-हळू त्याच्या मनानें दीना व चतुरा यांच्यांतील साम्य-विरोधांची तुलना करून बघितली. कुठें तरी दूर असणारी दीना त्याला आपल्या जवळ असल्यासारखें आणि जवळ निजलेली चतुरा लांब जात असल्यासारखें भासलें. आणि त्याच्या मनांत विचार चमकून गेला– ' पण खरोख दीनेला आपली आठवण तरी होत असेल का ! '

दीनेला श्रीची आठवण – !

वीज चमकून जावी नि एकदम अधिकच अंधार पसरावा तसें झालं त्याच्या मनांत. – ' दीना दूर गेली. तिला कशी आठवण होणार ! .. आपण मात्र होतों तिथंच आहों ! '

अर्धवट झोंपेंतच तो दूर-दूर पाहण्याचा यत्न करूं लागला.

–समोर समुद्राचं विस्तीर्ण वाळवंट पसरलं आहे. आत्महत्येच्या निश्चयानं दीनेसारखी स्त्री वेगानं पुढं चालली आहे. ... आपण चतुरेच्या सौन्दर्यानं इतके बेभान झालों आहोंत कीं दीनेकडे धांवणं आपल्याला कमीपणाचं वाटलं.

इतक्यांत मंगल येऊन त्यांनीं दीनेला आडवलं. ... दीना मंगलाचा हात धरून पुढं जाऊं लागली ...

जातां-जातां दोघंहि क्षितिजापर्यंत गेलीं ...

अन् दोघंहि एवढीं थोर दिसायला लागलीं कीं आपल्या मोठ्या केलेल्या डोळ्यांत देखील तीं सामावणार नाहींत.

त्याच्याबद्दल आदर वाटून आपण दीनेला हांक मारली.

पण—

तिनं मागं बघितलं नाहीं. क्षितिजापलीकडील जग तिला दिसल्यामुळं ती तशीच वेगानं पुढं निघूनहि गेली!

जागेपणीं विचार करतानाहि त्याला हेंच वाटत होतें कीं दीनेला आपण कितीहि बोलावलं तरी ती परत येणार नाहीं. ती नाहीं तर नाहीं, निदान शिशिरला तरी आणावं.

तसा प्रयत्न त्यानें लवकरच केलाहि असता. पण तसें घडून यायचें नव्हतें हेंच खरें.

कारण दुसऱ्याच दिवशीं श्रीच्या छातींत एकाएकीं कळा येऊं लागल्या, हात-पाय बधिर झाल्यासारखे वाटले, नि रक्तासारख्या वात्याहि झाल्या.

ताप चार दिवसांनींहि निघाला नाहीं.

आठव्या दिवशीं अर्धवट घाम आला.

नंतर पंधरा दिवसांनीं तापाचें जरी कांहीं चिन्ह उरलं नाहीं तरी कांहीं विचित्र रक्तदोषानें त्याला झपाटलें. एरवींची त्याची कांति कमी-कमी होत चालली. दरदिवशीं रक्ताच्या रंगात सूक्ष्म-सूक्ष्म बदल होत असल्याचें स्पष्ट दिसूं लागलें.

जळगांवांतल्या प्रसिद्ध डॉक्टरांना दाखवतां प्रत्येकानें निराळें निदान केल्याचें आढळून आलें.

आरंभीं क्षुद्र वाटणाऱ्या दुखण्यापायीं श्रीला पुष्कळ खर्च आला. आणि कांहीं दिवसांनीं तो हिंडूं-फिरूं लागला तरी आपल्यांत अद्यापहि कांहीं-तरी रक्तदोष आहे असें त्यांचें त्यालाच सारखें वाटत होतें.

आजारामुळें श्रीच्या मनःप्रवृत्तींत मात्र अनेक संक्रमणें घडून आलीं. त्याचप्रमाणें चतुरेच्या मनोवृत्तीवरहि झगझगीत प्रकाश पडला.

अत्यवस्थ असतांना श्रीला दीनेला कांहीं पत्र लिहिण्याची इच्छा झाली. म्हणून चतुरेला दौत-टांक आणायला सांगून त्यानें पुढील मजकूर तिला ल्हायला सांगायला प्रारंभ केला—

" प्रिय दीना !—"

चतुरेनें कांहींच न लिहितां त्याच्याकडे बघितलें. त्यानें शांतपणानें क्षीण आवाजात उत्तर दिलें—

" मला अडवूं नकोस. मी सांगतों तसं लिही."

तो पुढें सांगूं लागला—

" मागील सर्व गोष्टींबद्दल मला क्षमा कर. तुझ्याविषयीं वाटेल त्या गोष्टी कानावर येत असूनहि मी तुला दोष देत नाहीं. त्याहूनहि जरी तुझा अधःपात झाला असता तरी मीं कांहीं म्हटलं नसतं. माझाच अपराध होता त्याच्या मूळाशीं. तूं परत ये असं मी म्हणत नाहीं. कारण तूं आतां माझी राहिलेली नाहींस. जगाची झालेली आहेस. शेवटची इच्छा एवढीच कीं सारे अपराध पत्नीच्या प्रेमानं विसर नि पुढं-पुढं जा. "

श्रीनें सांगितलेलें पत्र चतुरेनें जितक्या शांतपणानें लिहिलें तेवढ्याच कठोरतेनें तें फाडूनहि टाकलें ! शिशिरला घरात आणलेला कदाचित् तिनें सहन केला असता, पण दीनेला पत्र लिहिणें आणि तेंहि क्षमा मागण्यासाठीं वाडलेलें कसें सहन व्हायचें !

आजारांत श्री अत्यंत अशक्त झाला. सर्वच क्रिया करण्यास तो परावलंबी झाला. पण चतुरेनें स्वतःच्या हातानें एकदांहि कोणती गोष्ट पार पाडल्याचें श्रीला दिसलें नाहीं. पैसे देण्यासारखी स्थिति असतांना उगीच असलीं कामें आपण स्वतः का करावीं ! हीच तिची वृत्ति त्याच्या ठळकपणें निदर्शनास आली.

श्रीला आजारानंतर या सर्व गोष्टींनीं अधिकच अंतर्मुख बनवलें.

हळू-हळू त्याला असेंहि वाटूं लागलें कीं जी दहा रुपयांची मनिऑर्डर आपण दीनेला पाठविण्याची बंद केली ती तरी पुन्हां पाठवायला लागावें.

दीनेच्या मनांत आपल्याबद्दलची सहानुभूति पुन्हां रुजवायचा हा एक उपाय होता.

तथा प्रामाणिक इच्छेनें त्यानें मनिऑर्डरचा फार्म घेतला.

सर्व मजकूर भरून झाल्यावर त्यानें 'खाजगी' म्हणून तळाशीं लिहिलें—

"पैसे कुणाकडून आले तें मनांत न आणता त्यांचा स्वीकार कर आणि झालेल्या अपराधांची अल्पशी भरपाई करण्याचा अल्पसा तरी प्रयत्न केल्याचं श्रेय मला दे म्हणजे झालं."

इतक्यांत मागें येऊन उभ्या राहिलेल्या चतुरेनें तें सर्व वाचलें.

एकूण प्रकार ध्यानांत येतांच तिनें फॉर्म हिसकून घेतला नि त्याचे तुकडे-तुकडे केले!

त्या तुकड्यांकडे पाहतांच श्रीला वाटलें आपल्या हृदयाचेच तिनें तुकडे केले आहेत नि तेच समोर पडलेले आहेत!

तोंच त्याच्या कानांवर प्रहार झाला—

"पैसे उधळायचेच असले तर नाटकं पाहा, सिनेमा बघा, वाटलं तर तमाशाला पण जा, पण असे नका ते उधळूं!"



# ७

कुणी तरी आल्याची चाहूल लागतांच शिशिरला दीना म्हणाली—
" जा बघूं—मंगल आले का पाहा. "

तोहि चटकन् उठून निघून गेला.

हातानें चाललेले काम थांबवून दीना उत्सुकतेनें दरवाजाकडे बघूं लागली.

खिडकीतून आलेल्या वाऱ्याच्या झोतामुळें तिचा पदर किंचित् सरकला. डोक्याला चिकटून बसलेले कांहीं केस विस्कारले गेले. जवळच्या टेबलावरचे सुटे कागद इतस्ततः पसरले. भिंतीवरच्या कॅलेंडरचीं पानें फडफडलीं. तरी तिचें लक्ष्य मुळीं देखील ढळलें नाहीं. ' मंगल येतील, आपण आजच्या समारंभाला साजेसं स्वरूप आश्रमाला आणल्याबद्दल शाबासकी देतील, नि आपल्याला मूठभर मास चढल्याप्रमाणं होईल. ...' स्थिर दृष्टीनें दरवाजाकडे बघत असताना तिच्या दृष्टीपुढें अनेक कल्पना नाचूं लागल्या.

—आश्रमात शिरताना मंगल चहूंकडे लावलेल्या रंगीत पताकांच्या माळा पाहून विचार करीत आहेत. जिकडे-तिकडे स्वच्छता पाहून त्यांच्या आकर्षक दृष्टींत समाधान तरळत आहे. केव्हां एकदा दीनेला भेटून तिचं कौतुक करीन असं त्याना होऊन गेलं आहे. हातांतली महत्त्वाच्या कागदपत्रांची बॅग खोलींत नेऊन ठेवण्याचं अगर पायांतले बूट काढून आंत येण्याचंहि त्यांना भान राहिलेलं नाहीं. आणि खोलींत येतात तों आपण त्यांची वाट बघत असल्याचं पाहून त्याचं हृदय प्रेमानं उचंबळून. ...

इतक्यांत शिशिर आंत घाईनें आला.

त्याची मुद्रा दीनेला एवढी चमत्कारिक दिसली कीं दीनेनें घाबरून विचारलें—" काय ? नाहीं का रे आले ? "

" छे !, पण दुसराच कुणी माणूस आलाय त्यांचा निरोप घेऊन. "

दिवाळींत रोषणाईसाठीं म्हणून विजेच्या दिव्यांच्या माळा लावाव्या नि आकस्मिक कारणानें विजेचा प्रवाहच बंद व्हावा त्याप्रमाणें तिचें झालें.

मंगलांना यायला उशीर होणारच होता. तरीहि त्यांची तीसुद्धां यायची वेळ टळून गेली होती. अन् आज त्यांनीं तर यायलाच हवें होतें.

कारण आश्रमाचा दशवार्षिक वाढ-दिवस आज समारंभपूर्वक साजरा व्हायचा होता.

दहा वर्षांत एकदांहि असा समारंभ झाला नव्हता. दीनेलाच यंदा काय वाटलें कोण जाणे, तिनेंच आग्रह धरला. तिनेंच मेहनत घेतली समारंभाच्या तयारीसाठीं. नि संध्याकाळच्या सभेचीहि व्यवस्था तिनेंच केली.

ह्यामुळेंच ती आज आनंदांत होती. स्वत: लावलेल्या झाडाप्रमाणेंच आपल्या प्रिय माणसांनीं लावलेलीं झाडें फळा-फुलांनीं भरलेलीं पाहून समाधान होत असतें.

आश्रमाचा आजचा विस्तार दीनेला कितीतरी कौतुकास्पद वाटे. आश्रमांत चरके नव्हते : चात्या नव्हत्या : गीतेचीं पारायणें अगर प्रार्थनेच्या नांवाखालीं बेढब जलसेहि होत नव्हते. साधी राहणी कळत असली नि तेथें ठेवलीहि जात असली, तरी बावळटपणालाच साधेपणा त्यांतलीं माणसें समजत नव्हतीं. स्वच्छ पोशाख सर्वांना प्रिय होता, पण हात-सुताच्या कपड्यांतच काय ती स्वच्छता असते असें तेथें कुणी मानीत नव्हतें. देशकार्याचे दशदिशा दणाणून सोडणारे नगारे तेथें पिटले जात नव्हते ! ' देशाला आग लागली, बंधूंनो ! बघतां काय — सूत काढा ! ' असल्या आरोळ्यांनीं तेथलें वातावरण निनादित होत नव्हतें.

साधी पण महत्त्वाची अशी एकच गोष्ट आश्रमांत होती.

ती म्हणजे माणुसकी.

अन्यायावर प्रहार करणाऱ्यांचा तो एक बालेकिल्ला होता.

प्रचलित विवाहपद्धतीमुळें दीनेवर जो अन्याय झाला होता त्याची जाणीव सतत जागृत असल्यानें दुसऱ्या कुणावर कसलाहि अन्याय झाला तरी त्याला त्या अन्यायाविरुद्ध लढण्यास प्रवृत्त करायला तिला उत्साह वाटे. तो उत्साह तिला नवजीवन देऊन मंगलांच्या त्या आश्रमानें तिच्या ठायीं मूळ निर्माण केला होता, आणि त्याचें संगोपन व संवर्धनहि तो करीत होता. म्हणूनच संस्थेचा वाढदिवस साजरा करायचें दीनेनें आपलेपणानें ठरवलें होतें.

मंगलांना प्रथम ती कल्पना सुचली नव्हती. कारण असल्या समारंभाला जाहिरातीचें स्वरूप येतें त्याचीच मंगलांना मोठी चीड होती.

दुसऱ्या कोणाकडून ही सूचना आली असती तर त्यांनीं ती खचित झिडकारली असती. पण दीनेनें आर्जवी स्वरानें वाढदिवसाबद्दल विचार-तांच त्यांचा सारा विरोध मावळला.

आज सायंकाळीं निवडक मंडळींची सभा होऊन त्यांत दहा वर्षांत आश्रमानें केलेल्या कार्याचा आढावा वाचला जाणार होता. सभेची तयारी दीनेनें केली. पताका लावण्याचें काम शिशिरनें संपवीत आणलें होतें. दुपारचे दोन वाजले तरी मंगलांचा पत्ता नाहीं; आपल्या परिश्रमांवर विरजण तर नाहीं ना पडणार अशी भीति वाटूं लागली तिला. मंगलांच्या कार्याचा व्याप इतका वाढला होता कीं वेळच्या वेळीं कामें उरकणें त्यांना जड जाऊं लागलें होतें. दीना बहुतेक वेळीं त्यांच्याबरोबर जाई. कुठें किती थांबावयाचें वगैरेवर तिलाच नियंत्रण ठेवावें लागे. तिच्या असल्या वागण्यानें मंगल चष्टेनें म्हणत– ' दीना, तूं एखाद्या भयंकर घड्याळासारखी आहेस ! ' ती कशी म्हणून दीनेनें विचारतांच ते उत्तर देत– ' खिशांतलं घड्याळ किती तरी निरुपद्रवी. बिचाऱ्याची टिक्-टिक् ऐकूंहि येत नाहीं, नि काटे तर कांचेच्या बाहेरहि पडूं शकत नाहींत. पण तूं ! सारखी माझ्यासमोर पाहरा करणार ! लवकर आटपण्याबद्दलची तुझी कटकट सारखी कानांवर आदळत असणार ! नि तुझे हात तर केव्हा मला ओढीत नेतील तें सांगवत नाहीं ! ! ' आजहि जरी दीना मंगलांबरोबर वज्रेश्वरीला गेलेली असती तरी तिनें त्यांना वेळच्या वेळीं परत आणलें असतें.

मंगलांचा स्वभाव तिला माहित होता. एका कामाला गेल्यावर तेवढेंच करून ते परत येतील असें नाहीं. दुसरें एखादें काम तेवढ्यांत निघालें कीं लागलींच तें सुरू व्हायचें—मग आश्रमाचें कांहीं का होईना.

पण खरोखर तशी संवय मंगलांना लागायला दीनाच कारण झाली होती. दीना आश्रमांत असल्यावर तेथील सर्व जबाबदारी ती आपल्या-प्रमाणेंच उत्तम पार पाडूं शकते ह्याबद्दल मंगलांची खात्री झालेली असल्या-मुळें साहजिकच मागच्या व्यवस्थेविषयीं ते निर्धास्त असत व म्हणूनच वेळेवर परत येण्याविषयीं ते तितकेसे दक्ष राहीनासे झाले.

दुसऱ्या एखाद्या वेळीं मंगल परत आले नसते तर दीनेला इतका विषाद वाटला नसता; पण आज एवढी केलेली समारंभाची तयारी फुकट जायची वेळ येणार होती मंगलांच्या न येण्यानें.

आणि म्हणूनच शिशिरच्या सांगण्यानें ती खिन्न झाली. बाहेर निरोप घेऊन कोण आलें आहे तें पाहण्यास जड पावलांनींच ती गेली.

दाराशीं कातोडयाला पाहतांच तिनें विचारलें—

"काय निरोप आहे ?"

मंगलांनीं चिठ्ठी दिली असल्याचें त्यानें आपल्या रांगडया भाषेंत सांगून चिठ्ठी पुढें केली.

दीनानें चिठ्ठी लागलींच उघडून वाचण्यास आरंभ केला.

"प्रिय दीना—

चिठी हातांत पडेल त्या वेळीं तूं किती आनंदांत असशील ह्याची मला कल्पना आहे. पण निरुपाय आहे माझा. त्या आनंदावर निराशेचं विरजण घालावं लागणार आहे मला. कांहीं महत्त्वाच्या कामानिमित्त मला इथंच राहणं भाग झालं आहे. निदान चार दिवस तरी येतां येणार नाहीं.

दीना, मनुष्यानं आपलं जीवन हें कांहीं तरी देण्यासाठीं आहे असं मानलं पाहिजे. खरं ना ? आश्रमाचा जन्महि त्याच हेतूनं झाला. मग शेंकडों लोकांच्या सुखापेक्षां आश्रमाच्या वाढदिवसाचं महत्त्व अधिक मानणं योग्य होईल का ? तसं तूं देखील म्हणणार नाहींस. म्हणून मी येऊं शकत नसल्याबद्दल मला दुःख वाटत नाहीं. तूंहि तें मानूं नये.

समारंभ उरकून घ्यायला माझी हरकत नाहीं. आईच्या गैरहजेरींत दाईचं महत्त्व आईप्रमाणंच वाटतं मुलाला. समारंभ तूं केलास तरी आश्रमांतल्या मंडळींना आनंदच होईल.

तुझा
मंगल."

'प्रिय दीना' हे आरंभींचे शब्द वाचून दीनेला जेवढा आनंद झाला तेवढेंच मंगल परत येत नसल्याचें वाचून दुःख झालें. उगीच एवढी

मेहनत घेतली असें तिला झालें. आश्रमाच्या केलेल्या शृंगाराचें मंगलां-कडून कौतुक व्हावें अशी तिची इच्छा होती. लोकांनीं कितीहि स्तुति करून जेवढें समाधान तिला वाटलें नसतें, तेवढें मंगलांनीं काढलेल्या कौतुकाच्या एखाद्या शब्दानेंहि तिला झालें असतें. पण मंगल तर आतां येणार नव्हते !

इतक्यांत भिंतीवरच्या ठळक अक्षरांत छापलेल्या पाटीकडे तिचें लक्ष गेलें—

"आयुष्य हें कांहीं तरी देण्यासाठीं आहे."
"स्वतःपलीकडील जगाकडे पाहा !"

आणि ती शुद्धीवर आली. स्वतःच्या कार्याच्या गौरवाच्या समारंभा-साठींहि लोकसेवेचें महत्त्व अधिक मानून परत न येणाऱ्या मंगलांबद्दलचा दीनेचा राग कुठच्या कुठें नाहींसा झाला नि आदरानें तिचें मन भरून गेलें.

आणि मंगल नसल्याकारणानें समारंभांत मुळींच वैगुण्य राहूं देतां कामा नये, त्याची सर्व जबाबदारी आपल्यावर आहे, या जाणीवेनें ती कामाला लागली.

अर्थात् देव नसलेल्या देवळासारखी सभेच्या वेळीं अवस्था झालीच.

दीनेनें सर्व गोष्टी धैर्यानें पार पाडल्या. लोकांना मंगलांची गैरहजेरी भासणार नाहीं ह्यासाठीं प्रयत्नांची तिनें पराकाष्ठा केली.

ठाण्यांतल्या प्रतिष्ठित गृहस्थांच्या अध्यक्षतेखालीं समारंभास सुरुवात झाली. प्रारंभींच्या किरकोळ गोष्टी आटोपल्यावर पुष्कळांनीं मंगलांबद्दल गुणवर्णनपर भाषणें केलीं. आश्रमांतल्याच कांहीं मुलींनीं मंगलांबद्दल आदर व्यक्त केला व कांहीं खेडवळ शेतकऱ्यांनीं मंगलांना पुष्कळ आयुष्य लाभावें नि आश्रम चालू राहावा म्हणून देवाची आपल्या भाषेंत प्रार्थना केली.

दीनेनें सर्वांचे आभार मानले. आश्रम अनंत कालपर्यंत चालू राहावा म्हणून सर्वांनीं त्याच्यावर कृपादृष्टि ठेवावी अशी विनंति केली. ती म्हणाली—

"जोंपर्यंत अन्याय शब्द ऐकूं येत राहील, तोंपर्यंत आश्रमाची जरूरीच आहे. मग आम्ही त्यांत असूं अगर नसूं. कारण आश्रम म्हणजे हें घर नव्हे, भोंवतालची जागा नव्हे अगर आंतली माणसं नव्हेत. अन्यायावर ठिकठिकाणीं प्रहार करणाऱ्या प्रवृत्तीचं आश्रम हें एक प्रतीक आहे ... मग त्या संस्थेला आश्रम म्हणा अगर दुसरं कांहीं म्हणा. देशाला आग लागली असतांना राजकारणांत न जातां क्षुद्र गोष्टींसाठीं आम्ही शक्ति खर्च करीत आहों अशी खुशाल टीका करावी. तें काम इतर मंडळी करीत आहेत. आम्ही त्यांना यश यावं असं चिंतींत राहूं. आमची दिशा ठरलेली आहे. उद्यां जरी राजकीय स्वातंत्र्य मिळालं तरी आमचं समाधान होणार नाहीं. जों-पर्यंत प्रत्येक व्यक्तीला माणुसकीचा समान हक्क मिळालेला नाहीं तोंपर्यंत समाजांत अन्याय आहे अशी आमची कल्पना असल्यानं आश्रमाला तसल्या अन्यायांवर प्रहार करीत राहावंच लागेल. प्रत्येक व्यक्ति मनुष्य म्हणून जगात आली. मनुष्य म्हणून जगता आलं पाहिजे तिला. पशूंसारखं जगावं लागलेलं सहन होणार नाहीं आम्हांला."

भाषण करताना दीनेच्या अंगात जणूं मंगलांनींच संचार केला होता. बोलतां-बोलता तिच्या गौरवर्ण मुखावर आरक्तता पसरली. तिच्या नाकाचें निमुळतें टोंक लालबुंद झालें. कानांच्या पाळ्या रक्तवर्ण दिसूं लागल्या. हातांतल्या कांचेच्या बांगड्यांची त्वरित हालचाल झाल्यानें त्यांचा मधुर रुणत्कार मधूनच निघत होता आणि स्वर्गातली देवताच जणूं आपल्या पुढें अवतरली आहे असें श्रोत्यांना वाटून प्रत्येकजण आदरातिशयानें तिच्या शब्दांकडे कान लावून बसला होता.

समारंभ संपल्यावर दीनेला कितीतरी हलकें वाटलें. आज जर मंगळ असते तर त्यांनीं अंतःकरणापासून शाबासकी दिली असती व रात्रीं डायरींत लिहिलेंहि असतें—

"दीनेचं कितीहि कौतुक केलं तरी तिच्या अपेक्षेप्रमाणं मी वागत नाहीं तोंपर्यंत तिला समाधान कसं वाटणार ? जाहीर रीतीनं मला कांहीं करतां येत नसलं तरी ह्या ठिकाणीं लिहायला काय हरकत आहे कीं दीना — माझी, माझीच आहे नि राहणार पण माझीच. आजचं तिचं व्याख्यान ऐकून मलाहि नवल वाटलं. दुबळी झालेली

दीना, एवढी शक्ति आज संचरली कशानं तिच्यांत ? थंड कोळशाचं रूपांतर निखाऱ्यांत व्हायला अग्नीची जरूरी लागते. तसा कोणता अग्नि तिला इथं मिळाला ?"

दीनेच्या मनांत मंगलांबद्दलच्या विचारांनीं असा कल्लोळ उडविला त्याच वेळीं मंगलांच्या अंतःकरणांत दीनेबद्दल कसलाहि भावतरंग उत्पन्न होत नव्हता. कारण परिस्थितिच उत्पन्न झाली होती तशी विलक्षण.

मुंबईचे गव्हर्नर वज्रेश्वरीस यावयाचे होते. त्या सुमारास मंगलांनीं प्रथम कातकऱ्यांची सभा बोलावली होती. संघटनेचा मंत्र त्या वेळींच दिला गेला. कामाला सुरुवात झाली. कातकऱ्यांच्या त्यानंतर बऱ्याच सभा झाल्या. प्रत्येक वेळीं मंगलांनीं त्याना परिस्थितीची अधिकाधिक जाणीव करून दिली. गव्हर्नर येतील त्या वेळीं त्यांची गांठ पडेल असा यत्न करायचा नि आपलीं गाऱ्हाणीं त्यांच्या कानांवर घालायचीं असें ठरलें होतें. पण कांहीं आकस्मिक कारणांमुळें गव्हर्नरांचा बेतच तहकूब झाला. कातकऱ्यांची त्यामुळें निराशा झाली. पेटूं पाहणारा विस्तव अकालीं विझूं नये म्हणून मंगल वरच्चेवर येऊन त्यांना धीर देत राहिले.

कातकरी संघटित होऊं लागल्याचें आढळतांच भट्टयांच्या मालकांनींहि संघटनेवर आघात करण्याची धडपड सुरू केली. संघटित झालेल्या कातोड्यांना गुलामांप्रमाणें वागवतां यावयाचें नाहीं, पैसा अधिक द्यावा लागून फायदा कमी होऊं लागेल, चढाओढ करतां यायची नाहीं, म्हणून मंगलांच्या नादीं लागलेल्या कातोड्यांना त्यांनीं तंबी द्यायला सुरुवात केली. त्यांना नोकरीवरून काढून टाकण्याचीहि तयारी दाखविली त्यांनीं.

भट्टयांच्या मालकांचें पुढारीपण इस्माईलकडे होतें.

इस्माईलच्या स्वतःच्या अशा थोड्याच भट्टया होत्या. पण जवळ पैसा खूप असल्यामुळें जवळपासचे सर्व भट्टीवाले त्याच्या अंकित होते. म्हणून इस्माईलनें कातकऱ्यांत पसरूं पाहणाऱ्या चळवळीला नामशेष करण्याचा सर्वांना सल्ला दिला.

मंगलांनीं बोलावलेल्या सभेस गेल्याच्या अपराधाबद्दल स्वतःच्या कोळशांच्या भट्टीवरील दहा-बारा कातकऱ्यांना नोकरीवरून काढून टाकून त्यानें छळास आरंभ केला.

मंगल वज्रेश्वरीस आले तेव्हांच त्यांना ही गोष्ट समजली होती.

कुंडाजवळच्या धर्मशाळेंत ते उतरले होते. रात्रीच्या चांदण्यांत धर्म-शाळेच्या मागील मैदानावर त्यांनीं कातोड्यांची भेट घेतली. सर्वांचीं तोंडें संतप्त झालीं होतीं, आणि इस्माईलनें नवीन नेमलेल्या नोकरांना ठार करण्याची सर्वांची तयारी दिसत होती.

मंगलांनीं सर्वांना अविचार न करतां शांत राहण्याबद्दल विनंति केली, नि सर्व हकीगत ऐकून त्यांना स्वस्थ चित्तानें घरोघरीं जण्यास सांगितलें.

इस्माईलनें नवीन लावलेल्या नोकरांची मंगलांनीं युक्तीनें गांठ घेतली. कुणालाहि मोहून टाकणाऱ्या वाणीनें त्यांच्या प्रामाणिक पण अज्ञान मनावर असे कांहीं सूक्ष्म आघात केले कीं नोकरी सोडून परत जाण्याची तयारी त्यांनीं तात्काळ दाखविली. वास्तविक ते खुशीनें आलेलेच नव्हते. वज्रेश्वरीपासून बऱ्याच दूर असलेल्या भट्ट्यावर काम करणारे ते. त्यांच्या मालकांशीं इस्माईलची ओळख असल्यानें इस्माईलनेंच त्याना न कळत इथें आणण्याचा बनाव घडवून आणला होता. साहजिकच नोकरी सोडून जातांच मालक फोडून काढील अशी भीति आंतून त्याना होतीच. आणि त्यामुळें त्यांनीं नोकरी सोडून जाण्याची तयारी दाखविली तरी प्रत्यक्ष तसें करणें त्यांना कठिणच वाटत होतें. आपली ती अडचण त्यांनीं मंगलांना निवेदन केली.

मंगलांपुढें हा मोठा प्रश्नच उभा राहिला.

पण त्याच रात्रीं कातोडी आपला आपण विचार ठरवूनच निघून गेल्याचें दुसऱ्या दिवशीं मंगलांना समजलें. आणि जातां-जाता इस्माईलला त्यांनीं असेंहि बजावलें होतें— ' इथं आमच्यापैकीं कुणी यायचं नाहीं म्हापुढं. कारण इथल्या कातोड्यांची आम्हांला भीति वाटते. त्याच्या पोटावर पाय येतो म्हणून ते आम्हांला केव्हा मारतील तें सांगवत नाहीं.'

नंतर बाहेरच्या भट्ट्यांवरचे कातोडी येईनासे झाले. संघटनेवर केलेला पहिला आघात निष्फळ झाला. इस्माईलनें मंगलांप्रमाणेंच कातकऱ्यांची सभा बोलावून प्रेमाचें नाटक करण्याचा यत्न केला. सर्वांना फुकट दारू पाजायची लालूचहि त्यानें दाखविली. तरी कांहीं उपयोग होईना. मालकांचें अंतःकरण नि त्यांचें प्रेम कोणत्या प्रकारचें असतें हें कात-

कऱ्यांना पहिल्यापासून ठाऊक होतेंच, पण मंगलांचीं व्याख्यानें ऐकून आतां त्यांना चांगलें समजूं लागलें होतें कीं त्यांचें तें प्रेम आपल्याला खाड्यांत टाकण्यासाठींच उसळत असतें. त्यांचा स्नेहाचा उमाळा गळ्याभोंवतालचे दारिद्र्याचे पाश अधिकाधिक घट्ट करायलाच आलेला असतो.

ईस्माईलनें संतापानें नवाच उपाय योजण्याचा बेत केला.

मंगलांना त्यानें धमकी देवविली. पण त्या धमकीचाहि उपयोग झाला नाहीं. आपल्याला आलेलें धमकीचें पत्र कातकऱ्यांच्या सभेंत मंगलांनीं वाचून दाखवलें, आणि जो कोणी आपला खून करायला अधीर झाला असेल त्यानें आपल्याकडे यावें, आपली मान त्याच्या सुरीखालीं ठेवायला आपण तयार आहों, असें जाहीर केलें. कातकऱ्यांत मंगलांबद्दल उत्पन्न झालेलें प्रेम त्या धमकीमुळें अधिकच वाढलें. त्यांच्या जीवाचें बरें-वाईट करणाऱ्याचे तुकडे करून टाकायला सर्वांचे विळे सिद्ध झाले. पण मंगलांनीं त्यांना बेभान न होण्याबद्दल इषारा दिला.

त्या दोन दिवसात कातकऱ्यांनीं मंगलांच्या सभोंवतालीं जागता पाहरा ठेवला होता. त्यांचें प्रेम बघून मंगलाना गहिंवरून आलें. डायरींत त्यांनीं लिहिलें—

> " ... सरकारी तुरुंगाच्या भिंतींच्या आंतला अनुभव कसा असतो तें मला प्रत्यक्ष माहित नाहीं. पण पिळून काढणाऱ्या माणसांविरुद्ध लढण्यास सिद्ध करणाऱ्या माणसाभोंवतीं जनतेनें केलेला प्रेमाचा तट कसा आल्हाददायी असतो हें मात्र आज समजतंय मला. असल्या प्राणांची पर्वा न करणाऱ्या कातोड्यांनाच आमचे लोक पिळून काढण्याची शर्थ करीत आहेत. किती नवलाची आहे ही गोष्ट ! "

इस्माईलनें योजलेल्या कोणत्याहि उपायास दाद न देतां कातकरी संघटित होऊं लागले. अन् एवढ्यांत बातमी आली कीं मुंबईचे गव्हर्नर वज्रेश्वरीस यायचें नक्की झालें आहे.

गव्हर्नरांपुढें कातकऱ्यांचीं गाऱ्हाणीं मांडून त्यांचीं दुःखें दूर होतील असें मुळीं देखील मंगलांना वाटत नव्हतें. पण कातकऱ्यांचें दुःख जनतेपुढें यायला तो एक जवळचा मार्ग होता. दुरून साजऱ्या दिसणाऱ्या डोंगरांतून मानवतेला कसें भट्टीवर धरण्यांत येत आहे, तें अधिकाऱ्यांच्या

नजरेस आणण्याची ती चांगली संधि होती. म्हणूनच त्याचा फायदा घ्यायचें ठरवण्यांत आलें होतें.

कातकऱ्याना जमवून गव्हर्नरांपुढें कसें जायचें, कुणीं कुठें उभें राह्यचें, कसें वागायचें वगैरे सर्व गोष्टी निश्चित करण्यांत आल्या.

एवढ्यांत इस्माईलनें आणखीच एक डाव रचल्याचें उघडकीस येऊन सारी खटपट फुकट जाते कीं काय अशी भीति उत्पन्न झाली.

मंगलांना समजलें कीं इस्माईलनें व इतर मालकांनीं मिळून कातोड्यांना गव्हर्नरपुढें जातां येऊं नये म्हणून सुट्टीच द्यायची नाहीं असें ठरवलें असून जर कुणी त्या दिवशीं कामावर आला नाहीं तर पैसे कापून घेण्यांत येतील असेंहि सर्वांना बजावण्यात आलें.

मंगलाच्या पुढें दोनच मार्ग होते. एक संधीचा फायदा घ्यायचा नाहीं, अगर पडेल तो खर्च करायचा.

दुसऱ्या मार्गानेंच जाण्याचें निश्चित करून सर्वांना त्यांनीं बजावलें कीं पगारांतले पैसे कापले गेले तरी हरकत नाहीं, आपण त्याची भरपाई करूं, पण प्रत्येकानें गव्हर्नरांना भेटण्याच्या वेळीं आलेंच पाहिजे.

वरून कोळशाप्रमाणें दिसणाऱ्या कातोड्यांचीं अंतःकरणें हिऱ्याप्रमाणें तेजःस्वी असल्यामुळें त्यांनीं मंगलांना आपल्यासाठीं झीज लावूं देण्याचें नाकारून स्वतःच तो दंड सोसण्याचें स्वीकारलें.

गव्हर्नर येतील त्या वेळीं कातोड्यांनीं स्वतःच आपली स्थिति सांगावी अशी मंगलांची इच्छा असल्यानें त्यांचा प्रतिनिधि म्हणून गव्हर्नरांना न भेटण्याचें मंगलांनीं ठरवलें होतें. कातोड्याना त्यांनीं नीट समजावून सांगतांच त्यांनींहि त्या विचाराला संमति दिली.

येथपर्यंत ठरवा-ठरवी होऊन गेल्यावर त्यांच्या ध्यानात आलें कीं आश्रमाचा वाढदिवस दुसऱ्या दिवशीं व्हायचा आहे.

त्यांचें मन हुरहूर व आनंद यांच्या संमिश्रणानें भरून गेलें.

आपण हजर राहण्यानें दीनेचा गौरव होणार आहे असें त्यांचें एक मन म्हणालें. त्याच वेळीं दुसरें मन म्हणत होतें— ‘ दीनेपेक्षां आश्रम मोठा नि आश्रमापेक्षांहि समाज मोठा. समाजाच्या दुःखाकडे आधीं बघ. त्यासाठीं जन्म आहे प्रत्येकाचा.’

दीनेला पाठविलेली ती चिठ्ठी रात्रीं त्यांनीं लिहिली तेव्हां त्यांच्या मनांत आलें– "पत्र पाहतांच दीना काय म्हणेल ! इथं मी कां राहलों आहें तें समजेल का तिला ! कीं माझ्या ठिकाणीं तिच्याबद्दल मुळींच कौतुकाची भावना नाहीं असं ती मानील ! पण नाहीं. दीना इतक्या कोत्या वृत्तीची राह्यलेली नाहीं. ती असंच म्हणेल–'मंगल, अशीच समाजसेवा करीत राहा. जनतेच्या दृष्टीनं माझे मंगल जितके मोठे होतील तेवढे मला हवेच आहेत."

तिसऱ्या दिवशीं गव्हर्नर आले. देवळापासून कांहीं अंतरावर त्यांच्या लव्याजम्याचा तंबू ठोकला होता.

इस्माईलच्या कोणत्याच धमकावणीला न जुमानतां शेंकडों कातकरी जमले. त्यांचा पोषाख नेहमींप्रमाणेंच होता. प्रत्येकानें रानवट फुलांनीं भरलेले द्रोण भेट देण्यासाठीं आणले होते. कांहींनीं आंब्याच्या पानाचे हार करून ठेवले होते.

मंगलानीं दुरूनच इषारा देतांच सर्व कातकरी गव्हर्नरसाहेबांच्या जवळ जाऊं लागले. शिपायानीं त्यांना अडवण्याचा यत्न केला, पण साहेबांनींच त्यांची भेट घेण्याची इच्छा दर्शविल्यामुळें त्यांचें कांहीं चाललें नाहीं.

गव्हर्नरांनीं हंसत-हंसत सर्वांचें स्वागत करून कांहीं प्रश्नहि दुभाष्याच्या मदतीनें विचारले. कातकऱ्यांनीं आपली करुण काहणी सांगितली. गव्हर्नरांच्या मनात अनुकंपा उत्पन्न झाली. मंगलांनीं लिहून दिलेलें त्यांच्या परिस्थितीसंबंधींचें निवेदनपत्रक कातकऱ्यांनीं गव्हर्नरसाहेबांच्या हातांत दिलें. आणि कातकऱ्यांनीं प्रेमानें दिलेल्या त्यांच्या त्या रानवट भेटींचा गव्हर्नरांनीं आनंदानें स्वीकार केला.

गव्हर्नरांनीं कातोड्यांच्या परिस्थितीबद्दल योग्य ती चौकशी करण्याचें आश्वासन दिल्यावर मुलाखत संपली.

कातकऱ्यांना आपल्या आयुष्यांत तो प्रसंग अपूर्वच वाटला.

सर्व वर्तमानपत्रांतून ह्या घटनेचा नंतर प्रामुख्यानें उल्लेख केला गेला. कातकऱ्यांचें दुःख वेशीवर टांगण्याचें कार्य यशस्वी झालें.

गव्हर्नर निघून गेल्यावर मंगलांबद्दल कातकऱ्यांना इतका उमाळा आला कीं केव्हां एकदां त्याला आपण कडकडून भेटूं असें त्यांना होऊन गेलें ! त्यांच्या भावड्या प्रामाणिक प्रेमाचा ठाव घेण्याची ती वेळ वाया जाऊं

देण्याएवढे मंगलहि अदूरदर्शी नव्हते. समाजाचीं दोन टोकें कशीं एकत्र येऊं शकतात तें दाखविण्याची ती संधि त्यांनीं साधलीच.

मंगल उंचवट्यावर उभे होते. कातोडी वर्तुळ करून उभे राहिले. अन् प्रत्येक जण एकामागून एक जाऊन मंगलांना भेटूं लागला.

भक्तीच्या सहस्र धारांनीं आपण चिंब झालों असल्याप्रमाणें मंगलांना वाटलें. भेटतां-भेटतांना प्रत्येकाच्या डोळयांत तो पाही. कष्टी जीवित असह्य झाल्याकारणानें खोल गेलेल्या त्या नेत्रांतून प्रेमाचीं - आदराचीं - अनंत वलयें बाहेर पडत असून तीं आपल्या भोंवतालीं भिरभिरत असल्या-सारखीं त्याला भासलीं. भेटण्याच्या क्रियेंत तो इतका तन्मय होऊन गेला होता कीं दूरवर मोटार उभी राहून त्यातून दीना केव्हां उतरली नि केव्हां त्यांच्या दिशेनें आली हें त्यांच्या ध्यानींहि आलें नाहीं.

मंगलांच्या भोंवतालचा तो देखावा पाहून ती थबकली.

कांहीं काल स्तब्धतेनें ती बघत राहिली त्याकडे.

विजेच्या दोन प्रवाहांची भेट होतांच जसें तेज उत्पन्न होतें तसें मंगलां-च्या नि कातोड्यांच्या त्या भेटण्यांत उत्पन्न होत असून तें आपल्या डोळ्यांना दिपवून टाकीत असल्याप्रमाणें तिला वाटलें. तिनें मध्येंच आपले डोळे मिटून घेतले नि लागलींच कसली तरी जाणीव झाल्यानें तिनें निराशेचा एक दीर्घ निःश्वास सोडला.

ह्या ठिकाणीं दीना अचानक यायला कारण घडलें तें मोठें विलक्षण होतें.

आश्रमाच्या वाढदिवशींच्या रात्रीं जितक्या सुखानें ती निजली तित-क्याच दुःखानें नंतरच्या रात्री काढायला लागल्या तिला.

कारण दुसऱ्याच दिवशीं दुपारच्या वेळीं हॉस्पिटलमधून येऊन हात धुऊन तिनें पोषाख बदलला नाहीं तोंच कुणी बाई आल्याचें शिशिरनें कळविलें. तिला आंत यायला सांगण्याविषयीं तिनें शिशिरला सांगितलें.

सरलेला दीना मुळींच ओळखीत नव्हती. कळव्याच्या पुलावर जे अनेक चेहरे पाहिल्यासारखे तिला वाटत त्यातलाच तिचा आहेसा दिसला.

सरला अतिशय अदबीनें आंत आली नि हलक्या आवाजांत म्हणाली—

" मला तुमच्याजवळ खाजगी बाबतींत कांहीं बोलायचं आहे."

" मग इथंच बोला कीं ! "

" कुणी ऐकायचं नाहीं ना ? "

" छे ! "

" इथंच जांभळी नाक्याजवळ राहतें मी. नुकतीच जळगांवला गेलें होतें. तिथले श्रीकांत इनामदार माहित असतील तुम्हांला ? "

" फारसं आठवत नाहीं त्यांच्याबद्दल ! " कुत्सित प्रश्नाला उत्तरहि तसेंच हवें होतें.

" त्यांनीं निरोप सांगायला सांगितला आहे. "

" निरोप ? आणि मला ? "

" हो तुम्हालाच. "

" मी तर त्याची कोणी नाहीं. मला कसला निरोप असणार त्यांचा ?"

" ते तर म्हणाले तुमचं त्यांच्याशीं लग्न झालेलं आहे म्हणून ! "

" असेल ! एके काळीं झालं असेल ! जेव्हा मीं जळगांव सोडलं तेव्हांच तें मोडलं."

" तुमच्या मागील गोष्टींबद्दल मला काय करायचंय ? निरोप पोचता केला कीं माझं काम झालं. "

" सांगा काय आहे तो "

" श्रीकांतांनीं तुम्हाला जाणीव द्यायला सांगितली आहे कीं त्यांच्या लग्नाची बायको आहांत तुम्ही हें विसरून चालायचं नाहीं. त्यांच्या नांवाला काळिमा लागेल असं तुम्हीं कांहीं करणं वाईट आहे. डॉ. मंगलांच्या जवळ असणारे तुमचे संबंध इथं सगळ्यांना ठाऊक झालेले असल्यामुळं श्रीकांतांना अशी भीति वाटूं लागली आहे कीं त्यांचं नांव तुम्ही घालव-णार तर नाहीं ? म्हणून आचरण शुद्ध ठेवायचा यत्न करा. त्यांनीं तुम्हांला त्रास दिला असेल, माहेरीं टाकलं असेल, दुसरं लग्नहि केलं असेल. पण त्यामुळं त्यांच्याशीं असलेलं तुमचं नातं नाहींसं होत नाहीं. अजून श्रीकांतांची पत्नीच आहांत तुम्ही, नि मरेपर्यंत राहणार पण. तुमच्यावरचा त्यांचा हक्क कांहीं नाहींसा होत नाहीं. "

" झालं सांगून ? " मनांत उत्पन्न झालेला संताप दाबीत दीनेनें सरलेला विचारलें.

" झालं. "

" तुमच्याजवळ निरोप देण्याऐवजीं त्यांनीं पत्रच कां धाडलं नाहीं हो मला ? "

दीनेच्या ह्या प्रश्नानें सरला किंचित् गोंधळली. पण लागलींच भानावर येऊन उत्तरली–

" पत्रापेक्षां बायकोच्या मैत्रिणीबरोबर निरोप देणंच अधिक चांगलं वाटलं असेल त्यांना. "

" बरं, पोंचला निरोप. जा आतां आणि पुन्हां असल्या कामासाठीं आश्रमात येण्याची तसदी घेऊं नका. वाटलं तर कळवा तुमच्या त्या श्रीकांतांना कीं जळगांवाशीं माझा आता कसलाच संबंध राहिलेला नाहीं. त्या गांवांतल्या कुणाच्याहि अब्रूची चाड मला कशाला हवी ? वाटेल तसं वर्तन ठेवायला त्याचे ते मोकळे आहेत तशी माझी मी मोकळी आहे. "

सरला दिसेनाशी होईपर्यंत दीना संतप्त मुद्रेनें बघत राहिली. मागाहून मात्र आपलें सारें चैतन्य गळून गेल्याप्रमाणें तिला झालें. निश्चेष्ट होऊन किती तरी वेळ ती पडून राहिली. शेवटीं आपल्या असहायपणाबद्दल रडूं आलें तिला.

आश्रमांत आल्यावर कांहीं दिवस इच्छा नसूनहि आपल्या वैवाहिक जीवनाची दुःखातिका दीनेच्या डोळ्यांपुढें उभी राही. पण इतरांच्या दुःखाकडे बघायला शिकल्यापासून तसें होईनासें झालें. मंगलाबद्दल अतीव आपलेपणा उत्पन्न होऊं लागला तस-तशी श्रीकांताबद्दलची तिची जाणीव अस्पष्ट होऊं लागली. लग्नाची आठवण फक्त विकाराच्या आहारीं ती कधीं-कधीं जाऊं लागे तेव्हांच तिला अडथळ्याच्या रूपानें होई. अशा वेळीं तिला वाटे– लग्नाच्या वेळीं कोमल तंतूचं म्हणून वाटलेलं बंधन लोखंडी साखळदंडाप्रमाणें जन्मभर जखडून ठेवणार आपल्याला. कोळ्याच्या तंतुमय जाळ्यांत सांपडलेल्या माशीला ज्याप्रमाणं मृत्यूचाच मार्ग मोकळा असतो तसंच आपलं झालं आहे. श्रीकांतांनीं कितीहि आपल्याशीं वाईट आचरण केलं तरी मोकळीक आहे त्याना. आपल्याला मात्र सुटकेचा कोणताहि रीतसर मार्ग नाहीं. लग्नविच्छेदन शक्य नाहीं. कुणाजवळ पत्नी म्हणून राहायचीहि कायदा मोकळीक देत नाहीं. टाकलेल्या स्त्रीला एकच मार्ग मोकळा असतो. तो म्हणजे मृत्यूचा ! ...

त्याहि क्षणीं सामाजिक बंधनांच्या निष्ठुरपणाचा दीनेला अतिशय संताप आला.

मंगलांचं आपल्यावर प्रेम असूनहि आपल्यापासून विशिष्ट अंतरावरच ते राहूं पाहतात हें स्पष्ट झाल्यापासून तिनें त्यासंबंधींच्या दुःखानें व्यग्र होण्याचें सोडून दिलें आणि नवीं-नवीं कामें काढून त्यांत वेळ घालवायला सुरवात केली.

दिवस कामापायीं संपला तरी रात्र ?

डोळ्यांपुढें ठेवलेलीं सारीं ध्येयें एकांतांत पडल्यावर दूर सरकत नि तारुण्यांतल्या विविध भावना तिला टोंचण्यास सुरवात करीत. आणि रात्र तिची तळमळींत जाई.

सरला आली त्याच्या आदल्या रात्रीं अशीच ती जागी होती.

त्यांतच दुसऱ्या दिवशींच्या श्रीच्या निरोपानें तिला क्षुब्ध केलें. आश्रमांत एकटें राहण्यापेक्षां मंगलांकडे गेलें तर मनाला शांतपणा येईल अशा कल्पनेनेंच ती वज्रेश्वरीस आली होती. तिला वाटेंत सारखें वाटत होतें 'मंगल कुठं असतील ? भेटतील कीं नाहीं ? वज्रेश्वरीला असले तरी मोकळे-पणा असेल का त्यांना ?'

पण ती प्रत्यक्ष आली तेव्हां मंगल उंचवट्यावर उभे असून एकेक कातोडी जाऊन त्यांना भेटत असल्याचें दृश्य तिला दिसलें.

तिच्या मनांत चटकन् विचार येऊन गेला—'कातोड्यांच्याप्रमाणं आपण नाहीं का त्यांना भेटूं शकणार ?'

आणि तसें घडणें या वेळीं शक्य नाहीं अशी जाणीव होतांच ती खिन्न झाली आणि दीर्घ निःश्वास सोडला तिनें.

"दीना ! तूं कुठं या वेळीं ?" तिच्याकडे दृष्टि जातांच मंगलांनीं विचारलें.

"तुमचं वैभव बघायला आलें मुद्दाम !"

त्यावर दोघेंहि हंसलीं. मंगलांचं हास्य प्रसन्नतेंतून निघालें होतें. दीना वरकरणीं हंसत होती.

रात्रीं चांदण्यांतून नदीमध्यें असलेल्या कुंडाजवळच्या चौथऱ्यावर जायची इच्छा दीनेनें दर्शवितांच मंगलांनीं नाहीं म्हटलें नाहीं.

धर्मशाळेपासून थोडेंसें चालून गेल्यावर नदीचें पात्र आहे. त्यांत कुंडें ठिकठिकाणीं दिसतात. त्यातल्याच कडकडीत पाण्याच्या तीन कुंडांजवळ असणाऱ्या कातळावर दोघें बसलीं.

भोंवतालच्या शांततेला लाजविणारी भकास स्तब्धता दीनेच्या मनांत पसरली होती. काहींशा खिन्न आवाजांत ती म्हणाली—

" तुम्ही रागावलांत तरी चालेल, पण मला बोललंच पाहिजे. मंगल, खरं खरं सांगा. लग्नामुळं माझ्यावर अन्याय झाला आहे असं नाहीं का वाटत तुम्हाला ! "

" वाटतं कीं ! "

" मग ! त्या अन्यायावर प्रहार करण्याचा प्रयत्नहि करावासा वाटत नाहीं ! "

" मागं एकदा तुझ्या सूचनेला नकार दिला म्हणून म्हणत असशील असं. कोणत्याहि प्रश्नाचा एकाच बाजूनं विचार करून चालत नाहीं. तूं मला हवी आहेस. अन् तुझं शरीर मला नको असं मी म्हणत नाहीं. माझ्याहि मनात विचार उसळतो कीं गोदूच्या साधूप्रमाणं तुझ्याशीं वागावं. पण आश्रम डोळ्यांपुढ येताच सारं धैर्य खचून जात. विवाहाला जीविताचं ध्येय कधीं मीं मानलं नाहीं. ध्येयाकडे नेण्यास मदत करणारी घटना म्हणून मी त्याकडे बघतों. ... कायदा वाईट आहे. पण तो आहे तेव्हां त्याप्रमाणं चालायला नको का ! कायद्याच्या मर्यादा उल्लघून मीं तुझा हात स्वीकारला, नि तेंहि श्रीकांताच्या परवानगीवाचून, तर आश्रमाला तें विघातक ठरेल. व्यक्ति मोठी असली तरी संस्था व्यक्तींपेक्षा मोठ्या नव्हत का ! "

" तत्त्वज्ञानानं भूक का भागत असते मंगल ! "

" तें मला समजत का नाहीं ! तत्त्वज्ञानानं भूक भागली नाहीं तरी काहीं वेळ ढकलणं अशक्य नसत."

" किती अन्याय होतो आहे माझ्यावर ! "

" हो, कबूल. आणि तं माहित असून मला त्यावर प्रहार करणं शक्य नाहीं. साऱ्या समाजावर होणारे अन्याय दूर करण्याचं कंकण बांधणाऱ्या मला तुझ्यावर झालेला अन्याय दूर करता येऊं नये ! किती वाईट गोष्ट आहे ही ! पण इलाज नाहीं "

दीना प्रक्षुब्ध वृत्तीनें इकडे-तिकडे बघत होती. तिच्या विशाल नेत्रांत सारा संताप एकवटला होता जणूं. श्वास आंत ओढून मान ताठ करून दूर-दूर पाहण्याचा आविर्भाव करीत ती उद्गारली—

" दूर बसणारा लग्नाचा समंध अजूनहि छळीत आहे मला ! त्याच्या-वर प्रहार करण्याचंहि मनांत येतं. पण..."

---

# ८

त्र्यंबकेश्वरीहून दीना-मंगल परत येतात न येतात तोंच मंगलाना पनवेल-जवळच्या खेड्याकडे धावत जाणें भाग पडलें.

जवळपासच्या शेतकऱ्यांनीं सभा बोलावली होती नि मंगलांना सभेचें अध्यक्ष्यस्थान देण्याचें ठरलें होतें. सावकारांकडून आपल्यावर जुलूम होत आहे : उत्पन्नाच्या प्रमाणांत मक्ता घेण्यात येत नाहीं : ठराविक कालानंतर उगीचच खंड वाढविण्यांत येतो : सवाई-दिढीची पद्धत चालू असल्यानें कर्जमुक्त होणें अशक्य होतें : शेतांतलीं उभीं पिकें कर्जवसुलीच्या नांवाखालीं कापून नेण्यांत येतातः भाताशिवाय इतर पिकें काढलीं तर त्यावरहि अर्धेली-चा हक्क सागण्यांत येतो : कलिंगडाची लागवड केली नि फळ धरलें तर यावर सावकार दृष्टि लावून बसतात : सरकारी नोकरांकडून भारी त्रास होतो. एक ना दोन, अशा अनेक तक्रारी मंगलापुढें त्यांनीं माडल्या. त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाच्या जाणीवेनें मंगलानीं आमंत्रण स्वीकारलें होतें.

मागच्या वेळच्या सभेप्रमाणेंच सभा झाली. सभेंत गोंधळ उडवून देण्याचा यत्न करण्यांत आला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

सभेची हकीगत मंगल दीनेला अभिमानानें सांगत होते—

" मागच्या वेळीं काहींच नाहीं इतकी सभेंत गडबड उडाली असती. सावकारांनीं मुद्दाम मुंबईहून गुंड आणले होते नि सगळ्या शेतकऱ्याना चोपा-यचं ठरवलं होतं. अर्थात् मी त्यांतून कसा सुटणार ! म्हणूनच मीं पहिल्या-नंच बजावलं— ' सभेंत जे कोणी सावकार अगर त्यांचे प्रतिनिधी असतील त्यांनीं हें पक्कं ध्यानांत ठेवावं कीं मंगलला मारून कांहीं त्यानं कुळांत उत्पन्न केलेली बंडखोरीची भावना ठार होणार नाहीं. एखाद्या क्षुद्र माणसाच्या हातून माझा कदाचित् कपाळमोक्ष केला जाईल, पण कसल्याहि प्रचंड शक्तीनं शेतकऱ्यांच्या संघटनेचा फोफावणारा वृक्ष हादरणार नाहीं. ' माझ्या इषाऱ्यामुळं बरंच काम झालं. अन् सभा शांतपणानं संपली."

त्याच रात्रीं मंगल निजले असतांना एक अनपेक्षित गोष्ट घडून आली.

दिवसाच्या थकव्यामुळें केव्हां एकदां झोंपूं असें त्यांना झालें होतें. दीनेला त्याची जाणीव असल्यानें तिनें स्वतःच त्यांचें अंथरूण घातलें, स्वच्छ चादर हातरून उशी ठेवली, आणि ते गादीवर पडतांच त्यांच्या टेबलाजवळ ती बसली.

निजायच्या वेळीं मंगलांनीं विचारलें—

" जागणार कीं काय आज तूं ? "

" कशावरून ? "

" तुझ्या डोळ्यांवर झोपेचं चिन्हहि दिसत नाहीं ! "

तिनें भुंवया किंचित् उंचावल्यासारख्या करून उत्तर दिलें—

" थोडा वेळ वाचत बसायचंय मला. "

" काय वाचणार आहेस ? "

" पाहतें काय हातास येतं तें."

मंगल कांहीं बोलले नाहींत. लवकरच त्यांना गाढ झोंप लागली.

त्याबरोबर दीनेच्या मनांत वादळ निर्माण झालें. अंतःकरण बाहेर पडण्यासाठीं जणूं धडपडूं लागलें.

मंगलांची रम्य मूर्ति कितीतरी वेळ डोळ्यांत सांठवीत होती ती. बाहेरून दिसतो आहे त्यापेक्षां खरोखर किती थोर किती विशाल आहे हा देह ! जीवन हें देण्यासाठीं असतं असा मंत्र सतत जपून किती तेजःस्वी झाली आहे मंगलांची मुद्रा ?

आणि मंगलांच्या मानानें तिला आपली क्षुद्रता जाणवूं लागली. तिला वाटूं लागलें— स्वतःच्या तळव्याखालच्या जमिनीलाच जग मानणारी मी दुसऱ्यांच्या विस्तीर्ण नि दुःखपूर्ण जगाकडे बघायला कुणामुळं शिकलें ? मंगलांमुळंच ना ?... त्यांच्या छायेंत इतके दिवस काढले तरीहि माझं लक्ष्य स्वतःकडे वळतंच अजून. भोंवऱ्यांत सांपडलेलं माणूस जसं स्वतः-भोंवतींच फिरत राहतं तसं अजूनहि होतं आहे माझं. ... मंगल किती विशाल दृष्टीचे आहेत ? ... मनांतल्या विकारांवर ते ताबा ठेवतात तरी कसे ? ... किती दुर्दैव माझं कीं असली थोर व्यक्ति माझी म्हणून उघडपणानं मला मानतां येऊं नये ! '

ती तशीच बघत राहिली. वासनांचा आवेग बळावत चालला. साऱ्या शरीरांतून कसल्या तरी तरल लहरी सळसळून गेल्या. अंग कंप पावत आहेसें वाटलें नि मनांत विकारांच्या प्रबलतेनें गोंधळ उडाला. एकाएकीं तिला वाटूं लागलें मंगलांच्या ओठांचें पटापट चुंबन घेऊन मनाची भूक शांत करावी.

अधिक विचार करण्यासारख्या मनःस्थितींत नसल्यामुळें तिनें आपली इच्छा चटकन् कृतींत आणली.

मंगल या वेळीं गाढ झोंपले होते. अन् कांहीं वेळानें त्यांना स्वप्न पडूं लागलें.

— रखरखीत वाळवंटावरून कुणी बाई जात आहे. ती कोण, काय हेतूनं जात आहे, ह्याची चौकशी करण्यासाठीं आपण मागोमाग जाऊं लागलों. वाळवंट इतकं विस्तीर्ण होतं कीं वर्षानुवर्षे चालत राहिलों तरी संपायचं नाहीं. ती पुढं जात होती. मधूनच पदराला डोळे पुशीत होती. ...

खूप चालल्यावर आपण तिला गाठलं. निरखून बघतों तों ती ओळखीचीच दिसली. कुठं चाललीस विचारतांच ती म्हणाली— ‘ मला आडवूं नका. ह्याच मार्गानं जाणार मी. राहवत नाहीं माझ्यानं. ’

तिला किती बजावलं— ‘ ह्या मार्गानं जाणं धोक्याचं आहे. संकटं येतील. असह्य होईल जगणं. ’ क्षणभरच ती थांबली. पण डोक्यांतला विचार मात्र गेला नाहीं. ती तशीच पुढं जाऊं लागली.

तो मार्ग अधःपाताकडे नेणारा आहे हें माहित असूनहि आपण मागोमाग जातच आहों. मात्र तसं करतांना कुणी बघूं नये असं सारखं मनांत येत आहे.

एवढ्यांत ती थबकली, चटकन् आपल्याजवळ आली नि भुकेल्या दृष्टीनं पाहूं लागली. आपल्या मनावरचा ताबा उडून गेला. विकाराच्या आधीन झालों आपण नि भरकन् किती तरी वेळां तिचं चुंबन घेण्यासाठीं तोंड पुढं केलं. ...

इतक्यांत वाळवंटाचं प्रचंड सरोवर बनलं. शीतल चांदण्यांत त्या सरोवराचा विस्तीर्ण पृष्ठभाग लांब-रुंद अशा शुभ्र गालिचाप्रमाणं भासला, त्यांत लहानशी होडी होती एक नि तींत दीनेसह आपण बसलों आहोंत. ..., ’

आपण दीनेला प्रेमातिशयानं जवळ घेतली.

नि इतक्या आवेशानं हृदयाशीं दाबण्याचा यत्न केला.

मंगल स्वप्नांतल्या त्या कृतीमुळें खरोखरच प्रत्यक्षच जागा झाले. नि चमत्कार असा कीं खरोखरच दीना आपल्या गादीवर आहे नि आपण तिच्याच अंगावर हात टाकीत आहों हें त्याना कळून आलें.

दीना जागी होती. तिची अधीर दृष्टि आशेनें त्यांच्याकडे कांहीं तरी मागत असल्यासारखी त्यांना वाटली. मंगलांच्या बुद्धीवर झांपड आणली त्या दृष्टीनें, नि त्यांच्या हृदयांतून अशी कांहीं विचारांची लाट उसळली कीं ती थोपवून धरणें त्यांना अनावर झालें. त्या भरांत त्यांनीं दीनेचें खरोखरच गाढ उत्कटतेनें चुंबन घेतलें. ...

अन् विजेच्या तारेंतील विजेचा प्रवाह एकाएकीं नाहींसा झाला !

आपल्या हातून किती भयंकर गोष्ट घडली याची जाणीव होतांच ते एकदम दीनेपासून दूर जाऊन घाबऱ्या दृष्टीनें बघत उद्गारले—

"अरेरे ! काय झालं माझ्या हातून !"

त्या क्षणापासून त्याना अतिशय ओशाळल्याप्रमाणें वाटूं लागलें. दीनेवर आपलें प्रेम आहे, मग असें वाईट कां वाटावें, असा विचार मनांत येऊनहि मनाची रुखरुख थांबेना. दीनेला वासनेचा आवेग असह्य झाला म्हणून आपणहि तितकेच दुर्बल बनणें योग्य नव्हतें.

दुसऱ्या दिवशीं ते दीनेशीं फार बोलले नाहींत.

ती दिसतांच त्याच्या मनाला अस्वस्थता वाटूं लागे.

श्रीकांत देखील तशाच अस्वस्थेंत दिवस काढीत होता. अर्थात् निराळ्या कारणानें.

मनीऑर्डरनें दीनेला पैसे पाठविण्याचा त्यानें फिरून एकदां यत्न केला.

वास्तविक असे पैसे धाडण्याइतकी त्याची स्थिति आतां राहिली नव्हती. त्याच्या आईचा आजार. त्यांतच स्वतःचें दुखणें. ह्या पायीं अतोनात खर्च झाला. आईच्या मृत्यूनंतर पैशाच्या अडचणींतहि तो आला. अर्थात् घसरणारी आर्थिक परिस्थिति सांवरण्यास त्याला फार श्रम पडले नाहींत हें खरें.

आईच्या मृत्यूमुळें एक मात्र वाईटांतून चांगली गोष्ट घडून आली.

सर्व मिळकत श्रीच्या ताब्यांत आली. पैसा खर्च करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य त्याला मिळालें. त्याच्या विचारांना घरांत जी किंमत नव्हती ती येउं लागली.

आकाक्षा मृतवत् झाल्या होत्या त्या पुन्हां डोकें वर काढूं लागल्या.

पण चतुरेच्या करड्या दृष्टीकडे अजूनहि त्याला बघावें लागत होतेंच.

म्हणून दीनेला नुकत्याच मनापासून पाठविलेल्या पैशांची येणारी पावती तिच्या दृष्टीस पडण्यापूर्वी आपल्या हातांत यावी यासाठीं तो जपत होता.

पावती आली कीं त्यावरची दीनेची सही बघून तिलाच पाहिल्याचें समाधान आपल्याला लाभेल अशा आशेनें तो अधीर होऊन बसला होता.

पण ठराविक सकाळच्या टपालाला पावती आली नाहीं. आतां आजची वेळ गेली असें म्हणून तो स्वस्थ राहिला.

दुपारीं एकाएकीं चतुरा जिन्यावरून पाय आपटीतच वर आली.

हातांतला मनीऑर्डरचा फार्म त्याच्यापुढें नाचवीत चिडक्या आवाजांत ती उद्गारली—

" हें घ्या बक्षीस ! माझ्या न कळत कारस्थान करायला दीनेबद्दल मोठं प्रेम पाघळायला लागलं होतं नाहीं आपलं ! हें घ्या आता परस्परच ! "

क्षणभर ती थांबली. तेवढ्यांतहि तिच्या हृदयाचीं किती तरी स्पंदनें झालीं असतील.

" तिच्याकडे पैसे पाठवायचे नाहींत म्हटलं म्हणून चोरून पाठवतां वाटतं ! मी म्हणतें एवढी लपवा-लपवी कशाला ! एवढं वाटतंय तिच्या-बद्दल तर तिलाच का आणून ठेवा ना ! पाहा तुमच्या प्रेमाला कितीसा धूप घालते ती. ... आणून तर पाहा. ... "

निरुपाय होऊन श्रीकांत फॉर्मवर सही करीत असतांना चतुरेनें वाटेल तशीं विधानें चालविलीं होतीं. श्रीला निमूटपणानें ऐकून घ्यावें लागलें सारें. कारण त्यानें तिच्या नकळत मनीऑर्डर धाडली होती खरी, नि दीनेनें ती न स्वीकारता परत केली होती.

" सरळेच्या पत्रांतला मजकूर खोटा वाटला नाहीं तुम्हाला ! आतां आला पडताळा ! " मनीऑर्डर परत आल्यानें श्रीच्या मनांत उत्पन्न झालेल्या विषादाला सरळेच्या पत्राची आठवण देऊन तिनें अधिकच डिवचलें.

मध्यंतरीं सरलेकडून आलेल्या पत्रांत तिनें लिहिलें होतें—

" ... तुझ्या सांगण्याप्रमाणें मी मंगलांच्या आश्रमांत जाऊन आलें. तूं सांगितल्याप्रमाणं तिला बजावलं. पण बंदुकीच्या सुटलेल्या गोळीला ' मागें परत ' असं सांगण्यासारखंच होतं तें.

पूर्वींची दीना किती तरी बरी होती. डॉ. मंगलबरोबर फिरायची. आश्रमांत काम करायची. पण अलिकडे ! ... इथं तर सारीं उघड बोलतात कीं तिनं ताळच सोडलाय म्हणून. तुझ्या श्रीकांताच्या नांवाला कशानहि न जाणारं डांबर फांसण्याचा विचार आहे तिचा. ... "

अनपेक्षित रीतीनें घडून आलेल्या त्या एकूण प्रकारामुळें गोंधळलेल्या मनःस्थितींत श्रीकांत कितीतरी वेळ पडून राहिला. दीनेचें सारें चरित्र त्याच्या डोळ्यापुढें उभें राहिलें नि मनात तो म्हणूं लागला :

— दीना जेव्हां जवळ येत होती तेव्हां आपण तिला दूर ढकलली. तिनं जवळ यावं असं आपल्याला वाटूं लागताच आता तीच दूर जाऊं लागली काय ! ... मनीऑर्डर न स्वीकारण्यावरून हेंच नाहीं का स्पष्ट होत ! ... आपण नको असता आपला पैसाहि तिला नकोसा व्हावा अं ! पण तें साहजिकच नाहीं काय ! ... दीनेविषयीं विषाद मानण्याला मला कोणती जागा आहे !... छे, दीना योग्य तेंच वर्तन ठेवील. ... मंगलांबद्दल तिच्या ठायीं प्रेमभाव उत्पन्न झालेला जर आपल्याला अयोग्य वाटत नाहीं, तर मंगलांशीं तिनं अधिक जवळचा संबंध ठेवला म्हणून त्यांत बिघडलं कुठं ! असं काय तिच्याकरिता आपण करतों कीं तिला आपल्याविषयीं आपुलकी राहावी ! आपल्या नांवाला कसला काळिमा लावणार ती ! उलट ठाण्याच्या आसपास इतकी लोकप्रियता मिळविली आहे त्या दोघांनीं कीं सर्वांच्या तोंडून त्यांच्याबद्दल गौरवाचेच शब्द ऐकूं येतात.

प्रकृति दाखविण्यासाठीं मुंबईस गेल्या वेळचा प्रसंग त्याला आठवला.

— डॉक्टरनीं प्रकृति तपासली, अंगांतलें रक्त तपासलें व रोगाचें निदान करून ते म्हणाले— " हवापालट तर करायलाच हवाच, पण आणखीहि एक गोष्ट करायला हवी. तुमचा जो रोग आहे त्यासाठीं दोन-चार महिने धरी रोज उन्हाळ्याच्या पाण्याच्या आंघोळीची जरूर आहे."

आपण विचारांत पडल्याचं बघून डॉक्टर म्हणाले–

" कठिण नाहीं तें. मुंबईहून चाळीस-पंचेचाळीस मैलांवर वज्रेश्वरीचीं कुंडं आहेत तीं माहित आहेत का तुम्हांला ?"

" करीन चौकशी कुठं तरी."

" कशाला ? मी सागतों, तुम्ही असं करा."

डॉक्टरनीं वज्रेश्वरीला राहण्याची व्यवस्था करण्यासाठीं कुणाच्या तरी नांवची चिठ्ठी लिहून दिली. ठाण्याचे गृहस्थ तिथंच आले होते कुणी तरी. दुसऱ्या माणसांजवळ ठाण्यांतल्या उपयुक्त संस्थांबद्दल बोलणीं चाललीं होतीं त्यांचीं. बोलतांना आश्रमाचंहि नाव निघालं मंगलांच्या. मंगलांची तर स्तुति केलीच त्यांनीं, पण दीनेबद्दलहि फारच आदरभाव दर्शविला– ' खरोखर असा कांहीं गुण आहे तिच्या हाताला. शिवाय अंग मोडून काम करायला नेहमीं तयार. ... अन् असल्या स्त्रीवर जेव्हां आमच्यांतले क्षुद्र मनोवृत्तीचे लोक टीका करूं लागतात तेव्हां असं वाटूं लागतं कीं ह्यापेक्षां मोठा अपराध तिला माहेरीं टाकणाऱ्या तिच्या नवऱ्यानं देखील केला नसेल ! '

आपण कोण हें तिथं कुणाला माहित नसल्यानं आपल्याला समाधान वाटलं. आपली दीना नांव काढते आहे स्वतःच ही कल्पनाच किती गोड वाटली आपल्याला. ...

आतांहि त्या आठवणीमुळें तसलेच विचार पुन्हां त्याच्या मनांत आले–

चतुरेनं दीनेला माझ्या नांवानं कितीहि खोटे निरोप पाठवले नि सरलेनं कांहीं लिहिलं, तरी दीनेचं खरोखर कांहीं देखील चुकलेलं नाहीं. तरुण हृदयाला दुसऱ्या हृदयाचीच भूक लागायची. मग मंगलांशीं ती सलगीनं वागली तर काय अनैसर्गिक आहे ?

मात्र त्याच वेळीं दीना सुटलेल्या बाणाप्रमाणं विमानाच्या वेगानं पुढं-पुढं जात आहे, तिला आपण गांठणार कशी ? ह्या विचारानें त्याला किंचित खिन्नता आली.

एवढयांत चतुरा तेथें आली.

आज तिनें इतका कांहीं आकर्षक पोषाख केला होता कीं श्रीच्याहि तें चटकन् ध्यानांत आलें. उत्तान शृंगाराला साजेल अशा आविर्भावानें ती

श्रीजवळ उभी राहिली. तिला वाटलें आपण ठराविक अंगविक्षेप करतांच श्री आपला चटकन् हात पकडतील, पळून जाण्याचा लटका आविर्भाव आपण करूं, नि श्री मग धांवत मागं येतील आपल्या !

पण श्री स्थच राहिला.

त्याच्या मांडीवर हात ठेवून ओणवी होऊन त्याला किंचित् हलवून चतुरा छद्मीपणानें श्रीच्या डोळ्यांत बघूं लागली.

तिच्या तोंडावरील खुनशी हास्याकडे बघून त्याला जणूं चीड आली आणि तो तिरस्कारानें म्हणाला–

" चतुरा, पुरं झालं हें नाटक. कंटाळा आला आहे त्याचा."

" नाटक का वाटतं तुम्हांला हें माझं ? "

" समजतं मला सारं. आतां जाशील का येथून ? "

" कां म्हणून जाईन ? माझा हक्कच आहे इथं असायचा. माझ्याशीं लग्न झालंय तुमचं."

" हो, तेंहि खरंच ! " एवढे तुटक शब्द बोलून श्री स्वतःच उठला. जें बंधन दीनेला किती काळ नकोसें झालेलें होतें त्याची बंधकता आतां कोठें चतुरेच्या वाक्यानें श्रीला चुटपुटती जाणवली.

तेव्हांपासून श्रीकांताचे बहुतेक दिवस क्षुब्ध मनस्थितींतच चालले. आपण दीनेवर अन्याय केला म्हणून ती दूर चालली ह्या जाणीवेनें त्याच्या मनावर एवढा पगडा बसवला कीं नेहमींच्या गोष्टी करण्याचें देखील त्याला भान राहीनासें झालें. सारखा विचार ... अहोरात्र दीनेबद्दलचा विचार !

डॉक्टरांच्या सल्ल्यानुसार श्रीकांत वज्रेश्वरीस येऊन राहिला.

जळगांवच्या गिरण्यांनीं गढूळ केलेल्या वातावरणात फिरतांना श्रीला जेवढें समाधान वाटे त्यापेक्षां येथें त्याला अधिक बरें वाटत होतें. वज्रेश्वरीची छोटीशी टेंकडी, तेथून जवळपास दिसणारे लहान-लहान डोंगर, जवळून जाणारी पण फारच थोडें पाणी असणारी नदी, दूरवर पसरलेलीं शेतें, त्यांत संथपणानें रवंथ करणारीं गुरें – हा सर्व देखावा पाहून त्याला कितीतरी प्रसन्नता वाटे. आणि देवळाजवळच्या गच्चीसारख्या भागावर जेव्हां तो सायंकाळीं जाऊन बसे तेव्हां क्षितिजापर्यंतचें मनोहारी दृश्य पाहून त्याचें मन प्रफुल्लित होई. तेथल्या भोळ्या खेडवळांची निष्पाप मनोवृत्ति

बघून जितकें बरें वाटे तितकेंच पोटभर खायला न मिळाल्यामुळें येणाऱ्या-जाणाऱ्यांच्या मार्गे येऊन पैशाची भीक मागणाऱ्यांची त्याला कींव येई, कुंडांच्या कांठांवर बसून दिवसांतून दोन-तीनदां तो स्नान करी. शक्य तर चतुरा त्याच्याबरोबर असे. गरम पाण्यानें भरलेले तांबे बेफिकिरपणानें अंगावर ओतल्यावर त्याच्या मनांत अतिशय गोड विचार येऊं लागत. तासन् तास् कुंडांत डुबत बसतां आलें असतें तरी त्यानें केलें असतें तसें.

पण तें सारें समाधान वरवरचेंच ठरलें. त्याच्या मनाला आंतून लागलेला चटका मात्र त्यामुळें कमी होऊं शकला नाहीं. कारण ठाण्यास त्याची दीना असल्याचें त्याला माहित होतें. आणि ठाणें तेथून फार लांब नाहीं. मोटारनें लोक दररोज जात-येत असतात. इतकेंच नाहीं तर बैलगाडीनें देखील पांच-सहा सुशिक्षित मंडळी मौजेनें ठाण्याहून आल्याचीं त्यानें बघितलीं होतीं. आणि त्यामुळें दीनेच्या आपण किती जवळ आहों ह्याची जाणीव त्याला फार होऊं लागली. त्यांतच एकदां सकाळीं फिरायला गेला असतांना तो एका शेतांत बांधावर बसला असतां दूरवरून कुणीतरी खांद्यावर काठी टाकून येत असल्याचें त्याला दिसलें. तेथलाच एक कातोडी होता तो. जवळ येताच श्रीनें उगीचच त्याला विचारलें—

"काय ? कुठं निघाला ?"

"जुरुक काम हये."

"कुठं ?"

"ठाण्याला." तेथें थांबून त्यानें उत्तर दिलें.

"ठाण्याला ? – कोणाकडे रे ?"

"मंगलदादांच्याकड."

"कशाला रे ?"

"काम हये त्यांच्याकड."

श्रीनें अधिक आग्रह केला नाहीं. तो मंगलांकडे जात आहे, तिथें आपली दीना आहे, ती त्याला भेटेल, एवढ्यानेंच त्याला कातोड्याबद्दल हेवा वाटूं लागला. त्या भरांत त्यानें दुसरा प्रश्न विचारला—

"मंगलांना ओळखतोस तूं ?"

"हय. आख्खी दुनिया वळकते त्यांना ना !"

" नि त्या बाईंना पण ओळखतोस का ?"

" दीनाबाई म्हनतां व्हय ? आईसाऱ्याच वाटतात आमाना त्या."

म्हातारा लवकर निघून गेला. त्यानें उच्चारलेले शब्द मात्र श्रीच्या कान्नांत घुमत राहिले.

'दीना इथल्या कातकऱ्यांना आईसारखी वाटावी नि आपण तिला पत्नी म्हणून वागवण्याचं देखील नाकारलं. अज्ञानी म्हणून समजल्या जाणाऱ्या कातकऱ्यांत असणारी माणुसकी आपल्यासारख्या सुज्ञांत नसावी अं ?' ही जाणीव त्याच्या मनांत तरळून गेली.

तेव्हांपासून तो बराच बेचैन झाला. मुकाट्यानें जेवावें; पडावें, सकाळीं हिंडावें. चालत्या-बोलत्या यंत्राचेंच स्वरूप आलें होतें त्याला.

श्रीच्या मनांत उत्साह उत्पन्न करण्याचे नाना प्रयत्न चतुरेनें करून बघितले, पण त्याच्या मनांत तिच्या कृत्रिमतेबद्दलची चीड वाढतच गेली. दीनेविषयीं वाटेल त्या खोट्या-नाट्या गोष्टी तिनें आणखी-आणखी श्रीच्या कानांवर घालून पाहिल्या, पण त्याच्यावर त्यांचा कांहींच परिणाम होईना.

श्रीच्या स्वभावांत आपल्याबद्दल तिरस्कार उत्पन्न झाल्याचें पाहून चतुरेला साहजिकच माहेरची आठवण झाली. एकदा तर ती त्राग्यानें माहेरीं जायला निघालीहि होती. आणि तसें व्हायला कारण देखील विलक्षण झालें होतें.

नेहमींप्रमाणें श्री नदीच्या कांठावर दूर फिरायला गेला. तेथून जवळच बैलांची गाडी सोडून ठेवलेली होती. रावणानें सीता पळवून नेल्यावर तिला ज्या व्याकुलतेनें शोधायला रामचंद्रानें सुरुवात केली तसल्याच आतुरतेनें भेटेल त्याला त्यानें विचारावं– 'दीना भेटली का हो तुम्हांला ?' 'माझी दीना पाहिलीत का हो तुम्हीं कुठं ?' अन् कुणीं हो म्हटलें कीं त्याच्या तोंडून निघणारी दीनेबद्दलची स्तुति आधासलेल्या वृत्तीनें ऐकत राहावें असें त्याला अलिकडे झालें होतें.

गाडी पाहून त्याला वाटलें– मागच्याप्रमाणेंच ठाण्याहूनच कुणी मंडळी आली नसतील ना ?

तो उठून गाडीजवळ गेला.

गाडीजवळ कुणीच नसल्यानें तो थबकला.

इतक्यांत मागच्या बाजूनें कुणीं दरडावीत विचारलें–

" अहो, काय हवंय ? "

आवाज ओळखीसारखा भासल्यानें त्यानें हचकून मागें बघितलें. एक मध्यमशा वयाचा मुलगा त्याला तेथें दिसला. कोण जाणे कां त्याचे डोळे त्या मुलावर खिळून राहिले. आपलें अगदीं जवळचें कुणी भेटावें तसें झालें त्याला त्या मुलाला पाहून. त्याच्या दृष्टीस दृष्टि भिडवितांच त्याला शंका आली— शिशिर ? शंका येण्याचाच अवकाश, तिचें रूपांतर खात्रींतच झालें. 'शिशिरच तो.' दडपलेला पितृभाव उफाळून वर आला. वाटलें धांवत जाऊन उचलावें मुलाला. हात पुढें करीत कंपित स्वरानें त्यानें त्याला विचारलें—

" शिशिर, इकडे कुठं तूं ? "

" तुम्हांला काय करायचंय ! " शिशिरनें उसळून उत्तर दिलें.

" वेड्या, ओळखलं नाहींस मला ! "

" ओळखायचं काय ? माझे वडील तुम्ही. "

" मग ? माझ्याजवळ यायला लाजतोस ? ये, जवळ ये. किती दिवसांनीं भेटतो आहेस हा ! बोलायचंय मला तुझ्याशीं."

श्री तसाच पुढें गेला. पण शिशिर मात्र तितकाच मागें सरकला. आतां श्री आपल्याला पकडणार येऊन असें दिसून येतांच त्यानें एकदम चिडून म्हटलें—

" हं ! हात लावूं नका मला. माझ्या आईला नि मला मागं हाकलून लावलंत ना ? मग आतां कशाला येतां माझ्याशीं बोलायला ? "

" शिशिर ! शिशिर ! चूक केली मीं ! "

पण अंतःकरणापासून निघालेले श्रीचे उद्गार वाऱ्यावरच पसरले. कारण ते ऐकायला शिशिर उभा कुठें होता तिथें ?

शिशिरनें दाखविलेल्या तिरस्कारानें श्रीवर बसलेला आघात जितका कोमल होता तितकाच तो विदारक होता. शिशिरला घरीं आणण्याचा तो मागेंच प्रयत्न करणार होता त्या वेळीं शिशिरनें कसें अव्हेरलें असतें तें स्पष्ट झालें. शिशिरला — मुलाला — बापाचा कंटाळा कां आला ? अशी शिकवण दीनेनेंच का त्याला दिली असेल ? कीं स्वतःच त्याच्या ठायीं ती जागृत आली असेल ? ... श्रीच्या मनांत तरंग उठले.

श्रीकृष्ण चराचरांत दिसूं लागल्यानें कंसाची जी अवस्था झाली तीच प्रत्येक बाबतींत आपलीच चूक दिसूं लागल्यानें श्रीची होऊन गेली.

शिशिरचा राग न येतां उलट कौतुकच वाटलें त्याला त्याच्या स्वाभिमानाचें.

चतुरेला सांगून दोघांनीहि आनंद लुटावा म्हणून त्यानें तो सर्व वृत्तान्त चतुरेला सांगितला. पण परिणाम मात्र अगदींच उलट झाला. चतुरेला कौतुक न वाटतां संताप झाला तिच्या अंगाचा. तिनें जळजळीत आवाजांत म्हटलें—

" वडील माणसांची पर्वा नसलेल्या आईचा मुलगा तसाच निघणार ! ... प्रत्यक्ष वडिलांना असं उत्तर देतो नि असल्या उद्दाम मुलाचं कौतुक करतां तुम्ही ! मी जर त्या वेळीं तिथं असतें तर त्याचं थोबाडच रंगवून टाकलं असतं तिथल्या तिथं. ... ह्यापुढं तरी ध्यानांत ठेवा. पुन्हां केव्हां तो भेटला तर त्याच्याशीं लघळपणानं मुळींच बोलायला जाऊं नका."

श्रीला असें बजावण्याचें कारण अर्थात् निराळें होतें.

तिला भीति वाटत होती कीं शिशिरबद्दल कौतुकाची भावना जर श्रीच्या मनांत अशीच बळावत गेली तर कांही काळानं प्रेम वाटूं लागेल, तो घरीं येईल नि त्याच्या मागोमाग न जाणों दीनाहि पाऊल टाकूं पाहील.

पण चतुरेच्या बोलण्याचा परिणाम तिला हवा होता त्याहून निराळाच झाला.

चतुरेच्या लाडक्या मनीवर श्रीचें प्रेम कधींच नव्हतें. तिचा द्वेष मात्र तो करीत नसे एवढेंच. पण ज्या दिवशीं शिशिरबद्दल चतुरा वाटेल तसें बोलली त्या दिवशीं अगदीं क्षुल्लक कारणावरून त्यानें मांजरीला एवढा जोराचा फटका मारला कीं किती-तरी वेळ ती तळमळत पडली होती. मुलाला बोलल्याबद्दल श्रीनें सूडच घेतला जणूं !

चतुरेच्या मनाला ती गोष्ट चांगलीच लागली. तिनें मनाशीं म्हटलें— 'ह्यापुढं आपला मान या घरांत राहणें कठिण आहे. श्रीच्या प्रकृतीला जर कसलाच विकार झालेला नसता तर आपण ह्या क्षणीं माहेरीं निघून गेलों असतों.' संतापाच्या भरांत श्रीला ती म्हणालीहि—

" तुम्हांला जर असंच वागायचं असेल तर मी माहेरींच जातें कशी !"

बिचारीला वाटलं कीं श्री नको जाऊं म्हणेल, आर्जवी स्वरानं चौकशी करील. पण श्रीनें शांतपणोंन विचारलें—

" माझ्या हातून झालेल्या चुका सुधारण्याचा मीं यत्न केला तर तूं आड कां येतेस ? "

" कां ? तुमचं माझ्याशीं लग्न झालं आहे. माझ्याशिवाय इतर कोणत्याहि स्त्रीवर तुमचं लक्ष्य गेलेलं मला खपायचं नाहीं समजलं ! "

लग्नामुळें आपण किती पराधीन बनलों आहों हें ध्यानीं येतांच श्री सावध झाला.—एकदां लग्न केलं कीं मरेपर्यंत तें नाहींसं होत नाहीं; मग सुधारणा करण्याची गोष्ट दूरच. चतुरेचं बोलणं तरी काय खोटं आहे ? तिचा आपल्यावर हक्कच नाहीं का ? दीनेशीं झालेला विवाह अयशःस्वी झाल्यामुळं चतुरेशीं जाहीरपणानं लग्न लागलेलं आहे आपलं, मग दीनेचा विचार आपण केलेला तिला कसा खपेल ? दीनेची भेट घ्यावी, तिच्याशीं बोलावं असं आतां वाटूं लागलं. ते विचार चांगले असतील. पण दीनेच्या सुखदुःखाकडे दुर्लक्ष्य करून पूर्वीं जी तिची आपण अवस्था केली तशीच असल्या वागण्यानं आतां चतुरेची नाहीं का व्हायची ? ती देखील मोठी चूकच नाहीं का घडणार हातून ?

एकदां दीनेच्या बाबतींत होरपळून गेलेलें त्याचें मन खिन्न झालें. चतुरेच्या सरळ बोलण्यानें त्याच्या विचारांना अगदीं निराळी दिशा लागली, आणि कांहीं झालें तरी चतुरेबद्दल आपण अनास्था दाखवायची नाहीं असें ठरवलें त्यानें. पण दीनेच्या बाबतींत घडलेल्या अपराधाचें परिमार्जन केल्याखेरीज त्याला खरें समाधान लाभणें शक्य वाटेना.

एकसारखा विचार करून दीनेची मुक्तता करण्याचा मार्गच श्रीकांत शोधूं लागला.

# १

श्रीकांताला आपण कसे बोललों नि तेथून कशी धूम ठोकली ह्याबद्दलची सर्व हकीगत शिशिरनें दीनेला सांगितली तेव्हां तिनें त्याचें अभिमानानें चुंबन घेतलें. पण जेव्हां ती खोलींत एकटीच बसली तेव्हा मात्र तिचें मन संमिश्र भावनांनीं भरून गेलें. संताप नि दया, आपलेपणानें उद्भवणारी काळजी, सूडाच्या कल्पनेनें उचंबळूं पाहणारा तिरस्कार इत्यादि भावनांचे प्रवाह अंतरंगांत अति वेगानें फिरत आहेत असा तिला भास झाला.

श्रीकांत वज्रेश्वरीस आल्याचें समजतांच पहिला विचार तिच्या मनांत आला तो हा कीं आपला छळ अजून पुरा झाला नाहीं कीं काय ! मंगलांबरोबर पुष्कळ वेळां वज्रेश्वरीस जावं लागतं आपल्याला म्हणून तर श्रीकांत आले नसतील मुद्दाम तिथं ! आपणाला मिळेल त्या मार्गानं त्रास देण्याचं आजपर्यंत केलेलं काम अजूनहि पुढं चालवायचा का विचार आहे त्याचा !

आणि श्रीचें वर्तन तिच्या दृष्टीनें झालेंहि होतें तसेंच. घरांतून घालवल्यावर पैसे बंद करणें, सरलेची पाळत ठेवणें, तिच्याकरवीं प्रत्यक्ष अपमान करवणें या साऱ्या गोष्टी छळवादाच्याच द्योतक नव्हेत का ! नाहीं म्हणायला पैसे बंद केल्यावर कांहीं दिवसांनीं पुन्हां मनीऑर्डर पाठविली होती त्यानें एकदां. पण आतापर्यंत सारखा छळच चालू असतांना एकाएकीं प्रकट झालेल्या त्या उमाळ्याच्या मागें शुद्ध हेतुच असेल अशी खात्री कोणाला झाली तरी सहजासहजीं कशी पटावी ! दीनेनेंसुद्धां ती मनीऑर्डर परत केली ती स्वाभिमानाबरोबरच तिच्या पाठीमागील हेतूविषयींच्या शंकेमुळेंहि नसेल का !

पण त्याहि विचारानें थोड्याच वेळांत उलट खाल्ली.

श्रीचा मूळचा स्वभाव तिच्यापुढें उभा राहिला. श्रीनें मनिऑर्डरच्या फॉर्मवर लिहिलेला खासगी मजकूर तिला आठवला. श्रीच्या आईच्या मृत्यूमुळें त्याच्या बदललेल्या परिस्थितीची कल्पनाहि तिच्या ध्यानांत आली; आणि तिला वाटूं लागलें— ' केवळ मला त्रास द्यायचा हेतु नसेलहि

त्यांचा. ते जात्या वाईट नाहींत. झालेल्या चुकांबद्दल पश्चात्तापहि होत असेल त्यांना. ... '

पण विचारानें अशी उलट खाल्ली तरी तिच्या मनानें कांहीं उलट खाल्ली नाहीं. श्रीविषयीं सहानुभूतिपर विचार मनांत येऊनहि ती आपल्याशीं म्हणाली— ' पण आतां काय उपयोग ! वेळ निघून गेली. श्रीकांताकडे परत जाण्याची कल्पना देखील मनांत येणार नाहीं माझ्या. मग ते कितीहि हळहळोत नि कशाहि प्रकारानीं मला विचारोत ! ! '

कांहीं झालें तरी श्रीकांतापासून स्वतःला दूरच ठेवण्याच्या निश्चयावर ती आली तेव्हां त्याच्याविषयींचा तिच्या मनांतला तिरस्कारहि बराच मंदावला आणि क्षीण स्वरूपांत कां होईना पण दया त्याच्या जोडीनें वाढूं लागली.

खरोखर श्रीबद्दलचा दीनेच्या मनांतला आदर अजिबात नाहींसा झाला असें कधींच नव्हतें. इतकेंच नाहीं तर थोडासा आपलेपणाहि आंतल्या आंत त्याच्याविषयीं तिला वाटे. त्यामुळेंच श्रीकांत प्रकृतीच्या निमित्तानें वज्रेश्वरीस येऊन राहिला आहे असें मंगलांकडून कळल्यावर तिला किंचित् काळजीहि वाटूं लागली. मंगल जेव्हां-जेव्हां वज्रेश्वरीस जात तेव्हां-तेव्हा त्यांनीं श्रीकांताबद्दल चौकशी करावी असें दीनेनेंच सुचविलें होतें. आणि त्याप्रमाणें मंगल प्रत्यक्ष त्याच्या घरीं न गेले तरी निरनिराळ्या मार्गांनीं त्याची चौकशी वरचेवर करीतहि असत.

मंगलांना श्रीकांताच्या प्रत्यक्ष घरीं न जाण्यालासुद्धां कारण झालें होतें. श्रीकांताची तब्येत कशी आहे ती बघावी म्हणून प्रथम मंगल एकदा त्याच्या बिऱ्हाडीं गेले. दाराशीं जाताच हातांत मांजरीला घेऊन चतुरा पुढें आली.

" कोण पाहिजे आपल्याला ? " तिनें प्रश्न केला. मनीनें म्यॉव करून तिची साथ केली.

" श्रीकांताची भेट घ्यायची आहे मला. "

" कां बरं ? "

" उगीच. "

" नांव काय आपलं ? "

" माझं नांव ? डॉ. मंगल. "

तें ऐकतांच चतुरेच्या हातांतली मांजरी चटकन् खालीं पडली. मोठाले डोळे करून चतुरेनें दार अर्धवट बंद करीत उत्तर दिलें–

" तुमचं काम नाहीं इथं कांहीं. आलांत तसे जा पाहूं ! दीनेकडून आलां असाल चौकशी करायला ! परत जा नि तिच्या कानांत सांगा कीं किती नवस केलेस तरी त्यांच्या प्रकृतीला कांऽहीं व्हायचं नाहीं ! "

अन् तिनें धाडकन् दार बंद करून कडी देखील घालून टाकली !

त्याच वेळीं पुन्हां श्रीकांताच्या घरीं न जाण्याचें मंगलांनीं ठरवलें होतें.

ही हकीगत मंगलांकडून कळली तेव्हांच चतुरा कोणत्या स्वभावाची बायको आहे ह्याची दीनेला कल्पना आली. ती श्रीला कशी तलवारीच्या धारेवर नाचवीत असेल ह्याविषयींच्या कल्पनांनीं दीनेला आपल्या वैवाहिक जीवनामधील जखमांवर कुणी तरी फुंकर घालीत असल्यासारखें वाटलें.

त्यानंतर वज्रेश्वरीस जायचें दीना टाळूं लागली.

मंगलांनींहि अलिकडे दीनेला बरोबर येण्याचा आग्रह करण्याचें सोडून दिलें. दुसऱ्या एका दृष्टीनेंहि त्यांना तें इष्टच होतें. तितकाच आपला सहवास तिला कमी घडून आपल्याबद्दलचे विचार तिच्या मनांत कमी यायला लागतील अन् तिच्या मनाला शांतता मिळेल असें त्यांना वाटलें. कारण दीना आपल्याशीं वागूं इच्छीत आहे त्या नात्यानें आपण तिच्याशीं वागूं शकत नाहीं व त्यामुळें तिच्या मनाला त्रास होत आहे हें ते जाणून होते.

दीना वर-वर जरी जायचें नाहीं असें म्हणत होती तरी आंतल्या आंत मात्र तिला असें वाटत होतें कीं मंगलांनीं बरोबर येण्याबद्दल आग्रह करावा, नि आपण नाहीं म्हणावें !

मंगल तसें कांहीं करीत नाहींतसें पाहून तिला अर्थातच विषाद वाटला.

एकदां मंगल बाहेर जात असलेले पाहून तिनें त्यांना विचारलें–

" मंगल, वज्रेश्वरीस जातां ? "

" हो. "

" काल तर जाऊन आलांत ना ? "

" मग ? "

" एवढ्यांत काय दुसरं काम निघालं ? साधू जाऊन बसलाच आहे, नि आज तुम्ही पण निघालां ? काम तरी काय आहे एवढं ? "

"तसंच आहे विशेष. तुला सांगण्यासारखं नाहीं."

"मला न सांगण्यासारखं?" दीनेनें मुद्दाम तोच प्रश्न केला. आपल्याला न सांगण्यासारखी एकहि गोष्ट मंगलांजवळ नाहीं असा तिला अभिमान वाटूं लागला होता त्याला आतां धक्काच बसला व मंगलांबद्दल कांहींसें तिचें मन गढूळ झालें. मनाला मोकळें ठेवायचें नाहीं म्हणून स्वतःच ती रुग्णालयांत नर्सिंगचें काम करूं लागली.

मंगलांनीं दिलेलें उत्तर खोटें मुळींच नव्हतें.

दोन-चार दिवसांपूर्वी साधू वज्रेश्वरीला कुणा कातोड्याकडे गेला नि आजारी पडला. मंगलांना तें कळतांच ते जाऊन त्याला तपासूनहि आले. विषमज्वर असावा असें दिसलें. तापाचें प्रमाणहि बरेंच होतें. नंतर दुसऱ्या कातोड्यांशीं त्यांचें बोलणें झालें तेव्हां मंगलांची खात्रीच झाली. आसपासच्या खेड्यांतून विषमज्वराची सांथ फैलावूं लागल्याचें समजतांच त्यांचा गोंधळ उडाला. 'गरीब प्राणी औषधाविना मरतील. आपल्या रुग्णालयांत सोय नाहीं का करता येणार? दीनेच्या मदतीनें कांहींना वांचवूं शकणार नाहीं का आपण?'

विचारांतीं विषमज्वराच्या रोग्यांना आश्रमाच्या रुग्णालयांत नेण्याचें ठरवून त्यांना आणण्यासाठींच ते आज निघाले होते. 'दीनेला ही वस्तुस्थिति सांगितली तर तिला श्रीकांताबद्दल चिंता लागून राहील. उद्यांची काळजी आजच कशाला ओढवून घ्या? रोगी दवाखान्यांत आले कीं तिला समजेलच सारं.'

ह्या विचारानेंच त्यांनीं दीनेला आपल्या जाण्याचें कारण सांगण्याचें टाळलें होतें.

साधूच्या मागोमाग कितीतरी कातकरी दवाखान्यांत आले.

दीना अस्वस्थ झाली. 'श्रीकांत अद्याप वज्रेश्वरीसच असतील का? सांथीची बातमी त्यांना कळली असेल का?' किती-तरी वाईट कल्पनांनीं तिच्या डोळ्यांपुढें काळोख पसरूं लागला.

साधूचा ताप विषमज्वरच ठरला. तो अत्यवस्थ असतांना त्यानें मागितलेला वाटेल तो पदार्थ जर त्याच्यावरील प्रेमामुळें गोदूनें त्याला खायला दिला नसता तर तो खचित तापाला बळी पडता ना. पण ...

साधूच्या बरोबरचे कातकरी सुधारूं लागले. दीनेबद्दल त्यांच्या मनांत असलेला आदर तिनें केलेल्या शुश्रूषेमुळें दुणावला.

वज्रेश्वरीहून कातकऱ्यांच्या संघटनेचें काम उरकून येतांना कुणी विषम-ज्वरानें आजारी असल्याची बातमी लागतांच त्याला घेऊन मंगल परत येत. तिथेंच कांहीं औषध देऊन भागण्यासारखें असेल तर ते तसें करीत. दीनेचा सारा वेळ शुश्रूषा करण्यांत जाई.

रुग्णालयांतल्या कातकऱ्यांशीं बोलतांना निरनिराळ्या गमती ऐकायला मिळून दीनेची करमणूक होई तेव्हढीच विश्रांति तिला मिळे.

ज्यांना कधींदेखील दारिद्र्यामुळें औषध घेण्याचें शक्य झालें नाहीं ते कातोडी रुग्णालयांतली टापटीप पाहून चकित होऊन जात. शुभ्र पातळ नेसलेली दीना इकडून तिकडे हिंडूं लागलेली पाहतांना ही कुणी देवता तर आपल्याला वांचवायला इथं आली नाहीं ना असें त्यांना वाटे. ठरलेल्या वेळीं तापनळी जेव्हां ती त्यांना लावूं लागे तेव्हां प्रत्येकाची दृष्टि कृतज्ञतेच्या आंसवांनीं भरून राहिल्याप्रमाणें दीनेला दिसे. औषध देतांना त्याचा कडू-पणा कमी जाणवावा म्हणून दीना उगीचच त्यांच्याजवळ दोन गोड शब्द बोले तेव्हा त्यांना किती समाधान होई !

स्वतःपलीकडचें जग निराळ्या स्वरूपांत दीना बघत होती.

आणि मंगलांनीं जो बिकट प्रश्न तिच्यापुढें उभा केला तो केला नसता तर ती कितीतरी काळ तशीच त्या जगांत रमत राहिली असती.

मंगल त्या दिवशीं वज्रेश्वरीहून आले ते काळजींतच.

रात्र होईपर्यंत ते कांहीं बोलले नाहींत कुणाजवळ. दीनेनें किती तरी वेळ विचारलें तरी ते कांहीं सांगेनात. पण दीनेनें बराच आग्रह केल्यावर तिला सांगितल्याखेरीज गत्यंतर नाहीं हें जाणून ते म्हणाले—

" श्रीकांतांना दोन दिवस ताप येतो आहे."

" खरंच ? " तिला वाटणारी भीति मुद्रेवर पसरली.

" आतां प्रश्न असा आहे कीं त्यांना इथं आणायचं कसं ? आणण्या-साठीं घरीं गेलों तर त्यांची बायको काय म्हणेल ? "

दोघांनीं कितीतरी विचार केला, पण श्रीकां तेथें कसें आणावें त्याचा मार्ग त्यांना बराच वेळ सुचेना.

गाडीवर पडल्या-पडल्या श्रीकांतहि निराळ्याच कांहीं विचारात गढून ाला होता.

तापानें श्रीकांताला बरीच अशक्तता आली होती. उन्हाळ्यांच्या ांघोळींनीं त्याच्या अंगावर जो तजेला दिसूं लागला होता तो जाऊन काळ- ंडल्यासारखें झालें तें. तेथल्या खेडवळ डॉक्टरकडून चतुरेनें कांहीं उपाय रून पाहिले, पण ताप निघण्याचें चिन्ह दिसेना.

चतुरेजवळ डॉक्टरांनीं श्रीचा ताप विषमज्वराचा असल्याचें उघड सांगि- लें. त्यांनीं तिला स्पष्टच सांगितलें कीं ' इथं राहण्यापेक्षां डॉ. मंगलाच्या ग्णालयांत ताबडतोब घेऊन जा. डॉक्टरना असंहि सांगा कीं नर्सिंग दीना- ाईनींच करायला पाहिजे ! तरच श्रीला धास्ती बाळगण्याचं कारण नाहीं.'

श्रीनें तें ऐकून काकुळतीनें म्हटलें–

" डॉक्टर, एवढंच करायला सांगूं नका ! "

" का बरं श्रीकांत ? "

" तुम्हांला नाहीं समजायचं तें. "

पण डॉक्टरांनीं श्रीचें बोलणें थट्टेवारी नेऊन स्वतःच डॉ. मंगलांना वेचारण्याचें ठरविलें.

आणि मंगलाना काळजींत टाकणारा तो प्रश्न त्या स्थानिक डॉक्टरांच्या ारां श्री रुग्णालयात येण्याचें नक्की होताच अचानक सुटला.

\+ + +

उद्यां पहाटे मोटारींतून श्रीकांत जाणार होता. आतांपर्यंत जिचा आपण यानीं-मनीं द्वेष केला तिच्याकडे श्रीकात जाणार ही कल्पना चतुरेला अति- ायच झोंबली. पण तिच्या हातांत परिस्थिति राहिली होती कोठें ? विचार र-करून कांहीं सुचेना तेव्हां श्रीला तिनें विचारलें–

" मीं प्रश्न विचारूं का एक ? "

" हं." श्रीनें डोळे उघडून म्हटलें.

" उद्यां दीनेकडे जाणार तुम्ही ? "

" हो."

" दीनेला माहेरीं टाकल्यानं माझी जरूरी तुम्हांला भासली. खरं ना ? "

" म्हणजे ? "

" आतां दीना तुमच्याजवळ परत आली कीं माझी जरुरी संपली असं तर नाहीं ना होणार ? "

" दोन्ही गोष्टी अशक्य आहेत." किंचित् विचार करून श्री उत्तरला. " दीना माझी होण्याएवढी लहान राहिलेली नाहीं."

" एवढंच नाहीं. मला तर असं वाटतं कीं इतरांची शुश्रूषा ती करीत असली तरी तुमची तशी ती करणार नाहीं."

" कांहीं व्हायचं असलं तरी मला तिथं गेलंच पाहिजे - जगायचं असलं तरी नि ... "

चतुरेनें श्रीकांताच्या तोंडावर हात ठेवून त्याला पुढें बोलूं दिलें नाहीं.

पण श्रीच्या डोळ्यांतून घळणारे अश्रू मात्र ती थांबवूं शकेना.

श्रीच्या मनांत खरोखरच विचार येऊन गेला कीं ' पूर्वींचे प्रसंग आठवून दीना आपल्याशीं हृदयहीनतेनं नाहीं ना वागणार ? आपण तिच्या आजारांत केलेली शुश्रूषा ती विसरली असेल का ? '

किती-तरी जुने प्रसंग मिटल्या डोळ्यांपुढें दिसूं लागले त्याच्या :

– आजारांत दीनेनं ताजीं फळं आणायला सांगितलीं. दीनेच्यासाठीं पैसा खर्च होणं म्हणजे पैसा पाण्यांत जाणं ही आपली समजूत ! सुकलेलीं मुसुंबीं घेऊन आलों नि तिच्यापुढं आदळलीं ! तिनं एकहि फळ खाल्लं नाहीं. त्यामुळंहि आपला संताप झाला. वाटेल तसं आपण बोललों तिला. ती शांतपणानं उत्तरली–

" चूक झाली. पुन्हां नाहीं बरं मुसुंबीं आणायला सांगणार ! कशाला तुमचे पैसे फुकट घालवूं ? "

आणि खरोखरच पुढं तिनं कधीं फळं आणायला सांगितलीं नाहींत.–

– एकदां तिची छाती शेकायची होती. रबराची पिशवी आणण्याची दोन दिवस आठवण राहिली नाहीं. नंतरहि तिनं विचारावं नि आपण 'विसरलों' म्हणावं ! कितीतरी दिवसांनीं पिशवी आल्यावर ' शेकायला बसतां का जरा ' म्हणून विचारतांच कांहींतरी निमित्तानं निघून गेलों. परत आल्यावर रडून-रडून दमल्यानं दीना झोंपली असल्याचं आढळलं. पिशवी जागच्या जागीं थंड होऊन पडली होती. जागी झाल्यावर दीना म्हणाली–

" पुन्हां नाहीं हं शेकायला सांगणार. बायकोसाठीं उगीच त्रास कां घ्यायचा ? "–

—बरेच दिवसांत अंग न धुतल्यामुळं चिकचिकल्यासारखं वाटून ‘साबूच्या पाण्यानं माझं अंग पुसून काढतां का जरा’ म्हणून तिनं विनविलं. आपण टाळाटाळी चालवली. आपल्याला कमीपणा वाटत असल्याचं ध्यानांत येतांच तिनं डोळे मिटून म्हटलं— “बरं तर. नको हं अंग पुसायला.... निजतें मी तशीच !”—

आईच्या वर्चस्वाखालीं दडपून गेल्यानं आपण असे वागत होतों. आपण दीनेची सेवा करीत असल्याचं दिसतांच आईला खपत नसे तें. पण हें सारं खरं असलं तरी त्यामुळं वागणुकींतला दुष्टपणा कमी कसा होणार ?

दीनेच्या मनांत त्या साऱ्या आठवणी ताजेपणानं उभ्या राहतील नि मग ती आपली शुश्रूषा नीटपणानं करूं तरी शकेल का ?

आणि खरोखरच तिनं शुश्रूषा नीटपणानं न केली तर ?—

त्याला अनेक दृश्यें दिसूं लागलीं.

—पलंगावर तापाच्या भरांत निःशक्त होऊन आपण पडलेले आहों. जवळचा ग्लास रिकामा केला तरी तहान भागेना. दीना दूरच्या टेबला-जवळ पुस्तक वाचत बसली होती. किती-तरी हांका मारल्यावर तिनं त्रासिक आवाजात जवळ येऊन म्हटलं— “माझ्या घरांत पाणी सुद्धां मिळणार नाहीं तुला असं मला म्हणणाऱ्या आईचेच तुम्ही चिरंजीव ना ?... कशाला आलांत इथं ? पडा तडफडत.... मी नाहीं देत पाणी.”—

—डॉ. मंगलांनीं कसलंसं औषध देणं जरूर असल्याचं बजावलं. ठर-लेली वेळ निघून गेली तरी दीना औषध आणीत नाहींसं पाहून आपण आठवण केली. तोंच ‘मी आजारी असतांना वेळच्या वेळीं औषधं देण्याची काळजी केलीत का ? मग आतां मी कां घेऊं तुमच्याबद्दल काळाजी ?”—

—ताप फार वाढला. मस्तकावर बर्फ ठेवणं जरूर झालं. दीनेनं पिशवी भरून आणलीहि. पण मस्तकावर न ठेवतां ती समोर उभी राहून चमत्कारिक दृष्टीनं बघत विचारूं लागली— ‘माझं डोकं शांत राहावं म्हणून कधीं तरी श्रम घेत होतां का ? मी कां पिशवी डोक्यावर ठेवूं ? तुम्ही इनामदार ना ? बायकोची सेवा करायला कमीपणा वाटे तुम्हांला.... माझंहि स्थान आतां पूर्वीप्रमाणं राहिलेलं नाहीं. दुष्ट नवऱ्याची सेवा करायला मलासुद्धां कमीपणा कां वाटूं नये ?’

विचारांच्या ह्या विविध प्रवाहांमुळें मोटारमधून ठाण्यास जात असतांना त्यांचें मन अतिशय अस्वस्थ झालें होतें.

मोटार आली. मंगलांनीं इतरांच्या मदतीनें श्रीकांताला उचलून आंत नेऊन ठेवलें तरी तो शब्दहि बोलला नाहीं. तरी पण त्याच्या तोंडावर आपल्याबद्दल तिरस्कार आढळेल कीं काय अशी जी त्याना काळजी पडली होती ती मात्र साफ खोटी ठरली. उलट जेव्हां-जेव्हा मंगलांनीं त्यांच्याकडे बघितलें तेव्हां-तेव्हा त्याच्या दृष्टींत कृतज्ञताच आढळली. वाटेंत एकदांच मंगलांनीं विचारलें–

"त्रास नाहीं ना ॲम्ब्युलन्समध्यें होत ?"

"मला कसला त्रास वाटायचा ! उलट माझ्याकडूनच होतोय त्रास तुम्हांला !"

हें उत्तर ऐकून मंगलांना समाधान वाटलें. त्यांत चीड नव्हती. असमाधान तर नव्हतेंच नव्हतें.

जसजसें ठाणें जवळ येत चाललें तसतशी श्रीकांताच्या तोंडावर दुःखाची छाया पसरूं लागली. कांहीं तरी विचारावेंसें वाटत असूनहि तो मुद्दाम तसें विचारीत नाहीं असा मंगलांना संशय आला.

"श्रीकांत, आतां आमच्या ताब्यात आलांत तुम्ही. खरं ना ! बरं करायची जबाबदारी आमच्यावर आहे. मग आम्ही सांगूं तसं वागायचं. खरं कीं नाहीं ?

मानेनेंच श्रीनें होकार दिला.

"मग सांगा पाहूं तुमच्या मनांत कसला गोंधळ चाललाय ? काय विचारावंसं वाटतंय तुम्हांला ?"

श्रीकांतानें मंगलांकडे क्षणभर स्थिर दृष्टीनें पाहिलें. त्यांचा प्रश्न मनापासून विचारलेला आहे कीं नाहीं हेंच तो जणूं अजमावून बघत होता. नंतर कांहींतरी बोलण्याच्या इच्छेनें त्यानें तोंड उघडलें.... नि एकदम कसलीतरी जाणीव झाल्यानें त्यानें डोळे मिटले, आणि मान बाजूला वळवली. मिटलेल्या डोळ्यांतून अश्रू ओघळत असलेले दिसतांच मंगल किंचित् जवळ येऊन म्हणाले–

"श्रीकान्त, हें काय भलतंच ?"

नंतर मंगलांनीं कांहीं श्रीला विचारलें नाहीं, नि मोटार आश्रमाच्या आवारांत शिरेपर्यंत श्रीनेंहि डोळे उघडले नाहींत.

वाटेंत मात्र त्याचें मन अंतरंगांत चाललेल्या नि ह्या क्षणीं निकरास पोंचलेल्या संगरानें विव्हल झालें होतें. मिटल्या डोळयांपुढें दीना भेटतांच कशी राहील, कशी वागेल, काय बोलेल, यांसंबंधींचीं निरनिराळीं दृश्यें उभीं राहून त्याला लहान-मोठे धक्के देत होतीं.

आणि आश्रमाशीं मोटार उभी राहून मंगलांनीं दार उघडताच त्याच्या डोळ्यातून पाणी गळूं लागलें. जवळच्या रुमालाला डोळे पुसून त्यानें मनाची जणूं तयारी केली.

श्रीला स्ट्रेचरवरून आंत आणीत असतांना दीना बाजूला उभी राहून शांतपणानें बघत होती. श्रीच्या गालांचीं हाडें किती तरी वर आलेलीं, डोळे खोल जाऊन त्यांखालचा भाग काळा झालेला, पांघरुणाखालीं त्याचें शरीर आहे कीं नाहीं असा संशय येण्याएवढा कृश झालेला अशी श्रीकाताची स्थिति पाहताच तिच्या मनात अतिशय अनुकंपा उत्पन्न झाली.

श्रीकांत आश्रमांत आल्यावर परिचारिकेच्या निर्विकारपणानें वागायचें असें ठरवूनहि आयत्या वेळीं तसें साधलें नाहीं तिला.

श्रीला खाटेवर ठेवतांच ती चटकन् त्याच्याजवळ गेली, त्याच्या क्षीण झालेल्या शरीरावरून तिनें झरकन् दृष्टि फिरवली, अन् त्याच्या डोळ्यांत बघत असतांना तिच्या तिलाहि न कळत तिच्या तोंडांतून उद्गार निघाले—

" अयाई ! काय दशा झाली ही तुमची ! "

श्रीनें क्षणमात्र डोळे उघडून बघितल्यासारखें केलें. एवढ्यांत हें वाक्य कानांवर पडलें, नि त्यानें डोळे मिटले. दीनेनें दाखविलेल्या प्रेमळपणानें त्याचे डोळे जणूं दिपून गेले होते !

ज्या गोष्टीच्या त्याला सारख्या शंका येत होत्या त्यांपैकीं एकहि घडून न आल्यानें क्षणाक्षणाला समोरून जा-ये करणारी दीना थोर दिसूं लागली त्याला. इतक्या छळानंतरहि जी मनाचा तोल जाऊं देत नाहीं ती किती-किती असामान्य असेल बरं !

संध्याकाळीं दीना श्रीजवळ औषध द्यायला गेली. श्रीनें कांहींशा भीतीनें विचारलें— " दीना ! "

दीनेनें प्रेमळपणानें " काय पाहिजे तुम्हांला ? " म्हणतांच श्रीला बरें वाटलें. तो म्हणाला– " मला कांहीं बोलायचं नाहीं. तूं उत्तर देतेस का नाहीं तें पाह्यलं ! " अन् त्यानें डोळे मिटून घेतले. डोळयांपुढच्या काळोख्यांत दिसणारी दीना किती तेजःस्वी भासूं लागली त्याला !

नंतर श्रीचाहि बराच धीर चेपला. तरीपण एक शंका त्याच्या मनांत होतीच. म्हणून त्यानें दीनेला विचारलें–

" मी इथं आल्यामुळं तुला बरं वाटलं कीं वाईट वाटलं ? "

" कितीतरी बरं वाटलं. " चटकन् ती म्हणाली.

अन् श्रीच्या मनांत कितीतरी समाधानाच्या लाटा उसळूं लागल्या. दीनेच्याबद्दल त्याला अतिशय आनंद वाटला नि त्याचबरोबर आपण स्वतः किती क्षुद्र आहोंत ह्याचीहि जाणीव होऊं लागली.

चतुरेच्या मनांत मात्र अद्यापहि दीनेबद्दल भीति वाटत होती. ती आश्रमांत न राहतां सरलेकडे राह्यला गेली होती तरी श्रीकांताला पाहायला ती रुग्णालयांत येई त्या-त्या वेळीं त्याची व्यवस्था कशी ठेवली जाते आहे ह्याचें ती बारकाईनें निरीक्षण करी आणि मधून-मधून श्रीकांताजवळ हळू-हळू बोलून माहिती काढी. श्रीकांतानें दिलेलीं उत्तरें तिला इतकीं सरळ नि संशयातीत वाटत कीं दीनेकडून कधीं कांहीं अनास्था होत असेल अशी शंकाहि तिच्या मनांत येण्यास वाव मिळूं शकला नाहीं. विषमज्वराचा ताप ठराविक मुदतीनंतरच निघतो हें तिलाहि माहित होतें.

दीना आपलें शुश्रूषेचें काम मनापासून करीत होती.

श्रीच्या प्रकृतींत पहिले कांहीं दिवस चढ-उतार होत असला तरी अधिक कांहीं विकृति उद्भवली नाहीं.

पण नंतर प्रकृतीला तसाच आराम पडत जाण्याऐवजीं आजार एकाएकीं इतका उलटला कीं श्रीकांत ह्यांतून उठतो कीं नाहीं ह्याची शंका मंगलांना येऊं लागली. डोळ्यांत तेल घालून जपणूक चालू असतांना एकाएकीं प्रकृति उलटली कशी ? सुधारणेच्या आटोक्यांत आलेला आजार हाताबाहेर जायला काय घडून आलें ह्याचा विचार करीत किती तरी वेळ मंगल श्रीच्या म्लान चेहऱ्याकडे शोधक दृष्टीनें बघत राहिले.

—x—

# १०

रुग्णालयांत येऊन पडल्यापासून श्रीकांताचें लक्ष्य प्रामुख्यानें जर कशाकडे लागलें असेल तर तें दीनेच्या भावना जाणण्याकडे. आपल्याला ती ओळखहि देणार नाहीं नि आपल्याकडे बघितलें तरी ती तिरस्कारानेंच बघेल असें त्याला ठाण्यास येण्यापूर्वी जें वाटत होतें तें पहिल्या दिवशींच खोटें ठरलें. इतकेंच नाहीं तर दीना आपल्याकडे इतर रोग्यांहूनहि अधिक आपलेपणानें लक्ष्य देत आहे असें आढळून येतांच श्रीला स्वतःच्या कोत्या कल्पनाशक्तीची लाज वाटूं लागली. एवढ्या छळानंतरहि सूडबुद्धीचा किंचित्-हि भाव न दाखवतां ती आपल्याशीं बोलते हें दिसतांच स्वतःच्या दुष्ट वागणुकीचा त्याला रागहि आला.

निजल्या-निजल्या कां होईना दीनेच्या वागणुकीवर बारकाईनें तो लक्ष्य ठेवीत होता. दीना मंगलांशीं किती सलगीनें वागते, त्यांच्याशीं बोलतांना किती गोडव्या आवाजांत शब्द उच्चारते, नि त्यांनीं सांगितलेलें काम किती आत्मीयतेनें पार पाडते ! मंगल थोर म्हणून केवळ आज्ञापालनाच्या बुद्धीनेंच ती सारें करीत असावी असें मानणें त्याला बरोबर वाटलें नाहीं. ...त्याची हळहळू खात्री झाली कीं दीनेचें मंगलांवर निःसीम प्रेम आहे.

मंगल तिच्या प्रेमाचा स्वीकार करीत असल्याचें मात्र त्याला कधींहि आढळलें नाहीं. उलट दीना सलगीनें वागूं लागली कीं मंगल विषय बदलून तेला सावध करीत. एकदां मात्र श्रीला अनुभव निराळा आला. कांहींशा कारणावरून दीनेनें विनोद केला नि मोकळेपणानें मंगलांकडे लाडिक दृष्टीनें पाहत ती हंसली. त्याचें प्रतिबिंब मंगलांच्या मुखावरहि पडणार होतें. एवढ्यांत मंगलांची दृष्टि खाटेवर पडलेल्या श्रीकडे जाऊन ते सावध झाले. येऊं पाहणारें हास्य त्यांनीं दाबून टाकलें. तेव्हां श्रीला वाटलें— 'मनांत उसळूं पाहणाऱ्या भावना ते अशाच रीतीनें ताब्यांत ठेवीत असतात का ?'

जवळून कुणी नोकर गेला कीं श्री पडल्या-पडल्याच त्याच्याजवळ चौकशी करी– ' मंगल-दीना हीं कुठं आहेत ? काय बोलत आहेत ? कशीं बसलीं आहेत ?... ' एवढ्यानेंहि त्याचें समाधान बहुधा होत नसे आणि तो त्या नोकराला त्या दोघांविषयीं काय वाटतें तें जाणण्याचा यत्न करूं लागे.

स्वतःची लग्नाची बायको दुसऱ्याशीं सलगीनें बोलते, त्याच्यावर प्रेम करते, नि तें सारें कानांवर येऊन आदळतें अशा वेळीं कोण संतप्त होणार नाहीं ? श्रीकात पूर्वावस्थेंत असता तर नुसत्या संतापानेंहि भागलें नसतें. आईच्या मर्जीखातर अशा वेळीं दीनेला त्यानें झोडपलेंहि असतें ! पण आतां ?

भट्टींतून शुद्ध होऊन बाहेर निघालेल्या सोन्याच्या लगडींत जसा सोन्या-व्यतिरिक्त कसलाहि कण सांपडत नाहीं तसा श्रीच्या मनांत रागाच्या विका-राचा ह्या वेळीं मागमूसहि नव्हता. दीनेला माहेरीं पाठविल्यावर जीवनाच्या ज्या अवस्थेंतून त्याला जावें लागलें त्यामुळें त्याचें मन अंतर्मुख बनलें. रुग्णालयांत स्वतःच्या अपराधांची किती तरी बारकाईनें झडती घेण्यांत बराच वेळ घालविला त्यानें, आणि त्या अपराधांच्या अनुरोधानें दीनेच्या वागणुकीचा त्याला उलगडा होत चालला. दीना निरपराधी– निर्दोष– अस-ल्याचें त्याला पूर्ण पटलें. संतापाच्या ऐवजीं उलट त्याला आतां तिच्या-विषयीं सहानुभूतिच वाटूं लागली !

आपण जिवंत आहों म्हणून मंगलांना दीनेच्या प्रेमाचा स्वीकार करतां येत नाहीं हें श्रीकांताला आतां स्पष्ट दिसून आलें. त्याचें मन त्याला एक-सारखें विचारूं लागलें– ' तूं जीवंत नसतास तर ? '

' दीना मंगलांचीं पत्नी म्हणून इथं वावरतांना दिसली नसती का ? वासनांच्या अतृप्ततेमुळं त्यांच्या कार्यावर प्रसन्नतेचा उजळा आपल्याला पूर्णांशानं दिसत नाहीं तो दिसला नसता का ?... नि कदाचित् ह्याहूनहि अधिक लोकसेवा करण्याचा उत्साह त्यांच्यांत संचारला नसता का ? तूं आहेस – तूं जिवंत आहेस – म्हणून त्यांचा हा कोंडमारा होत आहे. ' त्यानें आपल्या मनाला उत्तरहि देऊन टाकलें !

दीनेला दरमहा जाणारी दहा रुपयांची रसद बंद करण्याच्या पूर्वी तो वकीलाकडे गेला असताना वकीलांनीं उच्चारलेले शब्द पन्हां त्याच्या कानांत

घुमूं लागले. ते म्हणाले होते— " श्रीकांत, कायदा पुरुषांनीं केलेला आहे हें विसरूं नका. ... तुमची बायको कुठंहि गेली तरी राजरोसपणानं कुणाची पत्नी म्हणून ती राहूं शकणार नाहीं. हिंदु स्त्रियांचं लग्न झालं कीं तें बंधन कसल्याहि प्रहारानं मोडलं जात नाहीं. ती कुठंहि असो, विवाहित म्हणूनच समजली जाते. मग प्रत्यक्ष नवरा जरी तिला ती आपली नाहीं असं समजत असला तरी फुकट!... तुम्ही निर्धास्त राहा. दहा रुपये बंद होऊनहि जेव्हां लग्नाला मोकळीक मिळत नाहींसं तिला समजेल तेव्हां डोळे उघडतील तिचे. " थोडें थांबून ते पुढें म्हणाले— " एक मार्ग मात्र मोकळा आहे तिला ... तो म्हणजे वेश्यावृत्तीचा ! ! "

वेश्यावृत्तीची कल्पना पुढें उभी राहतांच श्रीच्या मनाला एकदम कसें-सेंच वाटलें. मागें वकीलानें ती गोष्ट सांगितली तेव्हांहि त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला होता, पण तेव्हा आईच्या धाकानें त्याला निमूटपणें सारें ऐकून घ्यावें लागलें होतें.

' आपण जिवंत असल्यावर दीनेला मोकळा उरणारा मार्ग एकच, नि तोहि असा किळसवाणा ! — मग तिची ह्यांतून सुटका कशी व्हावी ? आपल्याला नाहीं का करतां येणार त्यासाठीं कांहीं ? ' पण मनांतल्या ह्या खळबळीनें जेवढा त्याच्या प्रकृतीवर परिणाम झाला नाहीं तेवढा त्या रात्रीं घडलेल्या प्रसंगानें झाला.

मंगल ताप बघून गेले. शेजारीं निजलेल्या रोग्यांचें कण्हणें चालू होतें. पाण्याच्या ग्लासांचा आवाज मधूनच येत होता. निळसर दिव्यांच्या मंद प्रकाशांत पांढरें पातळ नेसलेली नर्स इकडून तिकडे करीत होती.

श्रीचें लक्ष्य मात्र दीना केव्हां येते ह्याकडे लागून होतें. कारण आज दुपारींच दीनेला त्यानें विचारलें होतें—

" आज रात्रपाळीवर तूं नाहींस ना ? "

" नाहीं. कां बरं ? "

" काय करणार आहेस त्या वेळीं ? "

" कांहीं नाहीं. "

" मग इथं येशील का थोडा वेळ ? "

" कशासाठीं ? "

"महत्त्वाचं काम आहे तुझ्याजवळ."

"माझ्याशीं काम ?" दीनेनें संशयानें त्याच्या डोळ्यांत बघितलें. त्यांत चीड नव्हती : संताप नव्हता : स्वतःच्या चुकीची कबुली देऊन त्यासाठीं प्रायश्चित्त घेतलेल्या मनुष्याची विशुद्धता दिसली तिला तेथें. म्हणून तिनें रात्रीं येण्याचें कबूल केलें.

त्याप्रमाणें तिची वेळ होत आली तसा श्री वाट बघूं लागला.

आणि लवकरच दीना येऊन शेजारच्या स्टूलावर बसलीहि. तिनें म्हटलें—

"फार वेळ नाहीं ना घेणार ?"

"कां ? जायचंय या वेळीं कुठं ?"

"छे छे ! पण तुम्हांला सोसणार नाहीं जागं राहणं."

आपल्याविषयीं दीनेला वाटत असलेली काळजी पाहून श्रीला अधिकच विव्हलता आली. अंगावरचें पांघरूण अधिक वर ओढून त्याच्या टोंकाला डोळे पुसल्याप्रमाणें त्यानें केलें.

"दीना, मला खूप बोलायचं आहे तुझ्याजवळ."

"माझ्याजवळ ?"

"हो. आश्चर्यानं पाहूं नकोस. तुझं तोंड बघायचं नाहीं असं सांगणारा निर्दय श्रीकांतच तुला हें म्हणत आहे. तुझ्या कर्तृत्वानं भरलेल्या इथल्या प्रत्येक वस्तूला पाहून मला वाटूं लागलंय कीं सारं-सारं सांगून टाकावं."

दीनेनें मध्येंच बोलायचा यत्न केला. पण श्रीनें तिला अडवलें—

"थांब, मला बोलूं दे. ठाण्याला येतांना मला किती भय वाटत होतं तूं ओळख तरी देशील कीं नाहीं ! बघशील किती संतापानं ! ... किती किती कल्पना येऊन गेल्या मनांत. पण त्यांतलं कांहीं झालं नाहीं. आल्याबरोबर प्रेमानं बघितलंस माझ्याकडे. किती बरं वाटलं मनाला !"

वज्रेश्वरीस घडलेल्या कांहीं हकीगती सांगून तो म्हणाला—

"आतां बोलायचंय तें स्वतःच्या अपराधाबद्दल. आईच्या वर्चःस्वाखालीं मान सांपडल्यामुळं तुझ्या भावना मीं चुरगळून टाकल्या. दीना ! मला तेव्हां समजत होतं, पण उमजत नव्हतं ग ! आतां सारं स्पष्ट झालं मला. खरोखरच झाडावरचं ताजं फूल कुस्करून त्याच्या पाकळ्या उडवून द्याव्यात दूरवर तसंच झालं माझ्याकडून !"

तो किंचित् थांबला. चटकन् सुरुवात करवेना त्याला.

"त्या काळांत घडलेला लहान-मोठा प्रसंग डोळ्यांपुढं उभा राहतो नि मला बजावूं लागतो– ' श्री, तूंच निर्दय बनलास नि दीनेला वादळांत ढकलून दिलंस ! ' नशीब माझं कीं मंगलांचा सहवास तुला लाभला नि आयुष्याला अधिक चागलं वळण लावून घेणं शक्य झालं. माझे सारेच अपराध एवढे मोठे आहेत कीं कांहींतरी मोठी शिक्षा भोगल्याशिवाय माझ्या आत्म्याला समाधान वाटणार नाहीं. कोणती शिक्षा करून घेऊं मी ? "

दीना त्याच्या खिन्न सजल नेत्राकडे स्थिरतेनें बघत होती.

" नको. पण तें तुला विचारून तुला त्रास देणं बरं नाहीं. ज्या संसारसुखाला मीं तुला पारखं केलं तें फिरून तुला मिळवून दिलं कीं माझी चूक सुधारली असं होईल ना ? "

" कुस्करून टाकलेल्या पाकळ्या गोळा करून जुळवल्या तरी पुन्हां त्यांचं फूल बनत नाहीं ! "

" अगदीं खरं. तडकलेली कांच सांधण्याएवढंच तें अशक्य. पण जुनी कांच सांधण्यापेक्षां ती अजिबात फोडली तर दुसरी तरी बसवता येईल नाहीं का ? "

दीना दचकल्यासारखी वाटतांच त्यानें धीर दिला. " घाबरूं नकोस. तुला कबूल करणं जड जात असलं तरी मला तें कळून चुकलं आहे. ... अन् खरोखर तुझं मंगलांवर प्रेम जडलं असलं तरी त्यांत अनैसर्गिक काय आहे ? "

दीनेनें जरा थांबून विचारलें–

" मग काय म्हणायचंय तुम्हांला ? "

" तुमचं दोघांचं लग्न झालं असतं तर किती बरं झालं असतं असा विचार मनांत येऊं लागतो नि झाल्या गोष्टींबद्दल अधिकच दुःख होतं. मौल्यवान् हिरकणी अस्थानीं पडल्यानं मातीमोल झाली हेंच खरं ! "

' पूर्वींचे ते कठोर श्रीकांत ते हेच का ? ' अशा संदेही दृष्टीनें दीना त्याच्याकडे बघूं लागली.

" पण तुझं लग्न मंगलांशीं झालं नाहीं, नि आजच्या स्थितींत होणं देखील कायद्याला रुचणार नाहीं. त्याला एकच मार्ग मोकळा आहे. तो

म्हणजे एकदम ती स्थिति बदलणें हाच. त्याच मार्गानं मी जाणार आहें. तुला एवढंच सांगायचं कीं तूं मला अडवूं नकोस. सरळ-सरळ...तिकडे ...तिकडे जाऊं दे मला."

"कुठं जाणार तुम्ही ?" कंपित स्वरानें दीनेनें विचारलें.

"दूर ! ... जिथून पुन्हां या जगांत यावं लागणार नाहीं तिथं ! ... मृत्यूकडे !"

सांगायचें होतें तें सांगून झाल्यामुळें श्रीला एकदम थकवा आला. मिटल्या डोळ्यांतून पटकन् आंसवें ओघळलीं.

दीनेला श्रीच्या उत्तरानें धक्काच बसला !

"असं काय बोलता कांहींतरी ?"

"खरं-खरं सांगतों आहें मी. मीं मेलों कीं मंगलांशीं पुनर्विवाह करणं शक्य होइल. ...मला तुझं कांहीं ऐकायचं नाहीं. ... मला कसलं औषध घ्यायचं नाहीं. ... माझ्या सुखापायीं जसं तूं दुःख भोगलंस तसं पुन्हां एकदां कर. ... मरायला मी तयार झालों तो जिवाला कंटाळल्या-मुळं नाहीं; पण तुला सुखी करून मनाचं समाधान करावं म्हणून. ... जा ... जा आतां."

"असं काय हें ! किती विचित्र आहे तुमचं बोलणं ! मी खरं-खरं सांगतें. मनांत कसल्या देखील गोष्टी आणूं नका तुम्ही. सारे तुमचे अपराध विसरून गेलें आहें मी ! तुम्ही बरे झालांत म्हणजे मला देखील आनंदच होईल."

हें वाक्य बोलतांना दीनेच्या तोंडावर जें निरागस तेज श्रीला दिसलें त्यानें त्याचे डोळे अधिक दिपून गेले. डोळे मिटूनहि त्याच्याच्यानें राहवेना. उचंबळून येणाऱ्या भावनांना त्यानें वाट दिली.

"दीना ! किती थोर हृदय आहे तुझं !"

आणि त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. दीनेला गहिंवरून आलें. श्रीकांताच्या कपाळावर आलेले केंस मार्गे करीत त्याच्या मस्तकावर हलुवार-पणानें थोपटल्यासारखें केलें तिनें, अन् जातांना म्हणाली—

"शांतपणानं निजायचं आतां हं !"

काळोखांतून ती दृष्टिपार होईपर्यंत श्री सजल दृष्टीनें बघत राहिला.

आयुष्याला कंटाळलेला रोगी रुग्णालयांत आला कीं आत्महत्येचे विचार त्याच्या डोक्यांत घोळूं लागतात. कडक नजर ठेवावी लागते त्याच्या हालचालीवर. म्हणूनच श्रीबद्दल दीनेनें रात्रपाळीच्या परिचारिकेला इषारा देऊन ठेवला, आणि श्रींनीं सांगितलें तरी त्यांना कांहीं आणून न देण्याबद्दल तेथल्या नोकरांना तिनें बजावून ठेवलें.

पण ! –

श्रीनें धूर्तपणानें सर्व तयारी दुपारींच करून ठेवली होती.

विषमज्वरानें अशक्त झालेल्या स्थितींत अन्नाचा कण देखील मनुष्याचा बळी घेण्यास समर्थ असतो हें खात्रीपूर्वक माहित असल्यानें श्रीनें दुपारींच कांहीं पदार्थ बाजारांतून आणवला होता. तें विष नव्हतें. तो साधा खाण्याचा पदार्थच असल्यामुळें कुणालाच कसला संशय आला नाहीं. तोच पदार्थ दीना दृष्टिआड होतांच डोक्यावर पांघरूण घेऊन श्रीनें हलकेंच खाऊन टाकला !

खाणें संपतांच किती विचित्र हास्य पसरलें त्याच्या तोंडावर !

नि कांहीं तासांनीं जेव्हां उतरलेला ताप पुन्हा बराच चढूं लागला तेव्हा त्याला समाधान वाटूं लागलें. ' आपली युक्ति सफल झाली. थोड्याच दिवसांत मृत्यूच्या आधीन आपण होणार अन् दीनेच्या संबंधांत घडलेल्या अन्यायांवर प्रहार केल्यासारखं होणार ! '

दुसऱ्या दिवशीं मंगल तपासायला आले तेव्हां श्रीच्या अंगांत बराच ताप चढला असल्याचें त्यांना आढळलें. पण तशाहि स्थितींत तो आनंदांत दिसला. दीनेनें रात्रीचें बोलणें मंगलांना सांगितलें असल्यामुळें ते संशयानें त्याच्या आनंदितपणाचें पृथक्करण करूं लागले.

" श्रीकांत, एवढ्या तापांत आनंद कसा तुमच्या तोंडावर ? "

" हवं तें घडून येणार म्हणून ! "

" श्रीकांत ! " मंगलांनीं डोळे मोठाले करून म्हटलें.

श्रीकांत हंसूं लागला.

" श्रीकात ? खरं सांगा. काय ह्या बोलण्याचा अर्थ ? "

" कांहीं नाहीं. नकोशा झालेल्या ह्या जगांतून लवकरच सुटायला सांपडणार आतां."

" कोणीं सांगितलं तुम्हांला हें श्रीकांत ? "

" कोणीं सांगायला नको. मीं आपणच तशी व्यवस्था केली आहे. "

दीनेनें नर्सजवळ चौकशी करून कांहीं समजेना. मंगलांनीं सर्व गोष्टींचा तपास करतां त्यांना दिसून आलें कीं श्रीनें कांहीं तरी खाऊन आजार उलटवून घेतला आहे. इतक्यांत औषधाची वेळ झाली म्हणून नर्स औषध घेऊन आली. पण तेंहि घेण्याचें श्रीनें नाकारलें. सर्वांनीं परोपरीनें सांगूनहि उपयोग होईना. मंगल श्रीच्या अगदीं जवळ जाऊन त्याला प्रेमळपणानें म्हणाले—

" श्री, माणसांनीं स्वतःसाठींच का जगायचं असतं ? आयुष्य काय स्वतःच्याच फायद्यासाठीं आहे कीं त्यानं वाटेल तेव्हां मृत्यूला कवटाळावं ? श्री, तुम्हांला असं सांगावंसं वाटतं कीं मनुष्यानं स्वतःला इष्ट असलेलं मरण देखील दुसऱ्या कुणाच्या दुःखाला कारणीभूत होणार नाहीं असं वागलं पाहिजे. "

" स्वतःच्या फायद्यासाठीं का मी मरायला तयार झालों आहे ? ... नाहीं, नाहीं मंगल. ... दीनेसाठीं बरं सारं केलं मीं ! "

" श्री, दीनेला नीट ओळखली नाहींत अजून तुम्हीं. दुसऱ्याच्या दुःखांनीं मिळणाऱ्या सुखांत गोडी नाहीं तिला. आणि दीनेसाठीं आत्म-हत्येचा विचार करतांना तुम्हीं चतुरेचा विचार केलात का कांहीं ? एकीचं सुख पाहतांना दुसरीला दुःखांत लोटून कसं चालेल ? ज्या चुका झाल्यानं तुमचं मन कळवळतं त्या पुन्हां व्हाव्यात असं का वाटतं तुम्हांला ? "

" छे छे ! तसं कसं वाटेल मंगल ? "

" पण आतांच्या तुमच्या मनाप्रमाणं घडून येण्यानं तसंच नाहीं का होणार आहे ? "

श्रीच्या मनांत नवाच प्रश्न उभा राहिला. पश्चात्तापाच्या भरांत चतुरेचा विचारच मनांत आला नव्हता त्याच्यापुढें. तो कांहीं वेळ शांतपणानें डोळे मिटून पडून राहिला. त्याला दीना सुखी व्हायला हवीच होती, पण चतुरा दुःखी व्हावी असेंहि वाटत नव्हतें. पण त्या दोन्ही गोष्टी कशा साधायच्या ? तो विचारांत पडला.

कांहीं वेळानें नवीनच कल्पना त्याच्या मनांत आली. अन् किती आनंद झाला त्याला ! मंगलांच्या मांडीला हालवीत त्यानें विचारलें—

" मी सांगेन तसं करायला तयारी आहे तुमची ? "

" समजा, तुमच्या म्हणण्याप्रमाणं मीं वागायचं कबूल केलं तर ? "

" तर ! तर मग किती आनंद होईल मला ! जगावंसं वाटूं लागेल, नि औषध घ्यायला सुरुवात करीन मी. "

" अगदीं खरं ना हें ? मग सांगा पाहूं. "

" सांगतों. पण तुम्ही एकटेच बसा इथं. अगदीं दीना देखील नको जवळ. "

बाकीचीं सर्व माणसें तेथून गेल्यावर श्रीनें मंगलांना आपला विचार सांगितला. श्रीनें सुचविलेला मार्ग जितका विचित्र तितकाच सरळ आहे असें मंगलांना वाटून त्यांना नाहीं म्हणतां येईना. श्रीच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचें वचन दिलें त्यांनीं.

त्या क्षणापासून श्रीनेंहि आपल्याला लवकर बरें व्हायचें आहे अशा निश्चयानें प्रसन्न मनानें औषध घ्यायला सुरुवात केली.

पण ती गोष्ट घडून येणें त्याच्या हातांत कुठें राहिलें होतें !

आत्महत्येच्या निश्चयानें त्यानें दुपारीं गुपचूप आणवून ठेवलेली भाकरी खाल्ली होती, नि त्या कुपथ्यानें उलटलेलें दुखणें आटोक्यापलीकडे जाऊं पाहत होतें.

मन आनंदानें मोहरून गेलें असतांनाच शरीर तापानें सुकून चाललें होतें. बरें व्हायचा संभव पाहणाराला कमीकमीच होत असल्याचा भासूं लागला.

तरी मंगल मात्र मुळींच घाबरले नाहींत. स्वतःच्या कर्तृत्वाची त्यांना खात्री होती. श्रीला ह्यांतूनहि बरा करूं आपण असें दीनेला तो निश्चयानें सांगत होता.

दीनाहि तितक्याच विश्वासानें श्रीची शुश्रूषा करीत होती.

श्रीकांताची सेवा करतां-करतां तिच्या मनांतली श्रीकांताची मोहक पण सासूच्या वर्चःस्वामुळें भेसूर बनलेली मूर्ति नाहींशी होऊन तिला तो किती-तरी थोर हृदयाचा दिसूं लागला. लग्नाच्या पूर्वी पाहायला आल्या-वेळीं श्रीच्या स्वभावाविषयीं जो ठसा प्रथमदर्शनींच तिच्या मनांत उमटला तोच एकूण खरा ठरला असेंहि तिला वाटूं लागलें. श्रीच्या उपजत मनो-वृत्तींबद्दलचे वेळोवेळीं तिनें केलेले अंदाज चुकीचे नव्हते याविषयीं तिची

आतां खात्री होऊं लागली. श्रीकांताविषयीं तिच्या मनांत घट्ट बसलेली अढी कशानेंहि नाहींशी होणें शक्य नव्हतें आणि त्यामुळें मंगलांचा सहवास सोडून परत श्रीकांताकडे जावें असा विचारहि तिला शिवण्या-सारखा नव्हता हें खरें, तरी पण आपल्या पूर्वीच्या कल्पनेप्रमाणें त्याचें अंतःकरण खरोखरच अतिशय सरळ नि उदार असल्याचें तिला आतां निःशंक दिसून आल्यामुळं तिच्या ठिकाणीं त्याच्याविषयीं सर्व प्रकारची सहानुभूति उत्पन्न झाली. रुग्णालयांतील इतर असहाय रोग्यांकडे ती ज्या सहृदयतेनें पाही तीपेक्षां श्रीच्या ती करीत असलेल्या शुश्रूषेंत आत्मीयतेचा जिव्हाळा अधिक नि विशेष वाहूं लागला.

मंगलांचे औषधोपचार व दीना करीत असलेली मनापासूनची शुश्रूषा यांच्या योगानें श्रीकांत बरा होणारशीं चिन्हें दिसूं लागलीं.

श्रीचा ताप थोड्याच दिवसांत पूर्णपणें निघाला.

आणि पुढें महिन्या दीड महिन्यांतच तो आपला आपण उठूं-बसूं लागला.

रुग्णालयाच्या भोंवतालीं हिंडण्याइतकी शक्ति त्याच्यांत आली.

आवारातील बागेंत बरोबर हिंडतांना दीना व तो दोघें मोकळेपणानें बोलत. श्रीकांतानें मंगलांजवळ जी गोष्ट सांगितली ती कळून घ्यायचा अशा वेळीं दीना प्रयत्न करी. पण मंगलांप्रमाणेंच तोहि म्हणे – "आत्तांच काय त्याचं ! योग्य वेळीं कळेलच सारं."

* * *

– आणि थोड्याच दिवसांनीं मंगल व दीना आश्रमाच्या कचेरींत काम करीत बसलीं असतांना श्रीकांत अनपेक्षित रीतीनें आंत आला आणि त्यांना बोलण्याला मुळींच अवसर न देतां तितक्याच अनपेक्षितपणें म्हणाला–

" मंगल, मी आतां निघालों आहें."

आदल्या दिवशीं मंगलांनीं त्याची प्रकृति तपासली होती व रुग्णालय सोडून घरीं जायला हरकत नसल्याचें त्याला सांगितलें होतें. तरी पण आजच ह्याच वेळीं अशा आकस्मिकपणें तो जायला निघेल अशी मंगलांना कल्पनाहि झाली नाहीं.

" आत्तां अशा ऐन उन्हाच्या वेळीं जाणार तुम्ही ! "

" हो. आत्तांच जायचं ठरवलं आहे. ... पण त्यापूर्वी तुमच्याकडून कबूल करून घेतलेली गोष्ट करायची आहे मला."

" श्रीकांत ! काय म्हणता तुम्ही ! "

" कांहीं नाहीं ठरलं आहे तेंच."

श्रीकांताचें मन जणूं हृदयावरचें कसलें तरी मोठें दडपण उतरवून टाकायला अधीर झालें होतें नि त्या भरांत कांहींशा कंपयुक्त स्वरांत तो बोलत होता.

जायची वेळ होतांच श्रीकांतानें आश्रमांतल्या सर्व मंडळींना आपल्या सभोंवतीं बोलावलें नि सर्वांना जाहीर केलें—

" दीनेचा पति ह्या नात्यानं तिच्यावरचा कायद्यानें मला असलेला हक्क आज तुम्हां सर्वांसमक्ष मी आनंदानें सोडीत आहें. इतकंच नाहीं तर तिला यापुढं मंगलांची पत्नी म्हणून मनापासून त्यांच्या स्वाधीन करून वैवाहिक बंधनावर मी प्रहार करीत आहें. इतःपर कायद्यानं तिला माझीच पत्नी असं मानण्याचं ठरवलं तरी सुद्धां मी तें मानणार नाहीं. तिलाहि माझ्याशीं पत्नीपणानं वागतां यायचं नाहीं. अनीतिकारक ठरेल तें यापुढं. आजपर्यंतची माझी असूनहि नसणारी दीना ह्यापुढं मंगलांची पत्नी म्हणूनच ओळखली जावी. तुम्हीं सर्वांनीं त्याच दृष्टीनं तिच्याकडे पाहावं. आणि मंगल, दीना, तुम्हीहि."

असें म्हणून अतीव समाधानानें श्रीकांतानें दीनेचा हात प्रेमानें मंगलांच्या हातांत दिला.

आणि दोघांवर प्रसन्न मनानें दृष्टि टाकून तो चटकन् तेथून निघाला.

बाहेर उन्हानें सारें ब्रह्मांड तापून गेलें होतें. पण श्रीकांताच्या मनांत नितांतरम्य पौर्णिमा फुलली होती ! !

---